

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

जानेवारी
जून
१९७८

संपादक : डॉ. हेमंत विष्णु इनामदार

कै. विठ्ठल दत्तात्रय घाटे



जन्म : १८-१-१८९५ मृत्यू : ३-५-१९७८







# घटना दुरुस्ती

## विनंती

म. सा. परिषदेच्या चालू घटनेत काही बदल करण्यासाठी कार्यकारी मंडळाने घटनादुरुस्ती समिती नेमली आहे.

ज्या सभासदांना घटनेत दुरुस्त्या सुचवावयाच्या असतील त्यांनी उशिरात उशिरा १ जुलै ७८ पर्यंत 'कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०' या पत्त्यावर आपल्या सूचना अगत्य पाठवाव्यात. आलेल्या सूचना समितीपुढे ठेवल्या जातील; नंतर कार्यकारी मंडळाची संमती घेऊन त्या विशेष साधारण सभेपुढे अंतिम निर्णयासाठी ठेवल्या जातील.

चालू घटनेची प्रत कार्यालयाकडून मिळू शकेल.

म. श्री. दीक्षित
कार्यवाह

# महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे—३०.

## वार्षिक साधारण सभा

### सूचना

दि. ३१ मे १९७८

स. न. वि. वि.

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार, दि. २५ जून १९७८ रोजी, पुणे येथे परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात, सायंकाळी ठीक पाच वाजता भरणार आहे. सभासदांनी या सभेला अवश्य यावे ही विनंती.

**सभेपुढील कामे :**

१. श्रद्धांजली.
२. मागील सभेचा वृत्तान्त वाचून संमत करणे.
३. १९७७–७८ चा कार्यवृत्तान्त संमत करणे.
४. १९७७–७८ चे उत्पन्न–खर्च आणि ताळेबंद-पत्रक संमत करणे.
५. १९७८–७९ चा अर्थसंकल्प संमत करणे.
६. हिशेबतपासनिसांची नियुक्ती करणे.
७. पत्रव्यवहार.
८. अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळची कामे.

आपले

**वि. ग. कानिटकर**
**राजा महाजन**
**म. श्री. दीक्षित**
कार्यवाह

**गं. बा. सरदार**
अध्यक्ष
**श्री. ज. जोशी**
कार्याध्यक्ष

कोणाही सभासदास कार्यवृत्त अथवा हिशेब यासंबंधी काही माहिती हवी असेल अथवा ठराव पाठवावयाचा असेल, तर तसे लेखी स्वरूपात, सभेपूर्वी सात दिवस कळवावे ही विनंती.

अनुक्रमणिका

५९७२

महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति-मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

संपादक

डॉ. हेमंत विष्णु इनामदार

संपादन समिती

डॉ. प्रभाकर लक्ष्मण गावडे
डॉ. वसंत सखाराम जोशी
डॉ. अशोक प्रभाकर कामत
डॉ. निर्मलकुमार जिनदास फडकुले
प्रा. मधुकर शंकर वावगावकर
डॉ. यूसुफखान महंमदखान पठाण

मार्गशीर्ष, शके १८९९
ते
वैशाख, शके १९००
जानेवारी १९७८
ते
जून १९७८
( जोड-अंक )
अंक क्रमांक
२०४ व २०५

मूल्य पाच रुपये

मुद्रक

श्री. चिंतामणी सदाशिव लाटकर
कल्पना मुद्रणालय, पुणे ३०

प्रकाशक

श्री. श्रीकृष्ण जनार्दन जोशी
कार्याध्यक्ष, म. सा. परिषद, पुणे ३०

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



■

# संपादकीय

---

जानेवारी १९७८ ते जून १९७८ या कालावधीतील म. सा. पत्रिका प्रस्तुत अंकाच्या रूपाने जोड-अंक म्हणून, प्रकाशित होत आहे. यापुढील अंक सप्टेंबर १९७८ मध्ये प्रसिद्ध होईल.

साहित्य पत्रिकेच्या भूतपूर्व पंधरा संपादकांच्या कामगिरीचे समालोचन करणारे लेख आम्ही सवडी-सवडीने प्रसिद्ध करीत आहो. मार्च १९७९ पर्यंत सर्व लेख क्रमशः प्रसिद्ध होतील.

## हार्दिक अभिनंदन

समाज प्रबोधन पत्रिकेचे संपादक प्राचार्य डॉ. भा. शं. भणगे यांची येत्या तीन वर्षांसाठी शिवाजी विद्यापीठाचे कुलगुरू म्हणून नियुक्ती झाली.

मुंबईतील ख्यातनाम शिक्षणतज्ज्ञ डॉ. सौ. माधुरीबेन शाह यांना श्री. ना. दा. ठा. महिला विद्यापीठाच्या कुलगुरू म्हणून आणखी तीन वर्षांची मुदतवाढ मिळाली.

प्रसिद्ध विचारवंत व थोर साहित्यिक प्रा. गं. बा. सरदार यांची महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष म्हणून नियुक्ती झाली.

इचलकरंजीचे डॉ. संभाजी सावळाराम भोसले यांच्या 'प्रेरणा आणि निर्मिती' या ग्रंथास शिवाजी विद्यापीठाचे गुणवत्ता-पारितोषिक मिळाले.

मुंबईचे डॉ. स. गं. मालशे यांनी म. सा. परिषदेसाठी संपादिलेल्या ' 'मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड दुसरा : इ. स. १३५० ते १६८०' ह्या खंडाची मुद्रण-प्रत सिद्ध झाली.

वाईचे डॉ. वसंत स. जोशी यांनी म. सा. परिषदेसाठी संपादिलेल्या 'संशोधन-पद्धती' या ग्रंथाची मुद्रण-प्रत सिद्ध झाली.

'सत्यकथा' मासिकाने अलीकडे 'परिक्रमा' हे नवे उपयुक्त सदर सुरू केले आहे. साहित्य, कला व संस्कृती या तिन्ही क्षेत्रांतील महत्त्वांच्या घटनांची अचूक नोंद या सदरात केली जाते.

## वाङ्मयोपासकांचे महानिर्याण

केशवसुत आणि मर्ढेकर यांच्या तोलामोलाचे मराठी कवी पुरुषोत्तम शिवराम रेगे १७ फेब्रुवारी १९७८ रोजी मुंबईस कालवश झाले.

'रसिकांचा राजा' असलेले रससिद्ध साहित्यिक विठ्ठल दत्तात्रय घाटे पुण्यास ३ मे १९७८ रोजी दिवंगत झाले.

फलटणचे राजे मालोजीराव नाईक निंबाळकर देवाघरी गेले. म. सा. परिषदेस त्यांनी साडेतीन हजार रुपयांची देणगी दिली होती. परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभा-गृहाचे त्यांनी उद्‌घाटन केले होते.

इंदूरचे माजी संस्थानाधिपती सवाई तुकोजीराव होळकर वयाच्या अठ्याऐंशीव्या वर्षी निधन पावले. परिषदेचे ते पहिले देणगीदार होत. दहा हजार रुपयांची उदार देणगी त्यांनी दिली होती.

प्रसिद्ध नाटककार व विनोदी लेखक गो. ल. आपटे पुणे मुक्कामी ३० मार्च १९७८ रोजी निधन पावले.

'ज्योत्स्ना' मासिकाचे नामवंत लेखक 'शेष' (के टी. सुळे) मुंबईत १६ एप्रिल १९७८ रोजी कालवश झाले.

मराठीत महाभारत रसाळपणे आणणारे द. गो. दसनूरकर मुंबईस अडुसष्टाव्या वर्षी दिवंगत झाले.

प्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित डॉ. परशुराम लक्ष्मण वैद्य व मीमांसाभूषण पु. वा. साठे हे दोघे पुणे मुक्कामी कालवश झाले.

## वाङ्मयीन उपक्रम

१९७८ या संवत्सराचा हा पूर्वार्ध अनेकविध वाङ्मयीन उपक्रमांनी बहरला होता.

बडोद्यास मराठी वाङ्मय परिषदेचे एकेचाळिसावे अधिवेशन कविवर्य बा. भ. बोरकरांच्या अध्यक्षतेखाली साजरे झाले. नरहर कुरुंदकर, मंगेश पाडगावकर, विंदा करंदीकर, माधव आचवल प्रभृतींची उपस्थिती व सहभाग महत्त्वाचा होता.

भा. रा. कहाळेकर स्मृति-उत्सव हैदराबादला साजरा झाला.

काव्यरसिक-मंडळाचे बारावे वार्षिक संमेलन डोंबिवलीस प्रा. वसंत बापटांच्या अध्यक्षतेखाली पार पडले.

पाच / संपादकीय

शारदोपासक मंडळाचा दुसरा वार्षिकोत्सव मालवण मुक्कामी श्री. जयवंत दळवींच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला; व श्री. बाळ सामंतांचे मुख्य भाषण श्रोत्यांना आवडले.

अखिल भारतीय पातळीवरील समांतर लेखकांचे सातवे साहित्यसंमेलन मध्यप्रदेशातील छिंदवाडा येथे, 'लेखकांनी लेखकांशी केलेली बातचीत' या स्वरूपात साजरे झाले.

मुंबई महानगर साहित्यसंमेलन नॅशनल लायब्ररीतर्फे बांद्रे येथे प्रा. नरहर कुरुंदकर यांच्या अध्यक्षतेखाली झाले. 'लेखकाचे स्वातंत्र्य' व 'साहित्य आणि राजकारण' या विषयांवर तेथे विचारमंथन झाले.

कुलाबा जिल्हा ग्रंथालय/साहित्य संमेलन कर्जत येथे प्रा. सरोजिनी वैद्यांच्या अध्यक्षतेखाली झाले.

मध्यप्रदेश साहित्य परिषदेच्या वतीने इंदूरला राजकवी तांबे स्मृतिदिन साजरा झाला. त्यावेळी कविवर्य अनिल (अध्यक्ष), वा. रा. ढवळे यांचा विशेष सहभाग त्यात होता.

मराठवाडा साहित्य परिषदेच्या परभणी शाखेचे साहित्य संमेलन प्रा. नरहर कुरुंदकरांच्या अध्यक्षतेखाली झाले. 'सामाजिक बांधिलकी' या विषयावर तेथे चर्चा झाली.

आलोचन प्रस्थानतर्फे मुंबईत तिसरी वार्षिक ग्रंथपरिशीलन व्याख्यानमाला झाली. प्रा. वसंत दावतरांनी सर्व संयोजन केले.

'पहाट' या संस्थेतर्फे पुण्यास मेमध्ये पहिले नवोदित साहित्यिक संमेलन श्री. दिलीप चित्रे यांच्या अध्यक्षतेखाली झाले.

सांगली जिल्ह्यातील विटे मुक्कामी साहित्य सेवा मंडळाचे तिसरे ग्रामीण साहित्य संमेलन श्री. रणजित देसाईंच्या अध्यक्षतेखाली झाले.

यंदाची साहित्य अकादमी पारितोषिके हैदराबादला राष्ट्रपतींच्या हस्ते प्रदान करण्यात आली.

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे डॉ. आंबेडकर जयंतीस पुणे येथे डॉ. आंबेडकर व अण्णाभाऊ साठे यांच्या छायाचित्रांचे अनावरण करण्यात आले. प्रा. गं. बा. सरदार (अध्यक्ष), श्री. बाबूराव बागूल व डॉ. भालचंद्र फडके यांची उद्बोधक भाषणे झाली.

रत्नागिरी जिल्ह्यातील वालावल या गावी दक्षिण रत्नागिरी साहित्य संघाच्या विद्यमाने साहित्यिक मेळावा भरला होता. या वेळी कविवर्य निकुंबांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद व डॉ. वसंत सावंतांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले.

औरंगाबादला दुर्गा भागवतांच्या अध्यक्षतेखाली लोकसाहित्य संशोधन मंडळाचे उद्घाटन झाले.

अनुक्रमणिका

## या अंकातील लेखक


१. डॉ. सुधाकर शं. देशपांडे, ५/५ चंद्रशेखर नित्यानंद मार्ग, अंधेरी-पूर्व, मुंबई—६९.

२. डॉ. चंद्रशेखर शं. बर्वे, बी. ४, रामबाग, पुणे ३०.

३. डॉ. सौ. श्रीलेखा साने, प्राध्यापक-निवास, बृहन महाराष्ट्र कॉमर्स कॉलेज, पुणे ४.

४. प्रा. सौ. सुप्रिया अत्रे, 'यशोधन', ६३ इंदिरानगर, पुणे ४.

५. प्रा. सौ. सुधा क्षीरे, 'सहवास', भारतीनिवास कॉलनी, पुणे ४.

६. प्राचार्य बलवंत देशमुख, आर्टस कॉलेज, गडहिंग्लज जि. कोल्हापूर.

७. डॉ. रा. चिं. ढेरे, 'लोककल्याण', ७७ शनिवार पेठ, पुणे ३०.

८. श्री. राजेंद्र बनहट्टी, ९९२ सदाशिव, राजेंद्रनगर, पुणे ३०.

९. डॉ. कृ. शा. भिंगारकर, ५३३ शनिवार पेठ, पुणे ३०.

१०. प्रा. दा. सी. देसाई, प्राध्यापक निवास, कीर्ती कॉलेज मुंबई २८.

११. प्रा. श्यामला थडानी, एल, १४–१०३, टिळकनगर –२, चेंबूर, मुंबई–८९.

१२. डॉ. प्र. न. जोशी, 'रेणुका', लक्ष्मीपार्क कॉलनी, नवी पेठ, पुणे ३०.

१३. श्री. मु. शं. देशपांडे, 'संदीप', भारतीनिवास कॉलनी, पुणे ४.

१४. प्रा. अरुण प्रभुणे, उदयगिरी कॉलेज, उदगीर, जि. उस्मानाबाद.

१५. प्रा. गो. म. कुलकर्णी, कुलकर्णी बंगला, कलानगर, पुणे ९.

१६. श्री. वा. ल. मंजूळ, ग्रंथपाल-निवास, भांडारकर इन्स्टिट्यूट, पुणे ४.

१७ डॉ. ल. रा. नसिराबादकर, १८०९, 'ए' वॉर्ड, ब्रह्मेश्वरबाग, कोल्हापूर २.

१८. श्री. मो. रा. वाळंबे, २९१ सदाशिव (नवी) पेठ, पुणे ३०.

१९. डॉ. हे. वि. इनामदार, एरंडवणे, पुणे ४.

नगरला डॉ. अनुराधा पोतदारांनी अहमदनगर जिल्हा साहित्य संघाचे उद्घाटन केले.

१ ते १५ मे पंधरवडाभर पुण्यास मॅजेस्टिक ग्रंथप्रदर्शन व साहित्यिक गप्पा हे कार्यक्रम भरगच्च स्वरूपात साजरे झाले. श्री. केशवराव कोठावळे प्रतिवर्षी पुणेकरांना हे वाङ्मयीन उपायन देऊन तृप्त करतात.

मराठी माणसांच्या विकसित होत जाणाऱ्या वाङ्मयाभिरुचीचे विहंगमदर्शन या सर्व उपक्रमांतून सुखदपणे घडते.

या अंकास महाराष्ट्र शासनाने सवलतीच्या दराने कागद पुरवला त्याबद्दल आम्ही शासनाचे अत्यंत आभारी आहो.

पुणे १ जून १९७८ — हे. वि. इनामदार

## सभासदांना विनंती

परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुका मार्च १९७९ मध्ये होणार आहेत. त्यासाठी नोव्हेंबर ७८ अखेर मतदार सभासदांची अद्ययावत यादी तयार होईल. मतदानाच्या दृष्टीने वार्षिक साधारण सभासदांची चालू ७८–७९ या वर्षाची वर्गणी येणे आवश्यक आहे. कृपया या गोष्टीची नोंद सर्वांनी घ्यावी; व स्मरणपत्रांची वाट न पाहता आपली वर्गणी शक्य तितक्या लवकर पाठवावी.

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषदेची मौलिक प्रकाशने

(क्र. १ ते ४, कमिशन १५%)



अनुक्रमणिका

# प्रेमाचा निरोप

**कै. विठ्ठल दत्तात्रय घाटे**

१९५३ च्या अहमदाबाद संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातून

---

मित्रहो, संपले. आता भरतवाक्य तेवढे राहिले...

माझ्या पिढीच्या वाट्याला पुष्कळच अनुभव आला, पुष्कळ आनंद मिळाला. भूतकाळाने मला दुःखही खूप दिले, कसोटी पाहिली, पास केले; भूतकाळाचा मी कृतज्ञ आहे.

भूतकाळात मी केशवराव भैयांचे गाणे, माधवरावांची पेटी व सखारामबुवांचा पखवाज ऐकला आहे. स्वरसम्राज्ञी गोहरच्या खाजगी बैठकीत हजरी दिली आहे. नारायणरावांचे सरोजिनीचे पहिले काम पाहिले आहे आणि दर गाण्याला चार चारदा वन्समोअर दिले आहेत. नारायणराव व केशवरावांचा ' न भूतो न भविष्यति ' असा संयुक्त खेळ पाहिला आहे अन् केशवरावांना खांदा दिला आहे. गणपतरावांचा हॅम्लेट पाहिला आहे अन् शुक्लांचा तुकाराम पाहिला आहे. पाटणकरांतील मारवाड्याची सारी कामे पाहिली आहेत व दत्तू हल्याळकरचे रंगभूमीवरचे कबीराचे दोहे ऐकले आहेत. लोकमान्यांची सिंहगर्जना ऐकली आहे. महात्माजींचे तीस वर्षांचे आध्यात्मिक व सार्वजनिक जीवन माझ्या डोळ्यांसमोर घडले आहे. महात्माजी स्वातंत्र्य युद्धासाठी खडे राहिले तेव्हा ग्वाल्हेरीच्या गुलामगिरीत रात्र रात्र चिंतनात व क्रंदनात जागून काढली आहे व ' हा पहा महात्मा आला ' असा महात्माजींचा प्रथम परिचय महाराष्ट्राला करून देणाऱ्या द्वारपालाची नम्र कामगिरी बजावली आहे.

भूतकाळात चंद्रशेखरांच्याबरोबर काव्यरंगात रात्रीचा दिवस केला आहे, माधवरावांच्या बरोबर छत्तीस तास काव्यगायन केले आहे, तांब्यांच्या बरोबर काव्यानंदात वर्षे घालविली आहेत. भूतकाळाने मला खूपच दिले आहे. पण मी पुढे पाहणारा मनुष्य आहे. प्रत्येक नवीन नवीन कवीचे मी स्वागत केले आहे. मंगेश पाडगावकराला पोटाशी धरले आहे. बोरकरांबरोबर व विंदा करंदीकरांबरोबर मजा लुटली आहे.

अनुक्रमणिका

वसंत बापटाचे वत्सल भावाने अभिनंदन केले आहे आणि संजीवनीचे बापासारखे कोडकौतुक केले आहे.

माझ्या हृदयात आनंद आहे व बाहू वर्तमानकाळाला व भविष्यकाळाला आलिंगन देण्यास सदैव सिद्ध आहेत. वृद्ध प्रभाकराच्या शब्दात मी नवागतांचा प्रेमाने निरोप घेतो—

**' आम्ही जातो, तुम्ही रंग करा आपुला '**

---

# साहित्याचे जीवनातील स्थान

**कै. पुरुषोत्तम शिवराम रेगे**

१९६९ च्या वर्धा संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातून

---

मराठी साहित्यातील जी आपण प्रमुख श्रेयस्थाने मानतो ती खरोखरच वाटताहेत का ? गेल्या शेदीडशे वर्षांत जे लेखक होऊन गेले त्यांनी आपले जीवन खरोखरच प्रभावित केले आहे काय ? आजसुद्धा जेव्हा मूळ मतलबाचा प्रश्न येतो तेव्हा आपण ज्ञानदेव आणि तुकाराम यांच्याकडेच धाव घेतो ती का ? त्यांनी तर साहित्यिकीचा तसा दावा कधीच मांडला नाही...

या प्रश्नांचा जेव्हा आपण विचार करतो तेव्हा दोन वेगवेगळ्या ठळक गोष्टी आपणांपुढे उभ्या राहतात. पहिली गोष्ट ही की, साहित्याचे ( किंबहुना सर्वच कलांचे ) आपल्या जीवनातील स्थान पुष्कळच खाली गेले आहे. मनोविनोदनापलीकडे आपण त्याचा फारसा विचार करीत नाही. त्यावाचून आपले तसे फारसे अडत नाही. त्याज-बरोबर आपण हेही पाहतो की सध्याचे युग हे ज्ञानसंवर्धनाचे आहे. परिज्ञान ( किंवा ज्याला आपण इंग्रजीत Wisdom म्हणू ) त्याला या युगात फारसा वाव नाही. ज्ञान हे उपयोगी असते, परिज्ञान हे उपादानी असते. जीवन जगण्यासाठी अधिकाधिक सुखसोयींनी जगण्यासाठी आपणांस आज वेगवेगळ्या ज्ञानशाखांचा आश्रय घेतल्या-वाचून भागण्यासारखे नाही. हे सर्वच ज्ञान वेगवेगळ्या तऱ्हांनी राबवावे लागते.

अनुक्रमणिका

परिज्ञान या सर्वाला छेदून आणि पुन्हा वेगळे होऊन एक सम्यक दर्शन घेण्याचा आणि देण्याचा प्रयत्न करीत असते. ज्ञानसंवर्धन जसजसे अधिक होते तसतसा हा प्रयत्नही अधिकाधिक कठीण होत जातो. हे विवेचन जर मान्य केले तर साहित्याचे आपल्या जीवनातील स्थान का कमी होत आहे आणि जे काही थोडेबहुत परिज्ञानाच्या कोटीप्रत नेणारे साहित्य आढळून येते त्याची इयत्ता आज कोणत्या प्रकारची असणे आवश्यक आहे याचा थोडाबहुत अंदाज बांधता येतो.

या परिस्थितीमुळे साहित्यापासून सामान्यतः कोणीच फारशा अपेक्षा करीत नाहीत. त्यातही लिहिणे, लिहिलेले छापणे आणि प्रसृत करणे हे पुष्कळच सुलभ झाल्यामुळे त्याची किंमत जरी द्यावी लागली तरी त्यासाठी आपले असे स्वतःचे खास मोल काही द्यावे लागत नाही. एकेकदा मला असे वाटते की, मुद्रणकलेची सवलत उपलब्धच नाही असे समजून आपण ज्या साहित्याने खरोखरीच प्रभावित झालो आहोत त्या साहित्याची स्वलिखित प्रत काढायचे ठरविले तर अशा कितीशा ग्रंथांची प्रत काढू? मला नाही वाटत की, ही यादी एका हाताच्या बोटांपलीकडे जाईल. निदान एवढे जरी मोल देता आले तरी पुष्कळ होईल...

जैसे श्रीगुरुने आदेशिले। तैसेचि हे आदरे बोलणे झाले।
सकळिकां सानंद अर्पियले। रेगे शिवरामसुते पुरुषोत्तमे ॥

॥ ॐ तत् सत् ॥

अनुक्रमणिका

## प्रा. रा. श्री. जोग पारितोषिक

१ जानेवारी १९७७ ते ३१ डिसेंबर १९७८ या काळात प्रसिद्ध झालेल्या अगर होणाऱ्या साहित्य समीक्षेच्या क्षेत्रातील सर्वोत्तम ग्रंथास दोन सहस्र रुपयांचे बक्षीस दिले जाईल. तरी या विषयावर वरील कालामध्ये प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची माहिती, लेखक, प्रकाशक वा वाचक यांनी समितीच्या निदर्शनास आणून देण्याची विनंती आहे.

या पारितोषिकासाठी ज्यांना हस्तलिखित प्रत पाठवावयाची इच्छा असेल त्यांनी आपली संपूर्ण मुद्रण प्रत, समितीच्या कार्यवाहांकडे कचेरीच्या वेळात ( सकाळी १०-३० ते सायंकाळी ६-०० ) ३१ ऑगस्ट १९७८ पूर्वी पोहोचेल अशा रीतीने पुढील पत्त्यावर पाठवावी :

**जोग स्मारक समिती,**
व्हीनस प्रकाशन, तपश्चर्या,
३८१ क शनिवार, पुणे ३०.

अनुक्रमणिका

# मो. ज्ञा. शहाणे यांनी संपादिलेली साहित्य-पत्रिका

**समालोचक : सुधाकर शं. देशपांडे**

---

'महाराष्ट्र-साहित्य पत्रिके'च्या संपादनाची जबाबदारी श्री. मो. ज्ञा. शहाणे यांनी जुलै १९३७ मध्ये स्वीकारली. ऑक्टोबर १९३९ पर्यंत ते या पदावर होते. या काल-खंडात त्यांनी 'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके'च्या एकूण चौदा अंकांचे संपादन केले. त्यांच्या कारकीर्दीत 'पत्रिके'ची 'त्रैमासिक–मासिक–पुन्हा त्रैमासिक' अशी कालिक स्थित्यंतरे झाली. जुलै १९३७ च्या अंकावर संपादक म्हणून श्री. शहाणे यांचे नाव आहे. तथापि ते नाममात्रच आहे. त्यांच्या प्रत्यक्ष देखरेखीखाली ऑक्टोबर १९३७-पासूनच अंक निघण्यास सुरुवात झाली. 'माझ्या अनुपस्थितीत परिषदेच्या अधिकाऱ्यांनी मागील अंक काढला' असे श्री. शहाणे यांनीच सांगितले आहे (ऑक्टो. १९३७, पृ. १).

'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके'चे स्वरुप काय असावे याची निश्चित खूणगाठ श्री. शहाणे यांनी मनाशी बांधून ठेवलेली दिसते. साहित्य-पत्रिका ही त्रैमासिक राहावी, ती मासिक होऊ नये म्हणून श्री. शहाणे यांनी निकराने प्रयत्न केले. 'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके'चे अवतारकार्य कोणते आहे, याची जाणीव त्यांना होती. तत्कालीन 'लोकशिक्षण', 'ज्योत्स्ना', 'सह्याद्री' इत्यादी मासिकांच्या कार्यापेक्षा साहित्य-पत्रिकेचे नियतकार्य अगदी वेगळे आहे. साहित्य-पत्रिकेत संशोधनात्मक, विद्वत्ताप्रचुर व भारदस्त असेच लेखन असावे. 'विविध-ज्ञान-विस्तार' मासिक अशा लेखनाची गरज भागवीत असे. परंतु त्याचा अस्त झाल्यामुळे 'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके'ने 'अभ्यासजड' लेखन प्रकाशित करण्याची धुरा अंगावर घेतलीच पाहिजे असा श्री. मो. ज्ञा. शहाणे यांचा दृष्टिकोण होता. "नागरी प्रचारिणी सभेचे अथवा विश्व-विद्यालयाचे जसे एक त्रैमासिक, षाण्मासिक वा वार्षिक निघते, तसेच त्या तोलाचे परिषदेचेही मुखपत्र असणे इष्ट आहे" (मार्च १९३९, पृ. ८०) अशी ईर्षा श्री. शहाणे यांनी बाळगली होती. पत्रिकेला हे स्थान प्राप्त करून द्यावयाचे असले तर ती मासिक पत्रिका ठेवण्याचा आग्रह सोडणे जरूर आहे असे श्री. शहाणे यांनी

अनुक्रमणिका

परखडपणे सांगितले आहे.

'पत्रिका' त्रैमासिक टेवणे का इष्ट हे सांगताना श्री. शहाणे यांनी कारणे दिली, ती अशी : खर्च झेपणार नाही. परिषद 'पत्रिके'वर जो खर्च करते त्या खर्चाच्या मर्यादेत विख्यात लेखकांचे लेखन मागवून ते दरमहा प्रसिद्ध करणे अशक्य आहे. खर्च आटोक्यात राहावा म्हणून संशोधनपर लेखांवर शब्दमर्यादा घालणे हे हास्यास्पद ठरेल. 'पत्रिका' मासिक करण्यास श्री. शहाणे यांचा विरोध पूर्णपणे व्यावहारिक स्वरूपाचा आहे. "पत्रिकेच्या कार्यास वाहून घेतलेले पंधरा वीस साहित्यिक एकत्र जमतील, तर 'पत्रिका' मासिक का पाक्षिकही करता येईल. तथापि वाङ्मयीन संशोधन करणारे जे मराठी साहित्यिक आहेत, त्यांमध्ये अशी फुरसत असणारे अत्यल्प आहेत, असा स्वानुभव आहे" असे ते म्हणतात (ऑक्टोबर १९३९, संपादकीय). 'पत्रिके'बाबतचा हा त्यांचा अंदाज पूर्णपणे खरा ठरला आणि हा प्रयोग यशस्वी होत नाही हे पाहून जानेवारी १९३९ पासून मासिक स्वरूपात प्रकट होणारी 'पत्रिका' जुलै १९३९ पासून पुन्हा त्रैमासिक करावी लागली.

एकूण आठ अंकांत 'संपादकीय' आलेले आहे. 'पत्रिके'तील संपादकीयांतून श्री. शहाणे यांनी नभोवाणीतील मराठीची हेळसांड व राष्ट्रभाषा म्हणून हिंदी सक्तीची केल्यास देशभाषेवर होणारा परिणाम या प्रश्नांना प्रमुखतः स्थान दिले. 'पत्रिके'च्या महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनातील स्थानाची त्यांना पूर्ण कल्पना होती. त्या वेळी प्रांतिक सरकारे स्थापन झाली होती. साहजिकच 'लोकछंदानुवर्ती' सरकारने आक्षिप्त वाङ्मयावरील बंदी उठवावी म्हणून त्यांनी नेटाने प्रयत्न केले. 'पत्रिके'च्या फेब्रुवारी १९३८ च्या अंकात स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या मध्यप्रांतातील भाषणाचा उतारा देऊन, हिंदुस्थानच्या भूतकालीन इतिहासाचे वर्णन करीत असता मुसलमानांच्या क्रौर्याचीही वर्णने आवश्यक, या सावरकरांच्या मताशी त्यांनी विरोध नोंदविला आहे. 'विदर्भ-साहित्य-संघा'च्या शाखा खानदेश, (तेव्हाचा) मोगलाई व मराठी मध्यप्रांत येथे स्थापन करण्याचे घाटत होते, तेव्हा 'विदर्भ-साहित्य-संघा'ने आपले कार्यक्षेत्र वऱ्हाडापुरतेच मर्यादित ठेवणे कार्यक्षमतेच्या दृष्टीने इष्ट होईल असा इशारा त्यांनी दिला (ऑक्टो. १९३७).

१९३८ च्या मुंबई साहित्य संमेलनाच्या वेळी संमेलनांच्या या प्रतिवार्षिक सोहळ्यातून महाराष्ट्र वाङ्मयास चिरस्थायी स्वरूपाचे काही कार्य निष्पन्न व्हावे अशी त्यांनी सूचना केली. विशिष्ट कालखंडातील उत्तम वाङ्मयास परिषदेने प्रशस्तिपत्रके द्यावीत असे त्यांनी सुचविले (एप्रिल १९३८, पृ. १०६). प्रांतिक सरकारे स्थापन झाली खरी, परंतु महाराष्ट्राची मात्र गळचेपी होत आहे, याविषयीही श्री. मो. शा. शहाणे यांनी आवाज उठविला. महाराष्ट्र हा स्वतंत्र प्रांत नाही, महाराष्ट्र विद्यापीठाची स्थापना नाही, महाराष्ट्राचे तेजस्वी वाङ्मय निर्बंधातच आहे, महाराष्ट्रीय बालकांवर परभाषा

अनुक्रमणिका

शिकण्याची सक्ती होत आहे, ही काही शल्ये त्यांनी सांगितली आहेत (ऑक्टो. १९३८). 'पत्रिके'च्या संपादकाला या काळात उद्विग्नतेने, क्रोधाने लिहिण्याचे जसे काही प्रसंग आले तसे काही आनंदाने, इतरांचे अभिनंदन करण्याचेही प्रसंग आले. हे काम श्री. मो. ज्ञा. शहाणे यांनी अगदी दिलखुलासपणे केले आहे. माधवराव पटवर्धनांना मिळालेली डी. लिट. ही पदवी, रियासतकार सरदेसाई यांचा चौऱ्याहत्तराव्या वाढदिवसाच्या निमित्ताने झालेला गौरव, कृष्णाबाई (मुक्ताबाई लेले) यांना त्यांच्या 'अनिरुद्ध प्रवाह' या कथासंग्रहासाठी मिळालेले तर्खड पारितोषिक इत्यादी घटनांचा श्री. शहाणे यांनी गौरव केला आहे.

परिषदेच्या मुखपत्रात "आज नभोवाणी व बोलपट ही दोन जबरदस्त साधने भाषेच्या संसारात घुसली आहेत आणि स्वभाषेच्या पुरस्कारार्थच जिचा अवतार त्या परिषदेस व तिच्या मुखपत्रास या साधनांमुळे मराठी भाषेवर काय सुपरिणाम वा दुष्परिणाम होत आहेत, तिच्या पोषणाकडे त्यांचा कितपत व कसा उपयोग करता येईल, व त्याबाबत आपले कर्तव्य काय याचा विचार करणे आवश्यक आहे." असे श्री. शहाणे यांनी म्हटले आहे (ऑक्टो. १९३७, पृ. २). नभोवाणीचा खेड्यापाड्यांतून प्रसार होणार आहे, लोकशिक्षणाचे ते प्रभावी साधन आहे, मुंबई नभोवाणीवर मराठीला जास्ती वेळ दिला पाहिजे, नभोवाणीवर साहित्यिकांचे प्रतिनिधी असले पाहिजेत, या मागण्या श्री. शहाणे यांनी नेटाने मांडल्या. बोलपट नियंत्रण समितीवर सरकारने आपला प्रतिनिधी घ्यावा म्हणून व्यासंगी साहित्यिक संस्थांनी जागरूक राहिले पाहिजे व चळवळ केली पाहिजे असेही श्री. शहाणे यांनी प्रतिपादिले आहे (फेब्रु. १९३८, पृ. ६३).

एखाद्या विद्यापीठाच्या 'रीसर्च जर्नल'सारखे 'पत्रिके'चे अंक असावेत हे ध्येय पुढे ठेवून अंकांचे संपादन करण्याचा प्रयत्न श्री. शहाणे यांनी केलेला दिसतो. त्यांच्या संपादकीय कारकीर्दीत 'पत्रिके'त भाषा, लिपी, व्याकरण, छंदःशास्त्र, साहित्यशास्त्र, वाङ्मयेतिहास, जुन्या वाङ्मयाचे संशोधन, परकीय अभिजात कलाकृतीचा अनुवाद, नवीन ग्रंथांची परीक्षणे, मराठीतील ग्रंथप्रसार इत्यादी विविध बाबींकडे लक्ष पुरविल्याचे दिसते. यातील कित्येक विषयांवरील लेखांवर उलटसुलट चर्चा प्रसिद्ध करून वादविवादांतून तत्त्वबोधालाही साहाय्य करण्यात आले आहे.

'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके'च्या ऑक्टोबर १९३७ च्या अंकात 'त्रिवेणी' मासिकातील श्री. व. वें. सुब्रह्मण्यम् यांच्या 'हिंदी अँड इंडियन नॅशनॅलिझम' या लेखाचा अनुवाद दिला आहे. या लेखात हिंदी भाषेसंबंधी देवनागरीसही अनोळखी अशा बंगाल, आसाम, ओरिसा, आंध्र, कर्नाटक वगैरे प्रांतांतील जनतेची बाजू जोमाने मांडली होती. या लेखाचा अनुवाद देऊन 'पत्रिके'च्या संपादकांनी 'अनृताचा प्रसार' चालविला आहे असा आक्षेप श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनी घेतला असता

अनुक्रमणिका

त्या आक्षेपाचे खंडन श्री. शहाणे यांनी केले आहे (फेब्रु. १९३८). 'पत्रिके'च्या याच अंकात 'राष्ट्रभाषा व राष्ट्रलिपी' या शीर्षकाखाली स्वातंत्र्यवीर सावरकरांनी महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या मध्यप्रांत शाखेच्या पहिल्या संमेलनात केलेल्या भाषणाचा सारांश दिला आहे. संस्कृतनिष्ठ हिंदी हीच राष्ट्रभाषा व लिपी देवनागरी हीच, पण मुद्रण-सौकर्याच्या दृष्टीने तीत काही सुधारणा केलेल्या असाव्यात असा त्यात इत्यर्थ आहे. या चर्चेच्या अनुषंगानेच राष्ट्रभाषेसाठी लिपी रोमन की नागरी, या विषयावर 'पत्रिके'ने जणू काही परिसंवादच भरवला (एप्रिल १९३८). भास्करराव जाधव व एस. सत्यमूर्ती यांनी रोमन लिपी असावी हा पक्ष घेतला. याउलट ना. के. बेहरे, चिं. ग. कर्वे, शं. दा. पेंडसे व 'महाराष्ट्र' वृत्तपत्र यांनी देवनागरीचे समर्थन केले. देवनागरी रोमन लिपीपेक्षा शास्त्रशुद्ध व परिपूर्ण आहे, सांस्कृतिक स्वाभिमानाचा विचार करता देवनागरीचा स्वीकार उचित आहे, हे तिच्या समर्थकांचे मुख्य मुद्दे होते. 'पत्रिके'च्या ऑक्टोबर १९३७ च्या अंकात 'नागरी लिपी सुधारणा' हे टिपण आले आहे. नागरी लिपी व अंक स्वस्तिक चिन्हावरूनच निर्माण झाले असावेत असे मत त्यात मांडले आहे. शिरोरेषा काढून टाकून स्वस्तिक चिन्हावरूनच बनविलेली सुटसुटीत स्वरचिन्हे तेथे दिलेली आहेत. 'पत्रिके'च्या फेब्रु. १९३८ च्या अंकात 'मराठी लघुलेखन' यावरही टिपण आले.

बोली भाषांवरही 'पत्रिके'तून अभ्यासपूर्ण लेख आले. कुडाळी लोककथा, कुडाळी म्हणी यांना स्थान मिळाले. कोकणी व अहिराणी या मराठीच्याच बोली आहेत हे सिद्ध करणारा श्री. कृ. पां. कुलकर्णी व श्री. ना. गो. चापेकर यांचा विस्तृत अहवाल प्रसिद्ध करण्यात आला (जुलै १९३८). 'भिलोडी कोकणी' या विषयावर श्री. चिं. ग. कर्वे यांनी टिपण लिहिले. खानदेश व सुरगणा संस्थानातील भिल्लांची बोली इतर भिलोडी बोलींपेक्षा मराठीला जास्त जवळची आहे, असे येथे दर्शविले आहे. गढवाली भाषेवर श्री. ना. गो. चापेकर यांनी लिहिलेला लेखही देण्यात आला आहे (जुलै १९३९).

श्री. मो. ज्ञा. शहाणे यांचे संपादक म्हणून नाव असलेल्या जुलै १९३७च्या अंकात व्याकरणविषयक विविध लेख आले आहेत. श्री. ना. गो. चापेकर यांनी व्याकरण परिषदेच्या स्वागताध्यक्षपदावरून केलेले भाषण येथे आहे. एकोणिसाव्या शतकात मराठी व्याकरणावर कोणी कोणी परिश्रम केले व त्यांचे स्वरूप कसे होते ते त्यांनी ऐतिहासिक व तुलनात्मक पद्धतीचा अवलंब करून सांगितले आहे. 'मराठी व्याकरणाच्या मांडणीचे वळण' या लेखात श्री. गो. कृ. मोडक यांनी 'हे वळण कोणते असावे? इंग्रजी, संस्कृत की स्वतंत्र?' याची चर्चा करून अमुकच एक पद्धती सर्वत्र अनुसरणे शक्य नाही तेव्हा सौकर्यावर दृष्टी ठेवून तिन्ही पद्धतींचा यथासंभव वापर करावा, असे सांगितले आहे. 'मराठी' भाषेस 'पाली'चा आधार या टिपणात श्री. ना. वा. तुंगार यांनी, मराठीत 'त्या वाटेने काटे फार आहेत' या वाक्यात 'वाटेने' या

अनुक्रमणिका

तृतीयेचा अर्थ ' वाटेत ' असा अधिकरणार्थी करावा लागतो, याला ' पाली ' भाषेचा आधार दिला आहे. पालीतसुद्धा सप्तमीच्या अर्थी तृतीया वापरतात हे त्यांनी ' कच्चायन ' व्याकरणातील ' विभत्तथा ' ( विभक्त्यर्थाः ) या प्रकरणात ' सत्तम्यत्थे च ' या सूत्राधारे स्पष्ट केले आहे. ' पाली 'तील ' तेन मग्गेन सप्पा होन्ति ' ( तस्मिन् मार्गे सर्पाः सन्ति ) हे उदाहरणही दिले आहे. ' पत्रिके 'च्या जुलै १९३९च्या अंकात ' मराठी शब्दोच्चारातील एक चमत्कार अर्थात वर्णविपर्यय ' हा लेख श्री. कृ. पां. कुलकर्णी यांनी लिहिला आहे. त्यात हेमचंद्राच्या एतद्विषयक सूत्रांची चिकित्सा केली आहे.

' पत्रिके 'त व्युत्पत्ती या अंगाकडेही लक्ष पुरविल्याचे दिसते. श्री. ना. गो. चापेकर यांनी ' व्युत्पत्तिविषयक ' या शीर्षकाखाली एक लेख लिहिला आहे. प्रत्येक शब्दाचे मूळ धातूत असले पाहिजे हा कित्येक संस्कृत व्युत्पत्तिशास्त्रज्ञांचा सिद्धान्त आहे, तो अस्थानी आहे. ज्याची व्युत्पत्ती करता येत नाही तो भाषेतील मूळचा शब्द. प्रथमावस्थेतील माणसाची भाषा अशा शब्दांनी झालेली असेल. हे अव्युत्पाद्य शब्द धातू असू शकतील वा नामेही असू शकतील, असे या लेखातील प्रतिपादन आहे. प्रा. वा. म. जोशी यांनी, शिरकाण या शब्दाचा अर्थ आपण कत्तल, सर्वनाश असा करतो पण तो शिरकंड, शिरखंड ( श्रीखंड म्हणजे चंदन या शब्दाचा अपभ्रंश ) असा आला असण्याची शक्यता सूचित केली आहे. शिर्के यांचे शिरकाण केले याचा मूळ अर्थ शिर्के यांचे चंदन केले, असा असावा, असे ते म्हणतात ( फेब्रु. १९३८, पृ १७ ). ' देवांचे गीर्वाण हे नाव ' या गो. कृ. मोडक यांनी लिहिलेल्या लेखात गीर्वाण शब्दाची ' गीः बाणः येषां ते ' ( शब्द हाच ज्यांचा बाण आहे ते ) व ' गीः वनः यस्य सः ' ( आमंत्रण ही इच्छा ज्याची–यज्ञात आमंत्रावे ही देवांची इच्छा ) अशा दोन प्रकारे व्युत्पत्ती सांगून, दुसऱ्या पर्यायाला मान्यता दिली आहे ( ऑक्टो. १९३९ ). याच अंकात ' मित्र आणि अमित्र ' हा असाच शब्दवेध घेणारा विद्याभूषण कृष्णशास्त्री घुले यांचा लेख आलेला आहे.

मराठी भाषा समृद्ध व्हावी म्हणून विविध ज्ञानशाखांतील पारिभाषिक शब्द ' पत्रिके 'तून देण्यात आले. तर्कशास्त्रीय परिभाषा ( फेब्रु. १९३८ ), पारिभाषिक शब्दकोश–अंतरिक्ष विज्ञान ( फेब्रु. १९३९ ), उद्भिद् विज्ञान परिभाषा–४० पारिभाषिक शब्दांचा संग्रह ( फेब्रु. १९३९ ), हे लेख याची साक्ष देतील.

वैनायक वृत्ताची चर्चा श्री. ना. ग. जोशी यांनी केली ( एप्रिल १९३८ ). दिंडी या पद्यप्रकाराची छाननी श्री. चिं. वा. वैद्य यांनी केली ( एप्रिल १९३९ ). श्री. ना. ग. जोशी यांच्या लेखावर श्री. भिकाजी वामन जोशी यांनी जे आक्षेप घेतले त्यांस श्री. ना. ग. जोशी यांनी ऑक्टोबर १९३८च्या अंकात उत्तर दिले. ' दिंडीची सोपपत्तिक गणनिश्चिती ' हा दिंडीवरील लेख श्री. कुंदरजी दिवाण यांनी लिहिला ( जुलै

१९३९ ). माधवराव पटवर्धन यांनी शब्दांचा नाददृष्ट्या विचार केला व शब्दाच्या नादात स्वयंसिद्ध अशी काही अर्थसूचकता असते ही समजूत निराधार आहे, असे प्रतिपादिले ( जून १९३९ ). पटवर्धनांच्या मताची साधकबाधक चर्चा ना. ग. जोशी यांनी केली ( जुलै १९३९ ).

'साहित्यशास्त्रातील रसव्यवस्था नि आस्वाद्यमानता' या कूट प्रश्नाची चर्चा करण्यात आली. रसाची स्थापना काव्यगत व्यक्तीच्या भावनेवर न करिता वाचकाच्या भावनेवर करणे तितकेसे विश्वसनीय नाही. "गिरीशांची 'शूर्पणखा' ऐकून लोकांना हसू येते तर माझ्या मनावर विषादाची छाया पसरते. रस हा वाचकवृत्तिनिष्ठ मानल्यास ती कविता हास्यरसाचीही म्हणता येईल आणि करुणरसाचीही म्हणता येईल." असे माधवराव पटवर्धनांनी म्हटले ( ऑक्टो. १९३७, पृ. १६ ). "रसव्यवस्था हे एक स्थूल मानाने केलेले कामचलाऊ वर्गीकरण आहे आणि ते शास्त्रशुद्ध करायला ज्या-प्रमाणे भावनेच्या मूलभूततेचा उपयोग होत नाही, त्याचप्रमाणे आस्वाद्यमानतेचाही उपयोग होत नाही. रसविवेचन हे कितीही पांडित्यपूर्ण वाटत असले तरी ते शेवटी शून्य संशोधनच ठरते!" ( पृ. १९ ) असे माधवरावांनी रोखठोकपणे सांगितले आहे. नारायणशास्त्री आठवले यांनी भट्टशंकरदेवकृत 'अलंकारमंजूषा' या ग्रंथाचा परिचय करून दिला आहे ( ऑक्टो. १९३९ ). 'कला आणि अश्लीलता' या लेखात काका कालेलकरांनी अश्लीलता ही हेतू, परिणाम आणि परिस्थिती यांच्यावर अव-लंबून असते. "अलिप्तपणे, अनासक्तपणे जो आनंद अनुभवणे शक्य असते तोच कलेचा विषय होऊ शकतो. जेथे हे तंत्र सांभाळले जात नाही तेथे विलासिता अथवा अश्लीलता ह्यांपैकी एकीचे वास्तव्य हे असावयाचेच" असे प्रतिपादिले आहे ( ऑक्टो. १९३७, पृ. ३१ ).

'महाराष्ट्र सारस्वतातील मद्रविभाग' हा वाङ्मयेतिहासाला पोषक असा लेख 'पत्रिके'च्या एप्रिल १९३८च्या अंकात प्रसिद्ध झाला. भास्करभट्ट बोरीकर यांचा 'मराठी पूजावसर'–वि. भि. कोलते ( ऑक्टो. १९३७ ), 'ज्ञानेश्वरीची राजवाडे प्रत – उत्तरार्धातील काही पाठभेद' – शं. दा. पेंडसे ( ऑक्टो. १९३८ ), अमरकोशा-वरील महाराष्ट्री टीका या ग्रंथाधारे 'प्राचीन मराठी शब्द'– नारायणशास्त्री आठवले ( जाने. १९३९ ) इत्यादी संशोधनपर लेखन 'पत्रिके'तून प्रसिद्ध झाले.

मिल्टनच्या 'पॅरॅडाइज लॉस्ट' या अभिजात कृतीचा ना. ग. जोशी यांनी जो भाग अनुवादित केला तो 'पत्रिके'त प्रकाशित झाला.

पुस्तक-परीक्षणे या सदरात 'व्यक्ति आणि वाङ्मय', 'छंदोरचना', 'मराठी भाषा उद्गम आणि विकास', 'जवाहरलाल नेहरू यांचे आत्मचरित्र ( भाषांतर )', 'कालिदासाची सृष्टी', 'व्यावहारिक ज्ञानकोश, भाग २' यांची मार्मिक परीक्षणे आली.

भोवतालच्या विचारप्रवाहांचे, घटनांचे 'पत्रिके'त प्रतिबिंब पडावे या श्री. मो. ज्ञा. शहाणे यांच्या दृष्टिकोणाचाही प्रभाव 'पत्रिके'च्या संपादनावर दिसतो. 'भूमिजनांचे रंजन व शिक्षण' ह्या नभोवाणीच्या संदर्भातील श्री. वा. रानडे यांचा लेख (ऑक्टो. १९३७), पुरोगामी वाङ्मयासंबंधी पु. य. देशपांडे, म. म. द. वा. पोतदार यांचे विश्लेषण (फेब्रु. १९३८) हे या संदर्भात उल्लेखनीय आहेत.

श्री. शहाणे यांचे लक्ष चौफेर आहे. विविध विद्यापीठांतील मराठीच्या अध्ययनाची सोय, डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी, पुणे हिने पारितोषिके दिलेल्या ग्रंथांची नावे, मुंबई इलाख्यातील ग्रंथप्रकाशन, मध्यप्रांत व मुंबई प्रांत यांतील आक्षिप्त व बंधमुक्त वाङ्मय, मुंबई विधिमंडळाच्या पावसाळी अधिवेशनात महाराष्ट्र विद्यापीठा-संबंधाने शि. ल. करंदीकर व ना. बा. गं. खेर यांत झालेली प्रश्नोत्तरे इत्यादी विविध बाबींचा समावेश ते 'पत्रिके'त करतात.

'वाङ्मयवार्ता' व 'साहित्यिकांचे विचार' ही दोन सदरे श्री. शहाणे यांनी सुरू केली. वाङ्मयवार्ता या सदरात पत्रिका निघण्याच्या कालखंडातील महत्त्वाचे वाङ्मयीन वृत्त देण्यात येत असे. 'साहित्यिकांचे विचार' या सदरात याच काळातील महत्त्वाच्या भाषणांतील वा लेखांतील वाङ्मयविषयक निवडक उतारे देण्यात येत. वास्तववाद, कलेचे सामाजिक कर्तव्य, पुरोगामी वाङ्मय, भाषाशुद्धीकरण या विषयावरील साहित्यिकांचे विचार या सदरात दिलेले आढळतात.

'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका' हे साहित्य परिषदेचे मुखपत्र असल्याने परिषदेच्या सभांच्या कामकाजाची, परीक्षांची, जमाखर्चाची, संलग्न संस्थांची वृत्ते, परिषदेत झालेली वाङ्मयीन चर्चा हे विषय तीत येत, हे स्वाभाविकच होते.

अशा रीतीने जुलै १९३७ ते ऑक्टोबर १९३९ या काळात श्री. शहाणे यांनी 'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके'च्या संपादनाची जबाबदारी पार पाडली. काकासाहेब लिमये, रा. सा. र. लु. जोशी, श्री. चिं. ग. कर्वे इत्यादींनी या कार्यात त्यांना पूर्ण सहकार्य दिले. 'पत्रिके'चे स्वरूप 'युनिव्हर्सिटी जर्नलसारखे भारदस्त असले पाहिजे, तिच्यात विद्वत्ताप्रचुर, संशोधनपर, मौलिक लेखन आले पाहिजेत. त्याजबरोबर भोवतालच्या समाजजीवनातील खळबळीचेही तिच्यात प्रतिबिंब पडले पाहिजे, ही श्री. मो. ज्ञा. शहाणे यांची 'पत्रिके'च्या संपादनामागील दृष्टी आहे.

माधवराव पटवर्धनांसारख्या बहुमिती असलेल्या साहित्यिक व्यक्तिमत्त्वानंतर श्री. मो. ज्ञा. शहाणे यांना 'पत्रिके'च्या संपादनाची जबाबदारी स्वीकारावी लागली. त्यांनी ती समर्थपणे पार पाडली आणि त्यांना मिळालेल्या अल्पकालीन संपादकीय अवधीतही 'पत्रिके'च्या संपादनावर त्यांनी आपल्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा उमटवला असे म्हणता येईल.

# २

## के. नारायण काळे यांचे पत्रिका-संपादन

### समालोचक : चंद्रशेखर वर्वे

के. नारायण काळे हे नाव उच्चारल्याबरोबर तत्काल डोळ्यांसमोर येते ती त्यांची रोख-लेली नजर, व ( बोलता बोलता मध्येच क्षणभर विलसणारे ) त्यांचे मंद स्मित. त्यांची नजर जणू सतत कशाचा तरी शोध घेत असावी आणि काहीतरी गवसल्याच्या आनंदानेच बहुधा त्यांची चर्या क्षणार्धात उजळत असावी ! काळ्यांनी संपादित केलेले ' पत्रिके 'चे अंक नुसते वरवर चाळले तरीदेखील त्यांची नजर व त्यांचे स्मित पानोपानी दिसत राहते.

के. नारायणांनी ' पत्रिके 'चे संपादन तीन कालखंडांत केले. जानेवारी १९४०–डिसेंबर १९४२, एप्रिल १९४६–सप्टेंबर १९४६, * जुलै १९६५–मार्च १९७०. या काळात के. नारायणांनी (जोड अंक धरून) ३४ अंकांचे संपादन केले. त्यांपैकी काही अंकांचे स्वरूप विशेषांकासारखे होते. उदाहरणार्थ, एप्रिल...१९४०–रत्नागिरी साहित्य-संमेलनाच्या निमित्ताने, एप्रिल...१९४१–सोलापूर साहित्य-संमेलनाच्या अनुषंगाने, एप्रिल...१९६६–केशवसुत जन्मशताब्दीच्या प्रसंगी आणि ऑक्टोबर १९६९ व जानेवारी...१९७०–( जोड अंक ) म. सा. परिषदेच्या हीरक महोत्सवाच्या वेळी. या सर्व अंकांतून समयोचित असे विशेष लेख आले होते.

विशेषांकांचे स्वरूप नसलेल्या इतर कित्येक अंकांतून विशेष उल्लेखनीय असे काहीतरी आढळतेच. उदाहरणार्थ, जानेवारी...१९४२–न्यायमूर्ती रानडयांचे चित्र, जुलै...१९४२–गोमटेश्वर व श्रवणबेळगोळ येथील कोरीव लेख यांची छायाचित्रे, जुलै...१९४६–केशवसुतांचे पत्र, ऑक्टोबर...१९६५–मोल्सवर्थचे हस्ताक्षर, जुलै...१९६६–केशवसुत ज्या शाळेत शिकले तेथील रजिस्टरचे पान–अर्थात केशवसुतांचे नाव ( मोडीत ) असलेले–त्याचे छायाचित्र, जुलै...१९६८ पासून ' शब्दवेध ' हे सदर, ऑक्टोबर...१९६९ व जानेवारी...१९७०–( जोड अंक )–परिषदेच्या हीरक-स्मृती–डॉ. भीमराव कुलकर्णी यांनी संपादित केलेल्या–हीरक महोत्सवातील स्मृतिचित्रांसह. अशा कितीतरी मौल्यवान

---

* मूळचे नियुक्त संपादक प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी अचानक राजीनामा दिल्यामुळे एप्रिल...१९६५ च्या अंकाचे काम के. नारायणांनीच पुरे केले होते.

अनुक्रमणिका

चिजा सहज हाती येतात.

तसे पाहिले तर के. नारायणांच्या काळातील प्रत्येक अंक हा काही 'विशेषांक' नव्हता आणि प्रत्येक अंकात 'विशेष चिजा' सापडतात असेही नाही. परंतु तरीही के. नारायणांनी संपादित केलेले अंक 'विशेषत्वा'ने भारलेले आहेत असेच प्रत्ययास येते. हे 'विशेषत्व' सामावलेले दिसते अंकांतील लेखांतून व परीक्षणांतून–त्यांच्या भरदारपणातून व वजनदारपणातून. पत्रिकेत येणाऱ्या 'काही लेखांतून तरी पुस्तकं तयार व्हावीत' ही के. नारायणांची पहिल्यापासूनच अपेक्षा होती (–जानेवारी...१९६७). 'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी'— गं. बा. सरदार, 'रुपेरी पडद्यामागे'–शरच्चंद्र गुण्ये, 'आर्ट्स अँड मॅन'–वा. सी. मर्ढेकर–यांचे भाषांतर–रा. भि. जोशी, 'नाट्याचार्य देवल'–श्री. ना. बनहट्टी, 'केशवसुतांची काव्यदृष्टी'– दि. के. बेडेकर...अशा काही पुस्तकांच्या योगाने के. नारायणांची अपेक्षा काही अंशी तरी फलद्रूपही झाली. ही वस्तुस्थिती असली तरी अनेक लेखांतून पुस्तके तयार झाली नाहीत अथवा असंख्य लेख पुस्तकांतून पुन्हा आले नाहीत हेसुद्धा खरेच आहे. तथापि या साऱ्या लेखांचे स्वरूप असे होते की, त्यांच्या योगाने 'पत्रिके'च्या एखाद्या सुट्या अंकालाही ग्रंथगौरव प्राप्त व्हावा.

आशयघनतेइतकेच विषय-वैविध्यदेखील लक्ष वेधून घेते. काळ्यांनी संपादित केलेले अंक कालक्रमाने आपण पाहत गेलो म्हणजे कितीतरी तऱ्हतऱ्हांचे लेख दिसू लागतात— इंग्रजीतून आलेले नवे शब्द, शब्दव्युत्पादन, घटकर्पर काव्यावरील टीका, स्त्रियांच्या म्हणी, जुने लोकाचार, समाजशास्त्राभ्यासाचे साधनकण, कालिदासीय वनस्पती, सौंदर्यमीमांसा, राष्ट्रकूटकालीन मराठी, महाभारत व आर्या छंद, साहित्य-संमेलनातील चर्चा, अखिल भारतीय शास्त्रीय परिभाषा, नागरी लिपी, संहिताचिकित्सा, पहिला ज्ञात मराठी शिलालेख, ध्वनी व त्यांचे अर्थ, ग्रंथसंपादन, महाराष्ट्रातील धार्मिक जीवन, अनुस्वारमीमांसा, साहित्याचे नियोजन, मराठीतील मूर्धन्य, शास्त्रीय साहित्य, प्राचीन मराठीतील शब्द, कुंतीची संतती, मराठी नियतकालिके व ग्रंथसमीक्षा, मोल्सवर्थचा कोश, वृत्तविद्या, कालिदासीय प्राणिसृष्टी, ज्ञानेश्वरीतील कूटस्थळे, ऐतिहासिक कादंबरी, मराठीचा महाकोश, शेक्सपिअर व शॉ, आंद्रे मोरवा, कैलासम यांचे साहित्य, बखर वाङ्मय, मराठीसाठी रोमन लिपी, मराठी व्याकरणातील संयुक्त क्रियापदे, हिंदी रंगभूमी, ध्वनिशास्त्र व संगीत, वाङ्मयविद्या, सौंदर्यवस्तूचे संघटन, पाठचर्चा...असे किती तरी! (नित्याचे साहित्यिक विषय आहेतच; वानगी देताना ते हेतुतःच गाळले आहेत.)

हे वैचित्र्य योगायोगाने आलेले नसावे! त्याच्या मुळाशी काळ्यांचे विशिष्ट संपादकीय धोरण असलेच पाहिजे! 'पत्रिके'चे संपादन हाती आल्याबरोबरच पहिल्याच अंकात काळ्यांनी लिहिले—'पत्रिके'चा वाचकवर्ग हा एकजिनसी नाही. तेव्हा पत्रिकेचे अंतरंग सार्वजनिक...व सामवायिक झाले पाहिजे...म. सा. पत्रिका अखिल साक्षर महाराष्ट्राचे मुखपत्र व्हावयास पाहिजे असेल तर तिचे स्वरूप प्रातिनिधिक झाल्याशिवाय गत्यंतर नाही.

हे साध्य करण्याच्या दृष्टीने व दिशेने प्रयत्न राहतील...( जानेवारी...१९४० ). या दृष्टीने ललित वाङ्मयाचाही अंतर्भाव काळ्यांनी करून बघितला; पण पुढे हा नाद त्यांना सोडूनच द्यावा लागला. याची बोच काळ्यांच्या एका संपादकीयातून लक्षात येते. (–जानेवारी... १९६८ ) हे जमेला धरूनसुद्धा, 'पत्रिका' सामवायिक टेवण्याचा काळ्यांचा प्रयत्न बहुतांशी यशस्वी झाला असेच म्हणावयास हवे. नाट्य-चित्र ही आपली व्यक्तिगत आवड त्यांनी संपादनाच्या वेळी आड येऊ दिली नाही म्हणूनच ते यश संपादू शकले.

'पत्रिके'तील पुस्तक-परीक्षणांच्या बाबतीतही काळ्यांनी काही जाणीवपूर्वक करण्याचे ठरविले होते : दैनिके, साप्ताहिके, मासिके यांपेक्षा वेगळी परीक्षणे – मोजक्या निश्चित शब्दांत ओळख करून देणारी, मूल्यमापन करणारी परीक्षणे – हा 'पत्रिके'चा विशेष म्हणून राहावा अशी काळ्यांची अपेक्षा होती ( जानेवारी...१९४० ). ही अपेक्षा चांगल्या रीतीने पुरी होईलच होईल अशी पुष्कळ परीक्षणे सुदैवाने 'पत्रिके'स मिळत गेली. सामान्यतः ही सर्व परीक्षणे विशिष्ट पातळी न सोडणारी, दर्जेदार, कसदार अशीच असल्याचे निदर्शनास येते. ... भरपूर पृष्ठसंख्येमुळे नव्हे तर दर्जा, कस या गुणांमुळेच 'पत्रिके'चा परीक्षणविभाग, काळ्यांच्या कारकीर्दीत तरी, अगदी भरगच्च स्वरूपात पाहावयास मिळतो हे आवर्जून नमूद करावयास हवे.

लेखांप्रमाणेच पुस्तकपरीक्षणांतही विविधता खूपच आढळून येते. आपण कालक्रमाने बघत गेलो तर बहुविध पुस्तकांची परीक्षणे आलेली दिसत जातात. हिस्टरी ऑफ माडर्न मराठी लिटरेचर, सौंदर्यलहरी, लोकहितवादींचे चरित्र, हिंदूंच्या सामाजिक संस्था, मधुलहरी, भग्नमूर्ती, विचारसौंदर्य, श्रुतिगुणनाटिका, वाङ्मयीन महात्मता, स्मृतिचित्रे, टिळकांची कविता, सहवास, संस्कृतिसंगम, पेशवे दप्तर, पुरोगामी साहित्य, उपेक्षितांचे अंतरंग, खांडेकर–चरित्र आणि वाङ्मय, विशाखा, रात्रीचा दिवस, स्मृतिलहरी, देवमाणूस, वाट पाहता लोचन, पथिक, पु. ग. सहस्रबुद्धे-व्यक्तिदर्शन, आनंदयात्री रवींद्रनाथ, बाजी आणि डॅडी, आधुनिक मराठी काव्यातील अंतःप्रवाह, महाराष्ट्राचे महामंथन, रंगबावरी, विश्वकोश-परिचय, काव्यचिकित्सा, भारतीय नाट्यप्रयोगविज्ञान, प्राचीन मराठी पंडिती काव्य, प्रिय आणि अप्रिय, वनफूल, जैत रे जैत, गारंबीचा बापू व यशोदा-नाटके, मोहिनी, ज्ञानेश्वरी–१–भीमतोपणी व्याख्या, कोकणी ऑफ दि कॅनरा, आरोग्य आणि आहार, सिनिकथा, मातीखालची माती, नाटककार खाडिलकर, ॲरिस्टॉटल चरित्र, वालचंद हिराचंद, टीकाविवेक, रायगडची जीवनकथा, प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास, कोलाम, चंबळची दस्यूभूमी, हाजीपीर, एक हट्टी मुलगी, विदूषक, माझे विद्यापीठ, गाणे, इतिहासाचे तत्त्वज्ञान, हेगेल–जीवन व तत्त्वज्ञान, हिंदुसमाज–संघटना व विघटना, मराठी आरती, मुसलमान मराठी संतकवी, केशवसुतांची काव्यदृष्टी, संचय, मृत्युंजय, बॅरिस्टर अनिरुद्ध धोपेश्वरकर, खळाळ, संध्याकाळच्या कविता, रानातल्या कविता, पौराणिक भागवतधर्म, प्रतिभाविलास, कालिदासदर्शन, पड्जगांधार, आनंदी गोपाळ, बाजे पाउल आपुले,

गणेशकोश, विविध-ज्ञान-विस्तार सूची, ज्ञानदेव वाङ्मय-सूची, पोर्तुगीज-मराठे, प्राचीन मराठी जैन साहित्य, मराठी नियतकालिकांची सूची, स्मृतिधन...इत्यादी. 'पत्रिके'ला (काळयांच्या काळापुरते तरी) कोणत्याही वाङ्मयप्रकाराचे वावडे नव्हते हेच या यादीवरून सिद्ध होते.

वार्षिक समालोचनातून महत्त्वाची पुस्तके लक्षात घेतली जातात, यात काही विशेष नाही. परंतु त्या त्या वर्षातील सर्व प्रकारच्या महत्त्वाच्या पुस्तकांची दखल घेतली जावी व तीही शक्यतो लवकर घेतली जावी, यासाठी काळ्यांनी अगदी कोशीस केली असली पाहिजे ... अर्थात परीक्षणांच्या बाबतीत काय किंवा लेखांच्या बाबतीत काय, त्या त्या काळातील मराठीच्या प्राध्यापकांनीच केवळ नव्हे तर ना. गो. चापेकर, अ. ज. करंदीकर, द. वा. पोतदार, चिं. ग. कर्वे, न. चिं. केळकर, बा. सी. मर्ढेकर, श्री. के. क्षीरसागर, य. रा. दाते, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, न. र. फाटक, वि. भि. कोलते, श्री. ना. बनहट्टी, अ. का. प्रियोळकर, दि. के. बेडेकर, रा. चिं. ढेरे, अशोक केळकर, वा. वि. मिराशी, शं. दा. पेंडसे यांच्यासारख्या विद्वानांनी (ही नावे मुख्यतः लेखांच्या संदर्भातच घ्यावयाची...) तत्परतेने सहकार्य-साहाय्य दिले, म्हणूनच काळे काही भरीव कामगिरी करून दाखवू शकले, हे स्पष्टच आहे.

प्रसंगी स्वतः काळ्यांनीही लेख वा परीक्षणे लिहून तातडीची निकड भागवलेली दिसते. पण यापेक्षा काळयांनी लिहिलेली संपादकीय स्फुटे अधिक लक्षणीय वाटतात. वस्तुतः प्रारंभी, संपादकीय धोरण व्यापक, पक्षभेदातीत ठेवण्यासाठी, काळे संपादक म्हणून प्रचलित विषयावर मतप्रदर्शन करण्याचे टाळत आले होते, परंतु पुढे, प्रामुख्याने १९६५ पासून काळ्यांनी मतप्रदर्शनवजा लिहिण्यास सुरुवात केलेली दिसते. त्यांची स्फुटे प्रासंगिक असली तरी विचारपरिप्लुत असल्यामुळे चिरकाल उद्बोधक ठरणारीच वाटतात. उदाहरणार्थ, महामंडळाने काय करावे?, हैदराबाद साहित्य-संमेलन, भारतीय ग्रंथसंरक्षण कायदा—शताब्दी..., चांगल्या साप्ताहिकाची गरज, 'आरंभ'—कवितासंग्रहाचे स्वागत, पारितोषिके व पुलिट्झर-पुरस्कार, केशवसुत जन्मशताब्दी, भांडारकर इन्स्टिट्यूटची महाभारत-आवृत्ती, भारतीय भाषासंस्था, वॉल्ट डिझ्ने, शंकर पाटील यांच्या ('देणा') कथेने उठवलेले वादळ, सरकारी मानधन, भूकंप, विज्ञानपरिषद, कै. बाबूराव पेंढारकर, आचार्य अत्र्यांची सत्तरी, व्याख्याने व त्यांचे वृत्तान्त, अनुवाद योजना, डॉ. झाकीर हुसेन... या स्फुटांतून संपादक काळयांची जागरूकता, त्यांच्या विचारांतील व्यापकता, त्यांच्या दृष्टिकोणांतील विधायकता, त्यांची मनःपूर्वकता या सगळयांची पुरेपूर जाणीव होते आणि यामुळेच काळ्यांची प्रासंगिक स्फुटे चिरकाल वाचनीय ठरतात.

प्रसिद्ध होणाऱ्या मजकुरावरील इतरांच्या प्रतिक्रियांची उपेक्षा काळ्यांनी कधीच केली नाही; किंबहुना क्वचित प्रखर परामर्श घेण्यासही त्यांनी कमी केले नाही. उदाहरणार्थ, 'ज्ञानप्रकाश' व 'सह्याद्रि'—मधील टीकेचा समाचार (— एप्रिल ... १९४०),

श्री. द. लिमये व चिं. पां. वर्वे यांच्या म्हणण्याचे खंडन ( – जुलै...१९४०), 'झंकार' व 'समीक्षक'-मधील टीकेची दखल ( – जानेवारी...१९४१ ). पुढे पुढे, १९६७ पासून, काळयांच्यात किंचित सौम्यपणा आला असावा; आणि म्हणूनच वहुधा वाचकांची मूळ पत्रेच प्रकाशित करून ते थांवले असावेत !

तीन कालखंडांतील काळयांचे संपादन वघता असे दिसते की, वाह्यतः त्यात काही फेर-वदल झाले. ( ते वर वेगवेगळ्या ठिकाणी नोंदवले आहेत ); पण संपादनाचा गाभामात्र वदललेला नाही. लेख व परीक्षणे यांच्या वावतीतील काळयांचे धोरण कायमच राहिले. प्रारंभीचा उत्साह पुढे–१९६५ नंतर–काहीसा ओसरल्यासारखा वाटला तरी संपादनातील काळयांची आंतरिक एकसंधता लवमात्र उणावलेली नाही.

असे असल्यामुळेच काळयांच्या संपादनावद्दल प्रा. रा. श्री. जोग, डॉ. स. गं. मालशे यांनी काढलेले गौरवोद्गार सार्थ ठरतात. काळयांच्या निधनानंतर त्या वेळचे 'पत्रिके'चे संपादक डॉ. भालचंद्र फडके यांनी संपादकीयात लिहिले होते ... "अशा दीर्घ काळात के नारायणांनी पत्रिकेचे संपादन अतिशय कुशलतेने केले. जवळजवळ वीस अंकांचे संपादन त्यांनी केले. ( वस्तुतः एकंदर चौतीस अंकांचे संपादन के. नारायणांनी केले होते. ) हे अंक वाचीत असताना त्यांच्या चिकित्सक टीकादृष्टीचा, पाश्चात्त्य साहित्याच्या व साहित्यविचाराच्या परिशीलनामुळे आलेल्या डोळसपणाचा प्रत्यय येतो... " (–एप्रिल...१९७४ ) डॉ. फडके यांची ही विधाने म्हणजे के. नारायणांची उचित संपा-दकीय प्रशस्तीच नव्हे काय ?

के. नारायण काळे गेले तरी त्यांची नजर व त्यांचे स्मित अजून डोळ्यांसमोरून जात नाही. तसेच त्यांनी संपादित केलेले 'पत्रिके'चे अंक चाळून, मिटून ठेवले तरी त्यांची मुद्रा मनातून उतरत नाही—के. नारायणांसारखीच, त्यांनी संपादित केलेल्या 'पत्रिके'च्या अंकांची मुद्रा दिसते—घवघवीत व प्रभावी !

## परिषदेचे नवे आजीव सभासद ( स्थानिक )

प्रा. सौ. अंजली सोमण, श्री. दि. वा. संगमनेरकर, सौ. सुमतीवाई संत, डॉ. अरविंद वा. संगमनेरकर, श्रीमती मंदाकिनी पाटक, प्रा. प. शं. पुरंदरे, श्री. पी. व्ही. साठे, श्री. म. दा. रानडे, श्री. रजनी वि. करंदीकर, कु. शालिनी शां. नाडकर्णी, श्री. चिं. रा. वोंद्रे, श्री. व. कृ. ऐनापुरे, श्री. क. भि. भांडारकर, प्रा. डॉ. ज. वा. जोशी, प्रा. व. मा. मिरासदार, श्री. भी. ज्ञा. जोशी, डॉ. म. प. पेठे, श्री. हे. व. कटककर, श्री. चिं. श्री. नातू, डॉ. कृ. ज्ञा. भिंगारकर, श्री. प्र. ग. ओक, डॉ. कृ. ना. नाईक, श्री. शि. दे. उराडे, श्री. गो. नी. दांडेकर, श्री. सु. गो. जुन्नरकर, श्री. मा. ग. दाते, श्री. श. शं. जोशी, डॉ. दुर्गा दीक्षित, श्री. ना. र. आठवले.

अनुक्रमणिका

# ३

## प्रा. रा. श्री. जोगांनी संपादिलेली पत्रिका

### समालोचक : श्रीलेखा साने

---

'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके'ची सुमारे अर्धशतकाची वाटचाल पूर्ण झाली आहे. 'महाराष्ट्र-साहित्य-परिषद' आणि 'महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका' या नावांना आज बरीच प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. अनेक साहित्यप्रेमी विचारवंतांची साहित्यसेवा येथे रुजू झाली आहे. त्यांचा वेळोवेळी व्यक्त झालेला मातृभाषाभिमान, संशोधक बुद्धी, व्यासंगी वृत्ती, इतर भाषाभगिनींबद्दलचा जिव्हाळा, एकंदर साहित्याकडे पाहण्याचा उदार दृष्टिकोण इ. गोष्टी या संस्थेच्या आणि पत्रिकेच्या मागे उभ्या असलेल्या दिसतील. ज्यांचे लेखनसाहाय्य पत्रिकेला लाभले त्यांचा वाटा तर मोलाचा आहेच, पण पत्रिकेला लाभलेली संपादकांची परंपराही महत्त्वाची आहे. श्री. ना. गो. चापेकर या पहिल्या संपादकापासून सुरू झालेल्या या परंपरेत डॉ. माधवराव पटवर्धन, श्री. मो. ज्ञा. शहाणे, म. म. द. वा. पोतदार, श्री. के. नारायण काळे, श्री. श्री. म. माटे, कविवर्य यशवंत, प्रा. रा. श्री. जोग, डॉ. वि. भि. कोलते, डॉ. रा. शं. वाळिंबे इ. अनेक मान्यवर व्यक्तींची नावे घेता येतील.

वर्ष १६ ते १८, जानेवारी १९४३ ते १९४६, एकूण तेरा अंक आणि वर्ष २४, एप्रिल १९५१ ते मार्च १९५२, एकूण दोन अंक, असे एकंदर पंधरा अंकांचे संपादन प्रा. रा. श्री. जोग यांनी केले होते. या अंकांचे एकंदर स्वरूप म्हणजे त्यात आलेले विषय, चर्चिले गेलेले प्रश्न पाहता त्यांतील विचारांची व्यापकता आणि सर्वंकषता ध्यानात येते. साहित्यसमीक्षा, धर्म, व्युत्पत्तिशास्त्र, भाषाशास्त्र, शुद्धलेखन, चित्रपट, वृत्तचर्चा, इतिहास, तत्त्वज्ञान इ. विविध विषयांवरील अभ्यासपूर्ण लेखांनी पत्रिका भरलेली दिसते. तिचे हे विद्वज्जड स्वरूप अल्पसंख्य का होईना, पण नवकणिका, रुबाया, विविध प्रांतीय लोकगीते, नाट्यकाव्य, व्यक्तिचित्र, ललितलेख यांमुळे काहीसे मनोरंजक झाले आहे. 'देवांना आम्ही जन्म देणार' या कै. वा. म. जोशी यांच्या लेखातून दैववाद व निराशावाद अयोग्य, अनिष्ट असून बुद्धिवाद, प्रयत्नवाद यांची तरफदारी व 'आदर्श व्यक्ती हाच देव' अशी भूमिका व्यक्त झाली आहे. अंधश्रद्धा, दैववाद, मनोदौर्बल्य यांनी पछाडलेल्या सर्वसामान्य मानवसमाजासाठी हा सुंदर संस्कार आहे. काव्याचे शुद्धत्व, कला आणि नीती, रसचर्चा,

अनुक्रमणिका

बोलभाषांचा प्रश्न, व्युत्पत्तिविचार, ऐतिहासिक भाषाशास्त्र, काव्य आणि गेयता, मराठी भाषेची पायमल्ली, वाङ्मयीन टीकेची उद्दिष्टे, मुक्तपद्यविवेक, महाकाव्याची अनिर्मिती इ. साहित्यविषयक लेखांवरून संपादकांचा साक्षेप दिसून येतो. मराठीचा साहित्यसंसार, वार्षिक साहित्य समालोचन, इतिहास परिषद-साहित्यसंमेलने यांचा वृत्तान्त, विविध अध्यक्षीय भाषणांचा संकलनात्मक समाचार, गेल्या सत्तर वर्षांतील शारदोपासना, महाराष्ट्र रंगभूमीचा शताब्दी–महोत्सव यांसारख्या लेखांनी पत्रिकेला ऐतिहासिक अभ्यासाचे साधन म्हणून महत्त्व प्राप्त करून दिले आहे. ज्ञानेश्वरांचा तोतया, आठशे वर्षांमागील एक अज्ञात मराठी लेख या लेखांनी पत्रिकेची संशोधनपर मूल्याची शान वाढविली आहे. केशवसुत, डॉ. माधवराव पटवर्धन, दोन राजकवी ( चंद्रशेखर आणि तांबे ) यांसारख्या साहित्यक्षेत्रातील काही अग्रणींची अभ्यासपूर्ण दखलही घेतल्याचे आढळते. तसेच, परीक्षणे, विविध प्रांतांतील साहित्यवार्ता, परिषद-वार्ता, संलग्न संस्थावृत्त, भाषाभगिनींचा साहित्यसंसार इ. लहानमोठी माहितीपूर्ण व अभ्यासपूर्ण सदरे पत्रिकेच्या व्यापक दृष्टिकोणाची स्पष्ट कल्पना देतात. 'परीक्षणे' या सदरात विविध विषयांतील प्रसिद्ध ग्रंथांचा समाचार रसिकतेने आणि परखडपणे घेतलेला दिसतो. त्यातही केवळ साहित्यविषयक पुस्तकांच्या मर्यादेची झापड लावून संकुचित दृष्टी व्यक्त न करता सर्व विषयांचा समावेश केला आहे. धर्म, तत्त्वज्ञान, कायदा, समाजशास्त्र, मानसशास्त्र, इतिहास, राज्यशास्त्र, साहित्यशास्त्र, ललित साहित्य-कथा, काव्य, कादंबरी, नाटक, प्रवासवर्णन, लघुनिबंध, चरित्र, स्वभावचित्र, बालवाङ्मय इ. विषयांची विविधता दृष्टोत्पत्तीस येते. मानवी जीवनाच्या विविध अंगांचे विविध पैलू यातील पुस्तकांच्या निमित्ताने वाचकांच्यापुढे ठेविले आहेत. हे सर्व विषय कमी-अधिक प्रमाणात साहित्याशी संबंधित असल्याचा प्रत्ययही वाचकांना आल्याशिवाय राहत नाही. मानवी संस्कृतीच्या विविध अंगांचे पत्रिकेतील हे दर्शन पाहून वाटते की, हिला 'साहित्य-पत्रिका' असे म्हटले असले तरी तिचे विराट दर्शन 'संस्कृति-पत्रिके'चे आहे. 'साहित्य-पत्रिका' हे नामाभिधान दिल्यामुळे तिच्यातील साहित्याचे महत्त्वाचे स्थान स्पष्ट होते. परंतु साहित्याचा अलग प्रांत नसून संस्कृतीच्या संदर्भातील हा एक महत्त्वाचा दुवा आहे, याचेही भान राहते. आणि पत्रिकेची साहित्याकडे पाहण्याची व्यापक दृष्टी प्रत्ययाला येते. या उदार धोरणाचा उलगडा झाल्यावर इतर भाषाभगिनींच्या साहित्यसंसाराचे चित्र पत्रिकेत रेखाटण्याचे औचित्य पटते.

पत्रिकेच्या शंभराव्या खास अंकाचा वेगळा नामनिर्देश करायला हवा. या अंकात काव्य, कादंबरी, लघुकथा, चरित्र, टीका, भाषाशास्त्र, व्याकरण, नाट्य, भौतिक शास्त्रवाङ्मय इ. विविध महत्त्वाच्या वाङ्मयविषयांच्या क्षेत्रातील तत्कालीन स्थिती, स्वरूप आणि तद्विषयक इष्ट दिशा यांबाबत विवेचन करणाऱ्या लेखांचा अंतर्भाव करण्यात आला आहे.

या साऱ्या अंकांतून कोणते प्रश्न चर्चिले गेले आहेत याचे स्थूलमानाने दिग्दर्शन करणे रास्त ठरेल. 'चित्रपट आणि सार्वजनिक सदभिरुची' हा विषय 'कला आणि नीती' या

गाजलेल्या वादाशी संबद्ध आहे. चित्रपट हे मनोरंजनाचे महत्त्वाचे आणि प्रभावी साधन आहे, हे खरे. पण ते कलेचे सामुदायिक स्वरूप असून अभिरुचीच्या दृष्टीने त्यालाही काही सामाजिक बांधिलकी आहे. याबाबत पुरेशा शास्त्रीय दृष्टीचा अभाव असल्याची रास्त तक्रार ~ लेखात केलेली आहे. इतिहास–परिषदेच्या अध्यक्षीय भाषणात, समाजाच्या ( पर्यायाने साहित्याच्या ) दृष्टीने इतिहासासारख्या विषयाचे ज्ञान हवे, असा आग्रह आढळतो. ' रस-चर्चा ' या डॉ. के. ना. वाटवे यांच्या पुस्तकाच्या परीक्षणात शास्त्रशुद्धतेचा आग्रह कटाक्षाने पाळायला हवा, अशी सूचना करून रसात्मतादाशी निगडित असलेल्या प्रश्नांची मानसशास्त्रीय बैठकीवरून मीमांसा केलेली आहे. याचबरोबर, समाजजीवनाच्या इतिहासात नियत-कालिकांचे महत्त्व, श्लील-अश्लील, संतवाङ्मयाचे पुरोगामित्व, आंतरराष्ट्रीय राजकारण आणि वाङ्मय यांचा संबंध, सामाजिक व साहित्यिक प्रश्नांकडे पाहण्याचा मार्क्सवादी दृष्टिकोण, संगीत नाटकांवरील आक्षेप, नवे जग आणि क्रांती यांच्या संदर्भात साहित्यिकांची जबाबदारी, नवमतवाद, मराठीसाठी स्वतंत्र विद्यापीठ, भाषा आणि लिपि–शुद्धी इ. प्रश्न चर्चिले गेले आहेत. ही यादी बरीच वाढविता येईल.

यानंतर ' संपादकीय ' या सदराकडे वळायला हवे. संपादकांची भूमिका, साहित्याकडे पाहण्याची त्यांची दृष्टी, तत्कालीन समाज व साहित्यक्षेत्रातील महत्त्वाच्या घडामोडी अशा महत्त्वाच्या बाबी संपादकीयातून व्यक्त होत असतात. प्रा. जोग यांचे प्रत्येक अंकातील ' संपादकीय ' बोलके आहे. इ. स. १९४३ च्या चौथ्या अंकातील ' संपादकीय 'मध्ये त्यांनी पत्रिकेतील प्रत्येक लहानमोठ्या सदरामागे ' वाङ्मयीन उपयुक्तता ' हीच दृष्टी असल्याची ग्वाही दिली आहे. त्याचबरोबर पत्रिकेत विद्वत्ताप्रधान लेखांना ( ज्यांना अन्यत्र सहसा स्थान उपलब्ध नसते ) प्राधान्य देण्याची भूमिका स्पष्ट केली आहे. अशा लेखांना-सुद्धा वाङ्मयीन उपयुक्तता असते ही अभावाने आढळणारी दृष्टी समाजाला यावी, हा त्यामागील हेतू असावा, असे वाटते.

चांगल्या ग्रंथांवर विस्तृत परीक्षणे देण्याबाबत पत्रिकेने मिळविलेल्या ख्यातीचा प्रा. जोग यांनी समाधानाने आणि अभिमानाने निर्देश केला आहे. परंतु, मराठीत प्रसिद्ध होणारी अनेक पुस्तके पत्रिकेकडे येत नाहीत, या प्रत्यक्ष अनुभवाबद्दल खंत व्यक्त केली आहे. मराठी भाषा आणि साहित्य यासंबंधी काम करणाऱ्या महाराष्ट्र साहित्य परिषदेसारख्या मध्यवर्ती संस्थेबद्दल प्रथितयश साहित्यिकांनी दाखविलेल्या अनास्थेबद्दल त्यांना वैषम्य वाटले होते. पत्रिकेतील वार्षिक साहित्य-समालोचने अधिकाधिक निर्दोष व संपूर्ण होण्यासाठी सर्व प्रकारची पुस्तके परिषदेकडे यावीत, असे आवाहनही त्यांनी केले होते. या सर्व लेखनांतून त्यांना साहित्याबद्दल वाटणारा जिव्हाळा व कळकळ व्यक्त होते.

तत्कालीन महत्त्वाच्या साहित्यिक घडामोडी व घटना यांची केवळ नोंद न करता प्रा. जोग त्यांची अगत्याने दखल घेतात. ' समीक्षक ' या मासिकाचे पुनरुज्जीवन होणे ही गोष्ट त्यांना मराठी वाचकाच्या साहित्यविषयक आस्थेचे द्योतक वाटते. महाराष्ट्र, प्रतिभा, वसंत

आणि महाद्वार या नव्या मासिकांचे दिलदार स्वागत त्यांनी केले आहे. युवक साहित्य संमेलनाच्या सवत्यासुभ्याची अनावश्यकता प्रतिपादन करण्यामागे, साहित्यक्षेत्रात दुही न माजता एकी नांदावी, अशी त्यांची भावना दिसते. श्री. य. खु. देशपांडे यांच्या जुन्या महानुभाव वाङ्मयाच्या उद्धाराच्या कार्याची त्यांनी आवर्जून दखल घेतली आहे. एवढेच नव्हे तर गाजावाजा न करता प्रकाशित झालेल्या श्री. शं. ग. दाते यांच्या वाङ्मयसूचीचे महत्त्व प्रतिपादन केले आहे आणि त्या कार्याबद्दल त्यांचा गौरव केला आहे. ' किर्लोस्कर ' मासिकाला पंचवीस वर्षे पूर्ण झाल्याबद्दल त्याचे अभिनंदन करून त्याने केलेल्या समाज-सेवेची व साहित्यसेवेची त्यांनी मनःपूर्वक प्रशंसा केली आहे. विरोध व निंदा सहन करून नवी दृष्टी, नवे विचार यांचा प्रचार व प्रसार इतकी वर्षे सातत्याने करणे ही मराठी मासिकांच्या इतिहासातील दुर्मिळ गोष्ट आहे, हे जाणून भविष्यकालातील ' किर्लोस्कर'च्या कार्यासाठी त्यांनी शुभचिंतन व्यक्त केले आहे.

मर्ढेकरांच्या प्रयोगशीलतेला म. सा. पत्रिकेत स्थान मिळाले आहे. "त्यांच्या ' कर्ण ' (म. सा. प., १९४४, अं. १) या नाट्यकाव्याच्या निमित्ताने 'इंग्रजी ऑपेराच्या धर्तीवर नाटयकाव्याचे नवे दालन मराठी कवितेच्या क्षेत्रात उघडले आहे," असा अभिप्राय देऊन जोगांनी त्याचे स्वागत केले आहे. कंसात काव्यनाटय असा शब्द घालून नाटयकाव्य की काव्यनाटय असा प्रश्न जाता जाता निर्माण करून वाचकाच्या बुद्धीला, विचारांना चालनाही दिलेली दिसते. विविध भाषांच्या परस्परपरिचयासाठी व जिव्हाळ्याच्या सह-कार्यासाठी देवनागरी या एकाच लिपीचा पुरस्कार करण्याची सूचनाही प्रा. जोग करतात. साहित्यनिर्मितीसाठी संघटनेची आवश्यकता आहे का, हा नवा आणि वेगळा प्रश्न उपस्थित करून त्यांनी तो आपल्या कुशल न्यायबुद्धीने हाताळला आहे. सामाजिक व राजकीय परिषदांतील भांडणे साहित्य परिषदेच्या व्यासपीठावरून भांडण्याच्या रूढ होऊ पाहणाऱ्या अनिष्ट प्रथेला वेळीच पायबंद घातला पाहिजे, असे ते निक्षून सांगतात, तेव्हा महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विशुद्धतेबद्दल ते किती जागरूक होते, याचा पडताळा येतो. साहित्याच्या क्षेत्रातील अराजक नष्ट व्हावे असे कोणत्याही साहित्यप्रेमी व्यक्तीस वाटणारच. पण त्यासाठी साहित्याचे नियोजन व्हावे, असे प्रा. जोगांना वाटत नाही. एकतर ' साहित्य = ललित वाङ्मय' याबाबत नियोजन शक्यही नाही आणि इष्टही नाही. शिवाय, नियोजन हा साहित्यातील अनिष्ट गोष्टीवरील उपाय नसून समाजाची अभिरुची सुधारणे, हा त्यांनी सुचविलेला उपाय मूलगामी, महत्त्वाचा व प्रभावी वाटतो. म्हणूनच म. सा. पत्रिकेद्वारा सदभिरुचीचे संस्कार आणि जोपासना त्यांनी काटेकोरपणे केल्याचे आढळते. त्यांच्या साहित्याबद्दलच्या प्रेमाला, अभिमानाला आणि व्यापक दृष्टिकोणाला सदभिरुचीच्या मर्यादेमुळे सौंदर्य प्राप्त झाले आहे.

एकंदरीत असे म्हणता येईल की, म. सा. पत्रिकेविषयी वाचकांत विविध अपेक्षा निर्माण करण्याचे काम पत्रिकेने निश्चितपणे केले आहे. ललित वाङ्मय, संशोधनपर लेख,

वाङ्मयातील घडामोडी, परीक्षणं, प्रचलित वाङ्मयाची सूची, भाषाभगिनींचा परामर्श, साहित्यसमीक्षा इ. विविध गोष्टींची मागणी वाचक म. सा. पत्रिकेकडून करताना दिसतात. पण एकाच अंकात अशा प्रकारच्या भिन्न रुचींचे समाराधन करणे शक्य नसते. तरी शक्य त्या त्या गोष्टींनी अंक समृद्ध करण्याची काळजी प्रा. जोग घेत होते. परीक्षणे, वार्षिक आढावा अशांसारख्या लेखांच्या बाबतीत प्रत्यक्ष अनुभवाला आलेल्या अडचणी त्यांनी मोकळ्या मनाने वाचकांसमोर मांडून त्यांना विश्वासात घेतले आहे. महाराष्ट्र साहित्य परिषद आणि म. सा. पत्रिका यांच्याकडून अधिक समृद्ध साहित्यसेवा आणि समाजसेवा घडण्यासाठी राजसत्तेने थोडाफार आर्थिक भार उचलणे आवश्यक आहे, असे त्यांना वाटते. साहित्य आणि राजकारण हे परस्परसंबद्ध असतात. (या वस्तुस्थितीला नुकताच पुन्हा नव्याने उजाळाही मिळाला आहेच.) तेव्हा साहित्य क्षेत्रातील वादंग व खळबळ यांची दखल घेणं ही राजसत्तेला भूषणावहच असते. साहित्यसंस्थेची बूज राखणं व विद्वानांचा परामर्श घेणं, हे राजसत्तेचे कर्तव्य आहे. राजसत्तेने याचना करायला लावण्याची गरज नसते. समाजातील महत्त्वाच्या संस्थांच्या स्वाभिमानाची जपणूक राजसत्तेनेही करायची असते, असे विचार त्यांनी परखडपणे व्यक्त केले आहेत. परिषद आणि पत्रिका यांना आर्थिक स्वास्थ्य व सामर्थ्य लाभून सर्व बाजूंनी त्यांना समृद्धी लाभावी असे कोणालाही रुचेल हे आपल्या मनातील रमणीय स्वप्न त्यांनी मनःपूर्वक व्यक्त केले आहे.

अगदी आजतागायत जरी नाही तरी प्रा. जोग यांनी संपादित केलेल्या म. सा. पत्रिकेच्या अंकांच्या आधीच्या आणि नंतरच्या काही अंकांच्या स्वरूपाचे दिग्दर्शन मनोरंजक व उद्बोधक ठरेल. अंकांच्या अंतरंगात संपादकाच्या अभिरुचीप्रमाणे स्वाभाविकच भिन्न भिन्न वैशिष्ट्ये प्रत्ययाला येतात. कै. के. नारायण काळे यांनी संपादित केलेल्या अंकांत (इ. स. १९४१ पासून) 'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी' ही प्रा. गं. बा. सरदार-लिखित लेखमाला आली आहे. 'रद्दीतील रत्ने' या सदराचाही उल्लेख करायला हवा. कवी यशवंत यांनाही म. सा. पत्रिका 'ललित पत्रिका' नाही, याची जाणीव झाली होती. म. सा. पत्रिका अधिक रमणीय व्हावी, ही वाचकांची अपेक्षा लक्षात घेऊन 'परीक्षणे' हे म. सा. पत्रिकेचे मुख्य वैशिष्ट्य आहे, असे त्यांना वाटले होते. डॉ. त्रि. भि. कोलते यांनी संपादित केलेल्या अंकांत साहित्य-समीक्षेला प्राधान्य मिळाले आहे. किंबहुना, साहित्य आणि साहित्य-समीक्षा हाच विषय त्यांत अंतर्भूत झालेला दिसतो. 'परीक्षणा'च्या सदरातही जुने-नवे साहित्यग्रंथच समाविष्ट झाले आहेत. त्यांच्या 'संपादकीया'चे नामकरण 'इये मराठीचिये नगरी' असे झाले असून त्याचे स्वरूप प्रामुख्याने वार्तावृत्तान्ताचे आढळते. डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी महाराष्ट्रात पाश्चात्त्य साहित्याचा अधिकाधिक अभ्यास व्हायला हवा असे सांगून लेखक-वाचकांची दृष्टी अधिक व्यापक करण्याचा प्रयत्न केला आहे. सारांश, संपादकाच्या अभिरुचीप्रमाणे म. सा. पत्रिकेचे अंतरंग बदलत गेले असले तरी विद्वत्तेची—रूक्ष विद्वत्तेचीसुद्धा बूज सर्वच संपादकांनी राखली आहे. एखाद्या व्रतनिष्ठेने

विद्वत्ता जोपासण्याची परंपरा म. सा. पत्रिकेने पाळली आहे. संपादकाच्या अभिरुचीप्रमाणे त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसाही संपादित अंकांत उमटणे अपरिहार्य असते. प्रा. जोगांनी संपादित केलेल्या अंकांतून त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील व्युत्पन्न समीक्षक, रसिक आस्वादक, समतोल विचारवंत आणि सदभिरुचिसंपन्न माणूस निखळपणे प्रतिबिंबित झाल्याचा सुखद प्रत्यय येतो.

## साभार-स्वीकार

दात्ये हरि विनायक : तेजाची आरती–श्रीगुरुजी : एक दर्शन; ह. वि. दात्ये, हिंदुस्थान साहित्य, पुणे ३०; रु. ३५ /
काळे पांडुरंग : अतृप्ता; श्री जयंत जक्कल, सौरभ प्रकाशन, सोलापूर; रु. ६ /
पेंडसे श्रीकांत : गुलमोहोर; श्रीकांत सी. पेंडसे, वडोदे; रु. ८ /
धायगुडे य. ए. : मुद्रित शोधन; दी पूना प्रेस ओनर्स असोसिएशन लि. पुणे ३०; रु. २०
सोवनी नी. वि. : अर्थसिद्धान्त; मराठी अर्थशास्त्र परिषद, मराठी ग्रंथ संग्रहालय मार्ग; मुंबई १४; रु. २० /
आवळीकर पंडित : जी. एं. ची कथा; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; रु. ४ /.
दामले वा. पु. : काही प्रेमकथा; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; रु. ६ /.
बाबर सरोजिनी : निरशा दुधाची घागर; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; रु. ५/.
राकेश मोहन : आषाढातील एक दिवस; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; रु. ५/.
अनामिक : एकवचनी, एकवाणी; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०; रु. १० /
गिरिबाल : गिरिबाल–गीते; सौ. सरोज कृ. हवालदार, सांगली; रु. १·२५.
डहाळे माधव : उकंडा; माधव डहाळे, परभणी; रु. ५
वाशीकर शं. श्री. : अमीतू; वाग्विलास प्रकाशन, औरंगाबाद; रु. १०/.
गुरव पंडित : सोनचाफ्याची फुले; विकास प्रकाशन, कोल्हापूर; रु. ३/.
बापट सी. म. : गीतज्ञानेश्वर; रणझुंजार प्रकाशन, बेळगाव; रु. ५/.
आपटे हेमन्त : अवशेष; नीलकंठ प्रकाशन, पुणे ३०; रु. ५/.
बादल सरकार : एवम् इंद्रजित; सौ. आशा भांड, औरंगाबाद; रु. ७/.
कऱ्हाडकर रघुनाथ : कॅथेरीन मेयो आणि भारत; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; रु. १६/.
कोलारकर राम संपा. : सर्वोत्कृष्ट मराठी कथा खं. २ ( पूर्वार्ध ); पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; रु. ३५/.

# ४

## प्रा. श्री. म. माटे यांचे पत्रिका-संपादन

मार्च १९४७; अंक ३ व ४ ( जोड अंक )

**समालोचक : सुप्रिया अत्रे**

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचा १९४७ सालातील हा अंक जोडअंक म्हणून प्रसिद्ध झालेला आहे. त्या अंकाची एकूण पृष्ठसंख्या चौसष्ट असून तो मार्चमध्ये प्रसिद्ध झाला. अंकाचे मुखपृष्ठ साधे असून त्याच्या मागील पानावर ' साभार स्वीकार ' ह्या सदराखाली अनेक पुस्तकांची नावे दिलेली आहेत. १९४७ साली भारतास स्वातंत्र्य मिळाले. या वर्षाचे हे अनन्यसाधारण महत्त्व ध्यानात घेता पुस्तकांच्या यादीत म. गांधी, लो. टिळक, ने. सुभाषचंद्र बोस यांच्या कार्याविषयीची बरीच पुस्तके आढळतात, हे साहजिकच आहे. उदा.– लो. टिळक व म. गांधी—ले. आचार्य शं. द. जावडेकर, नेताजींचा स्वातंत्र्य-संग्राम—ले. कवी सुधांशु, सत्तावनचे स्वातंत्र्यसमर–ले. वि. दा. सावरकर, इत्यादी. त्याचप्रमाणे लहान मुलांसाठी श्री. शं. रा. देवळे यांनी संपादित केलेली ' बालगाणी ' या नावाखाली दोन पुस्तके आहेत. तसेच, ' मी तुझीच आहे '-वासुदेव पोवळे, ' सुस्वभावी संभू '– रा. दा. गुरव, ' जळत्या ठिणग्या '–ब. मो. पुरंदरे, या पुस्तकांचाही आवर्जून उल्लेख करावा लागेल. कै. ना. गो. चापेकर यांच्या स्मृतीवर प्रा. दे. द. वाडेकर, श्री. चिं. ग. कर्वे, श्री. श्री. रा. टिकेकर, यांनी संपादित केलेला ' कै. ना. गो. चापेकर स्मृतिग्रंथ'ही या यादीत आढळतो.

पुस्तकांच्या साभार सूचीनंतर आपल्याला प्रस्तुत अंकाच्या अंतरंगाकडे वळता येईल. या ठिकाणी मुख्यतः लक्षात येणारी गोष्ट म्हणजे हा अंक ४६ सालातील वाङ्मयीन घडामोडींचे समालोचन करणारा आहे. येथे फक्त दोनच लेख असून, त्यात प्रा. म. ना. अदवंतांनी लिहिलेला ' गेल्या वर्षातील मराठी काव्य, ' आणि प्रा. रा. शं. वाळिंबे यांच्या हातून उतरलेला ' गेल्या वर्षातील टीकावाङ्मयाचे समालोचन ' हा लेख आहे. शेवटच्या सात-आठ पानांत परिषदेचे १९४६-४७ सालातील इतिवृत्त आणि जमाखर्च यांचा समावेश आहे.

प्रा. म. ना. अदवंत ह्यांनी सुरुवातीलाच आपली भूमिका स्पष्ट केली आहे : ' आपण

स्वतः कवी नाही किंवा विद्वान टीकाकारही नाही, तेव्हा एका सामान्य रसिकाने हा आढावा घेतला आहे हे लक्षात घेऊन ते वाचावे ' अशी स्पष्ट कल्पना त्यांनी दिली आहे. या समालोचनाचा कालखंड जरी वर्षभराचा असला तरी जवळजवळ हजारांच्यावर कवितांचे विचारमंथन येथे केलेले आहे. या वर्षातील काव्यसंपदेचे स्वरूप, प्रमुख काव्यप्रवाह, त्या काव्यातील उणिवा, वैशिष्ट्ये इ. दृष्टिकोणातून त्यांनी आपला अभ्यास मांडला आहे.

या काव्याचे विवेचन करताना त्यांनी प्रथम पार्श्वभूमी म्हणून, रविकिरणमंडळातील काव्याचे स्वरूप थोडक्यात सांगून, त्या काव्यवाहिनीने आता जे वदलते स्वरूप धारण केले आहे त्याचा परामर्श घेतला आहे. पूर्वीची प्रेमाच्या विविध भावनांनी नटलेली कविता आता सामाजिक व राजकीय अन्याय, वीरांची यशोगाथा इ. नवनवीन विषयांकडे वळलेली दिसते. त्यात त्यांनी कवी निकुम्ब, संजीवनी मराठे, आ. रा. देशपांडे या कवींच्या कवितांचा समावेश केला आहे. श्री. अदवंतांच्या मते, समाजात जेव्हा प्रक्षोभक वातावरण निर्माण होते, तेव्हा प्रेमाची गाणी न गात बसता कवींनी, सामाजिक विषयांनाही कवितेत स्थान दिले पाहिजे.

विषयांच्या वैविध्यामध्ये आपले कवी कमी पडतात याचे कारण अदवंतांनी स्पष्ट केले आहे. त्यांच्या मते कवींचे अनुभूतीचे क्षेत्र हे मर्यादित आहे व त्यामुळे ' लक्षांचे क्रंदन व लक्षांची सुखगीते ' यात कुठेच दिसत नाहीत.

एकंदरीत त्या काळातील सर्व कविता, त्यांचे विषय यांची वैशिष्ट्यपूर्ण मांडणी करून, त्यांची वर्गवारी करून अदवंतांनी टप्प्याटप्प्याने त्यांचा विकास आपल्यासमोर मांडला आहे. त्यामुळे हा संपूर्ण लेख त्या वर्षातील कवितांचे विविधांगी दर्शन घडवितो. अदवंतांच्या रसिकतेबरोबरच त्यांच्या व्यासंगशीलतेचीही साक्ष येथे पटते. त्यांनी ठिकठिकाणी केलेली काव्याची परीक्षणे सरस ठरली असून त्यांचे मतप्रदर्शन मार्मिक आहे यात शंकाच नाही.

२ डिसें. १९४६ रोजी माधवराव पटवर्धन स्मारक मंदिरात प्रा. रा. श्री. जोग यांच्या अध्यक्षतेखाली प्रा. रा. शं. वाळिंबे यांनी जे व्याख्यान दिले, त्यावरून ' गेल्या वर्षातील टीकावाङ्मयाचे समालोचन ' हा लेख तयार केला आहे. १९४५ ते ४६ या वर्षात मराठी साप्ताहिके व मासिके यांमधून प्रसिद्ध झालेले टीकालेख, टीकात्मक विवेचन करणारी पुस्तके किंवा ग्रंथ व यांमधील टीकावाङ्मयाचे समालोचन येथे प्रा. रा. शं. वाळिंबे यांनी केले आहे.

निरनिराळ्या वाङ्मयीन प्रकारांवर आधारित असे जे टीकात्मक वाङ्मय प्रसिद्ध झाले, त्यामध्ये प्रामुख्याने आत्मचरित्राचे प्रकार, त्याची वैशिष्ट्ये, ते लिहिणारा लेखक व त्याच्या अंगी आवश्यक गुण प्रतिपादन करणारा ' समीक्षक ' मधील ' धन्वंतरी ' यांचा लेख, मराठी कादंबऱ्यांमधील स्त्रीजीवनाचे विस्तृत दर्शन घडविणारा सरलाबाई पुरंदरे यांचा लेख, व ' महाराष्ट्राचे पहिले अमृतमधुर प्रेमकाव्य ' यातून गाथासप्तशतीचे मार्मिक रसग्रहण करणारा श्री. बनहट्टींचा लेख यांचा उल्लेख करावा लागेल. याबरोबरच महाकाव्यांचा

अभाव, नवे नाट्य, व चार अध्यक्षीय भाषणे यांचेही समालोचन प्रा. वाळिंबे यांनी येथे केले आहे.

टीकावाङ्‌मयात समाविष्ट झालेल्या सर्व विषयांवरील लेखांचे मार्मिक रसग्रहण करून प्रा. वाळिंबे यांनी हा लेख परिपूर्ण केला आहे. हे करीत असताना केवळ परिचय करून देणे एवढ्याच भावनेने हा लेख लिहिला अशी स्पष्ट कबुली दिली असूनही त्यांच्यामधील प्रज्ञावंत जाणकार अनेकदा डोकावताना दिसतो. श्री. श्री. के. क्षीरसागर यांनी मांडलेल्या ' एकच प्याला 'मधील वादस्थळांवर प्रा. वाळिंबे यांनी कडाडून हल्ला चढवला असून त्या-वरील आपली मते परखडपणे ते व्यक्त करताना दिसतात.

परिषदेचे ४६–४७ सालातील इतिवृत्त हेही या अंकात समाविष्ट आहे. त्यामधील काही मुद्दे लक्षणीय आहेत. परिषदेतर्फे पूर्वी मराठीचे वर्ग चालवले जात. त्यांत व्याख्यान देण्यासाठी खालील नामवंत साहित्यिक येत असत. प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. श्री. म. माटे, प्रा. गं. भा. निरंतर, प्रा. अ. गं. मंगरूळकर, प्रा. गं. बा. सरदार, प्रा. रा. शं. वाळिंबे, प्रा. रा. श्री. जोग, इत्यादी.

कै. बाळशास्त्री जांभेकर, कै. प्रिं. वा. म. जोशी, कै. डॉ. माधवराव पटवर्धन, व कै. शि. म. परांजपे यांचे स्मृतिदिन त्या वेळी साजरे झाले.

व्याख्यानसत्रामध्ये त्या वर्षी वाङ्‌मयातील विविध मतांची चर्चा केली गेली. त्यात सर्वश्री. रा. श्री. जोग, श्री. के. क्षीरसागर, के. ना. काळे, दि. के. बेडेकर, रा. शं. वाळिंबे, कृ. ना. फडके, म. गो. भाटे, व बा. सी. मर्ढेकर यांनी भाग घेतला होता.

द. वा. पोतदार यांना ' महामहोपाध्याय ' ही विद्वत्वनिदर्शक पदवी मिळाल्याबद्दल त्यांचा जाहीर सत्कार श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली झाला. त्रैमासिके, साप्ताहिके, दैनिके इ. ची यादी देऊन पुढील काळात ज्या योजना परिषदेपुढे होत्या त्यांचाही उल्लेख येथे केला आहे.

१९४६ साली परीक्षांची केंद्रे पाहता त्यांची यादी भली मोठी असून, त्यात अगदी लहान लहान गावांचाही उल्लेख दिसून येतो. हल्ली मात्र या परीक्षा बंद पडलेल्या दिसतात. परीक्षक म्हणून काम केलेल्या व्यक्तींमध्ये प्रा. श्री. म. माटे, प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे, प्रा. श्री. रा. पारसनीस. डॉ. शं. दा. पेंडसे, प्रा. कृ. पां. कुलकर्णी, डॉ. के. ना. वाटवे, प्रा. न. र. फाटक, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. गं. बा. सरदार इ. अनेक नामवंत साहित्यि-कांचा सहभाग दिसून येतो.

एकंदरीत प्रा. श्री. म. माटे यांनी संपादित केलेला हा अंक वाङ्‌मयीन समीक्षेला वाहि-लेला आहे हे लक्षात येते. मराठी भाषेच्या अभ्यासकांना हा अंक निश्चितपणे उपयोगी पडेल.

## ५

# महाराष्ट्रकवी यशवंत आणि म. सा. पत्रिका

### समालोचक : सुधा क्षीरे

श्री. यशवंत दिनकर पेंढरकर ऊर्फ महाराष्ट्रकवी यशवंत यांनी एप्रिल १९४७ ते जून १९५० अशी तीन वर्षे महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचे संपादन केले. त्यांनी संपादिलेल्या तेरा अंकांमधून काही महत्त्वाच्या वाङ्मयीन प्रश्नांची चर्चा विद्वानांच्या लेखांमधून झालेली दिसते. अनेक साहित्यकृतींची परीक्षणे वाचायला मिळतात. पत्रिकेचे वेगळे असे स्वरूपही जाणवते.

स्वतःचे धोरण यशवंतांनी आपल्या संपादकीयांमधून स्पष्ट केले आहे. पहिल्याच अंकाच्या संपादकीयात ते म्हणतात—' पत्रिकेच्या स्वरूपात थोडी रमणीयता यावी, अशी अपेक्षा बोलून दाखवण्यात आली आहे. पत्रिका ललितप्रकृती नाही ही गोष्ट या अपेक्षेच्या बुडाशी आहे. ' या अपेक्षेचा मान ठेवून प्रत्येक अंकाच्या प्रारंभी एक-दोन कविता देण्याची पद्धती संपादकांनी स्वीकारलेली दिसते. कवींमध्ये कान्त, कुसुमाग्रज, कृ. ब. निकुम्ब, बा. भ. बोरकर, मनमोहन, स्वतः यशवंत, श्री. बा. रानडे, इंदिरा, संजीवनी, वि. म. कुलकर्णी, ना. ग. जोशी, र. लु. जोशी, ना. गो. हूड, सी. म. बापट, अनंत आठले, शांता शर्मा, अनंत पोतदार असे कवी-कवयित्री आहेत. कुसुमाग्रजांच्या ' नवे-जुने ' या कवितेचा अपवाद वगळता, खास गाजलेली अशी एकही कविता यात नाही. अर्थात उत्तमोत्तम कविता प्रसिद्ध करणे हा पत्रिकेचा उद्देशच नसून एखादी कविता ( लालित्यापुरती ) असावी, एवढाच उद्देश दिसतो; व तो सफल झाला आहे. त्याच उद्देशाने एखादा लघुनिबंधही पुढील काही अंकांतून आलेला आहे. एप्रिल-जून १९४९ ते एप्रिल-जून १९५० या वर्षातील पत्रिकेच्या चार अंकांत रा. म. मराठे यांचे लघुनिबंध प्रसिद्ध झालेले आहेत.

परंतु एकंदरीत ' चर्चात्मक, शास्त्रीय व संशोधनात्मक साहित्याकडेच पत्रिकेचे मुख वळलेले असावे ' हे धोरण संपादकांनी नजरेसमोर ठेवलेले दिसते. यानुसार आलेले अनेक चर्चात्मक लेख सुबुद्ध वाचकाला खास खाद्य पुरविताना दिसतात. त्यात बहुविधता आहे— विषयांची, लेखकांची, व दृष्टिकोणांचीही.

एक गट दिसतो तो संस्कृत साहित्यावरील लेखांचा. ' आनंदवर्धनाचा ध्वन्यालोक ' हा

अनुक्रमणिका

पु. ना. वीरकरांचा प्रदीर्घ लेख त्यात आहे. संस्कृत साहित्यशास्त्रात प्रसिद्ध व प्रमाणभूत मानल्या गेलेल्या ' ध्वन्यालोक ' या ग्रंथाचे मराठीत विवरण करणारा हा लेख पत्रिकेच्या चार अंकांत चार भागांतून प्रसिद्ध झाला आहे. आनंदवर्धनाच्या कारिकांचे व वृत्तींचे सोदाहरण विवेचन वीरकरांनी येथे केले आहे. वाच्यार्थ, व्यंग्यार्थ, व ध्वन्यर्थ यांचा ऊहापोह त्यात केलेला आहे.

संस्कृत साहित्यशास्त्राबरोबरच संस्कृत वाङ्मयावरील लेखही 'पत्रिके ' ने प्रसिद्ध केलेले आहेत. ' कालिदासाची वनश्री ' या नावाचे तीन लेख तीन अंकांमधून वाचायला मिळतात. लेखक आहेत—डॉ. म. वि. आपटे. परंतु लेखांचे शीर्षक बघून वाचकाची थोडीशी दिशाभूल होण्याचा संभव आहे. कालिदासाच्या ' रघुवंश ' या काव्यातील निसर्गवर्णने व त्यातील काव्यसौंदर्य याकडे लेखकाचा रोख नसून, या काव्यात उल्लेखिलेल्या वनस्पतींची माहिती व वर्णने देण्याचा त्यांचा इरादा आहे.

चर्चात्मक लेखांच्या दुसऱ्या प्रकारात काही लेख छंदःशास्त्राची चर्चा करणारे आहेत. यात ' अनुष्टुभाचे स्वरूप ', ' वैतालियाचे लक्षण ', ' वैतालीय विचार' (आक्षेपांस उत्तर), ' छंदःशास्त्र : वैदिक व लौकिक', ' वैदिक छंदःशास्त्र ' इ० लेखांचा समावेश होतो. य. ग. फफे यांनी या सर्व लेखांमध्ये वैदिक छंदःशास्त्रावरील महत्त्वपूर्ण माहिती दिली आहे. वैदिक छंदांची परिणती होऊन त्यापासून लौकिक छंद म्हणजे जाती व वृत्ते यांची निर्मिती कशी झाली, याविषयीचे महत्त्वाचे संशोधन त्यांनी मांडलेले आहे. मराठी वृत्तविचारात ही सर्व चर्चा मोलाची भर घालते यात शंका नाही.

तिसरा गट परिभाषेविषयीच्या लेखांचा होय. येथे प्रा. स. वि. आपटे यांनी शास्त्रीय परिभाषा तयार करण्याविषयीची सोदाहरण माहिती देऊन विस्तृत चर्चा केली आहे; तर आपट्यांच्या या पद्धतीवरील प्रा. दि. धों. कर्वे यांनी आपले काही आक्षेप ' परिभाषा ठरविताना ' या लेखात मांडले आहेत. शिक्षक व विद्यार्थी यांच्या दृष्टीने हे परिभाषेचे प्रश्न अत्यंत महत्त्वाचे ठरतात. शिक्षणासाठी मराठी माध्यम आणणे एकपरीने सोपे. मात्र त्या दृष्टीने सर्व विषयांची अर्थपूर्ण पण सहज अशी परिभाषा निर्माण करणे हे एक अतिभव्य कार्य आजही अपूर्णावस्थेतच आहे. वेगवेगळ्या विषयांच्या ( विशेषतः शास्त्राच्या ) अभ्यासू विद्यार्थ्यांना जाणवणारी ही समस्या आहे. तिला तोंड फोडण्याचे महत्त्वपूर्ण कार्य तीस वर्षांपूर्वीच्या त्या काळात पत्रिकेने केले. त्या दृष्टीने हे लेख संख्येने थोडे असले तरी महत्त्वाने मोठे ठरतात.

परिभाषेबरोबर लिपीसारख्या महत्त्वाच्या भाषिक प्रश्नाचा ऊहापोहही पत्रिकेत झाला आहे. गो. कृ. मोडक यांचा ' लिपिसुधारणा ' ( जाने. मार्च १९४८ ) हा लेख या दृष्टीने उल्लेखनीय आहे. ' मराठीत पदोपदी आढळणाऱ्या, लिपीतील पाच उणिवांचा आविष्कार करून ' लेखकाने येथे त्यांचा परिहारही सुचविला आहे. च-वर्गाचा संस्कृत उच्चार व मराठी उच्चार वेगळ्या चिन्हाने दर्शविण्याचा विचार यात मांडला आहे. तीस वर्षांपूर्वी

मांडलेल्या या विचाराचा प्रत्यक्ष पाठपुरावा मात्र अद्यापही आपण केलेला नाही. लिपीतील उणिवा व त्यांचा परिहार ' याचा विचार तज्ज्ञ मंडळींनी करावा ' या लेखकाच्या विनंतीकडे दुर्लक्षच झाले नाही काय ?

तसेच गो. कृ मोडक व ग. वा. तगारे यांनी ' मराठी स्वराघात ' या विषयावर लिहिलेले तिन्ही लेख विचारप्रवर्तक आहेत. ' अस्पष्ट स्वराघात असलेल्या शिष्टभाषेपेक्षा ती ज्या बोलीवर आधारली आहे तिच्यामधील स्वराघाताचे निरीक्षण व अभ्यास होणे आता आवश्यक आहे ' असे मत ग. वा. तगारे यांनी मांडले आहे. ' हा नवीन विषय खुल्या चर्चेसाठी मराठीत मांडल्याबद्दल ' श्री. मोडकांप्रमाणे आपणही त्यांचे उपकारच मानायला हवेत. डॉ. तगारे यांची मते प्रामादिक आहेत असे म्हणूनही गो. कृ. मोडक त्यांचे उपकार मानतात, कारण ' वादे वादे जायते तत्त्वबोधः ' हीच त्यांची भूमिका आहे.

या चर्चात्मक लेखांचा आणखी एक मोठा गट उरतो. तो म्हणजे मराठी साहित्यासंबंधीच्या लेखांचा. या लेखांची बहुविधताही लक्षणीय आहे. ' ज्ञानेश्वरीच्या चार पाठपरंपरां 'ची चर्चा दोन प्रदीर्घ लेखांत गो. कृ. मोडकांनी केली आहे. (जाने. मार्च ५०). ' मोरोपंती आर्येतील यतिभंग ' य. ग. फफे यांनी संशोधिले आहेत. (जाने. मार्च ५०) तर ' आजची मराठी कविता ' (१९४७) कशी आहे, हे रा. अ. काळेले यांनी दाखवून दिले आहे. ज्ञानेश्वर ते मर्ढेकर अशा प्रचंड काव्यकालपटातील काही महत्त्वाचे टप्पे या तीन लेखांतून काळेले यांनी टिपले आहेत.

' एकांकिकांचे एकबैठकी प्रयोग ' हा रंगभूमीवरील कृतींचा परामर्श घेणारा लेख श्री. गो. वि. वैद्य यांनी लिहिला आहे, तर ' भावी रामराज्यातील रस ' या लेखातून रा. अ. काळेले यांनी रसचर्चा ऐकवली आहे.

प्रा. रा. श्री. जोग व डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी ज्ञानेश्वरीवर लिहिलेले लेखही त्यांच्या व्यासंगाची ओळख करून देणारे आहेत. ' श्लेषाच्या निमित्ताने ' या लेखात प्रा. रा. श्री. जोग यांनी आपल्या संयमपूर्ण शैलीत ज्ञानेश्वरीतील ' श्लेषा ' बद्दल स्वमतमंडन व परमतखंडन केले आहे, तर अध्यात्मविद्येतील अधिकारी ज्ञानेश्वर रसिकतेचा जो साक्षात्कार घडवतात, त्याबद्दलचे सुखद नवल डॉ. वाळिंबे यांनी व्यक्त केले आहे.

साहित्यकृतींची परीक्षणे हा पत्रिकेच्या वैभवाचा प्राण आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरू नये. अनेक सुंदर साहित्यकृतींची ख्यातनाम समीक्षकांनी केलेली सडेतोड पण समतोल व रसास्वादयुक्त परीक्षणे पत्रिकेच्या सर्वच अंकांचे अंतरंग खुलवितात. उत्तमोत्तम ग्रंथांचा परिचय करून देण्याचे मोलाचे कार्य संपादकांनी येथे विशिष्ट ध्येयाने अंगीकारलेले दिसते. समीक्षकांनी त्यांना उत्स्फूर्त दादही दिली आहे. पत्रिकेची बरीच मोठी पृष्ठसंख्या या परीक्षणांनी व्यापलेली आहे. विस्तृत परीक्षणे प्रसिद्ध करण्यातील आपला आनंद यशवंतांनी एका संपादकीयात व्यक्त केला आहे आणि त्रोटक परीक्षणे छापताना पृष्ठसंख्येमुळे होणारी मानसिक कुचंबणाही बोलून दाखवली आहे :

अनुक्रमणिका

महत्त्वाची विस्तृत परीक्षणे अशी :-

( १ ) मराठी व्युत्पत्तिकोश — कृ. पां. कुलकर्णी
समीक्षक : गो. कृ. मोडक.
( २ ) केशवसुत—रा. श्री. जोग.
समीक्षक : वि. स. खांडेकर.
( ३ ) काही कविता—बा. सी. मर्ढेकर
समीक्षक : मं. वि. राजाध्यक्ष
( ४ ) टीका आणि टीकाकार—वा. भा. पाठक ( प्रबंध )
समीक्षक : श्री. के क्षीरसागर
( ५ ) बापुकाका जोशी व त्यांचा काळ—त्र्यं. र. देवगिरीकर
समीक्षक : वि. स. खांडेकर
( ६ ) महात्मा गांधी—गोवर्धन पारीख
समीक्षक : वि. स. खांडेकर
( ७ ) रावबहादूर दादोबा पांडुरंग–अ. का. प्रियोळकर
समीक्षक : गं. बा. सरदार

प्रायः इतर समीक्षणे संक्षिप्त आहेत; पण रसिकांची वाचनविषयक उत्सुकता वाढ-विण्यास ती मदत करतातच.

परीक्षणासाठी निवडलेल्या या साहित्यकृतींत कवितासंग्रह, कादंबरी, नाटक, नाटिका, एकांकिका, लघुकथासंग्रह, लघुनिबंधसंग्रह, टीकालेखसंग्रह, चरित्रे, आठवणी, विनोदी कथा, बालगीतसंग्रह, व्यक्तिचित्रे इत्यादी विविध वाङ्मयप्रकारांचा अंतर्भाव केलेला आहे. इतकेच नव्हे तर इतिहास, भूगोल, नागरिकशास्त्र, धर्म, शिक्षणशास्त्र, ज्योतिष इत्यादी विषयांवरील ग्रंथांची परीक्षणेही पत्रिकेत छापून संपादकांनी आपली सर्वसमावेशकता प्रगट केली आहे.

यातच ' भावीण ', ' वैष्णव ' व ' बळी, ' या गाजलेल्या कादंबऱ्यांची परीक्षणे आहेत. तसेच ' स्वेदगंगा ' व ' पेर्ते व्हा ' अशा क्रांतिकारी काव्यांचाही परिचय घडवला आहे. ' वाङ्मयातील वादस्थळे ' चर्चिली आहेत, तसेच गीताञ्जलीच्या अनुवादाचाही परामर्श घेतला आहे. ' अप्-टु-डेट १९४७ ' सारख्या नाटकावर मर्मभेदी टीका केलेली आहे. श्री. म. माटेयांचा ' माणुसकीचा गहिवर ' इथेच कानी पडतो, तर ' कडू आणि गोड ' या गंगाधर गाडगिळांच्या नवकथांवरची कडूगोड चर्चा वाचायला मिळते. व्यंकटेश माड-गूळकरांच्या ' माणदेशी माणसां 'ची ओळख अरविंद गोखल्यांतर्फे होते आणि अर्थातच ती ( ओळख व माणसेही ) आपण विसरू शकत नाही.

१९४७ च्या एप्रिलमध्ये कवी यशवंतांकडे हे संपादकीय काम आले, त्या वेळी लिहिलेल्या ' पहिली माझी ' या आपल्या संपादकीयात स्वतःच्या कर्तृत्वाविषयी अतिशय

विनयवृत्तीने ते बोलतात. पण या तीन वर्षांत ही धुरा मोठ्या कुशलतेने त्यांनी सांभाळली व ' पत्रिके ' च्या वाचकांच्या हाती मोठे संपन्न विचारधन दिले, हे निःसंशय !

खरोखरच ' संपादकीय ' हे एकतऱ्हेने औपचारिक व ठराविक चाकोरीने रूक्ष होण्याचा संभाव. जसे, सभेतले आभाराचे भाषण होते तसे. पण यशवंतांनी लिहिलेल्या संपादकीयांमधून त्यांचे ऋजू, समन्वयी परंतु जागरूक असे एक व्यक्तिमत्त्व वाचकांसमोर साकार होते व त्यांच्या कविवृत्तीची साक्ष सहजगत्या मिळाल्यावाचून राहत नाही. कृ. प्र. खाडिलकरांना श्रद्धांजली वाहताना यशवंत म्हणतात—' प्रमाणबद्धता, गतिमानता, उत्कटता, संघर्ष, शृंगार-वीर-करुण रसांचे चित्तस्पर्शी उद्रेक यांनी त्यांच्या नाट्यकृती भरलेल्या आहेत. तसेच, संपादकीय कामातील अडचणी सांगताना ते दृष्टान्त देतात, ' सांप्रत शहरी राहणीत घरचा व अगत्याचा पाहुणासुद्धा जागेच्या टाचगेपणामुळे दारातूनच परतविण्याचे प्रसंग गृहस्थाश्रमीयांवर आले म्हणजे त्याला जे दुःख होते, तशा प्रकारचे दुःख मला वेळोवेळी झाले आहे ' या दृष्टान्तातली समर्पकता त्यांच्या कविवृत्तीलाच साजेशी नाही काय ?

साहित्य-संमेलनाविषयी लिहिताना, कृष्णराव मराठ्यांशी आपले मतभेद प्रगट करताना किंवा मुंबईचे प्रकाशक के. भि. ढवळे यांचे अभिनंदन करताना यशवंतांनी आपली समन्वयवादी वृत्ती प्रगट केली आहे. साहित्यसंमेलनातील गैरसोयींविषयी अभ्यागतांनी तक्रार करू नये. आपल्याच घरचे कार्य समजले तर निमंत्रक व अभ्यागत यांत दुजाभाव उरणार नाही, असे ते सुचवतात. तसेच ' असदभिरुची किंवा अश्लीलता यांच्या मर्यादा ठरविताना मतभेदाला बराच अवसर असल्यामुळे नेहमीच त्यांच्याशी ( कृष्णराव मराठ्यांशी) सर्वांना सहमत होता येत नाही ' असे उद्गार काढून कृष्णराव मराठ्यांच्या अश्लीलताविरोधी वृत्तीबद्दलची प्रतिक्रिया त्यांनी व्यक्त केली आहे.

एका ठिकाणी ते सांगतात—' हे संपादकीय काम स्वीकारल्यानंतर स्तुती व निंदा दोन्ही अनुभवाला आली '. या दोन्हींचा स्थिरचित्त स्वीकार करण्यातच त्यांचे विवेकी व्यक्तिमत्त्व जाणवते. तसेच ' जेवणाची वेळ होताच सुजाण श्रोतेही संमेलनामध्ये उठून जायला लागतात ' अशी तक्रार ते अगदी सौम्य शब्दात नोंदवतात; किंवा ठरावांतल्या शब्दाशब्दासाठी साहित्यिक किती वेळ खर्ची घालतात, याबद्दल ' हा कलाविलास साहित्यिकाशिवाय अन्य कोणास साधेल ? ' असे फक्त मिस्किलपणे विचारतात.

या संपूर्ण काळात ' पत्रिके ' चे बाह्यांग व अंतरंग साधे, अवडंबरहीन पण चर्चात्मक व संशोधनात्मक साहित्याने नटलेले ठेवण्यात संपादक यशवंत हे ' यशवंत ' ठरले आहेत असेच म्हणावेसे वाटते.

# ६

# आजची मराठी लावणी

## बलवंत देशमुख

शाहिरी काव्याने मराठी कवितेला स्वतःचा असा विशिष्ट ढंग प्राप्त करून दिलेला आहे. शाहिरांची गाणी ही मराठी मनाची गाणी आहेत. त्या गाण्यांतून मराठशाहीतील सरस्वतीची वाणी झंकारली आहे. वीर व शृंगार या रसराजांच्या सोन्याचांदीच्या दुरंगी रंगांनी रंगलेले ते एक भरजरी साहित्यसणंग आहे. मराठशाहीच्या सौभाग्याचे ते लेणे आहे. असे हे शारदेचे महावस्त्र विणण्याचा प्रयत्न रामजोशी, परशुराम, होनाजीबाळा, प्रभाकर, अनंतफंदी, सगन भाऊ व पठ्ठे बापूराव यांसारख्या शाहिरांनी केला आहे. लावणी म्हणजे, पेशवेकाळातील सरस्वतीचे लास्य आहे. लावणी म्हणजे, शिवकाळात साहित्यरूपी वेलीवर लागलेल्या कलिकेचे पेशवेकाळात उमललेले सुरंगी नि सुगंधी पुष्प. लावणीचे रंगगंध खरे पेशवेकाळातच दिसून येतात. पठ्ठे बापूराव यांच्या रूपाने या पुष्पाची शेवटची पाकळी गळून पडली. आजची लावणी म्हणजे त्याच साहित्यवेलीवर लागलेली नवकलिका होय.

आजची लावणी कालच्या लावणीचेच रंग, रूप घेऊन आलेली आहे. १९३६ साली बोलक्या चित्रपटांचा जमाना सुरू झाला आणि रसिकांच्या मनोरंजनासाठी एक नवीन मायानगरी खुली झाली. नाटयाला व लोकनाटयाला वाईट दिवस आले. एक जमाना पालटला. लावणीच्या फडावर मंत्रमुग्ध होणारा रसिक चित्रपटाच्या झगमगाटाने दिपून गेला. रसिकांचे पंचप्राण गोळा करणारे चाळ सांदीकोपऱ्यातील धुळीने मळले, तुणतुण्याच्या तारा तुटल्या, ढोलकीची काळी शाई काळवंडून गेली. नायिकांच्या स्वरलता कोमेजून गेल्या. नृत्यांगनांच्या गिरक्या-फिरक्यांनी कलंडणाऱ्या रात्री दीर्घसूत्री बनल्या. धुंदफुंद झालेली रातराणीची वेल अचानक करपली. लावणी थबकली, थांबली नि मधाच्या मोहळाभोवती गर्दी करणाऱ्या मधुमक्षिकांप्रमाणे शारदेच्या हातातील एक रुपेरी पान उलटले गेले.

लावणीचे सुगीचे दिवस संपले; परंतु लावणी रसिकांच्या पूर्णपणे स्मृतीतून गेली असे मात्र झाले नाही. रसराज शृंगाराच्या दरबारातील मानाचे मानकरी असलेले शाहीर काळाच्या पडद्याआड गेले; पण त्यांच्या स्मृतींनी नंतरचा मराठी रसिक विव्हल झाला. चित्रपटांच्या झगझगाटाने सुरुवातीला दिपलेले मराठी मन पुन्हा जाग्यावर आले. काहीतरी हरवल्याचे त्याला जाणवले. लावणी गेल्याचे त्याला मनस्वी दुःख झाले. लावणीचा मराठी

अनुक्रमणिका

मनावर व मराठी मनाचा लावणीवर कायमचा जीव जडलेला आहे. लावणीत मराठी मनाची सारी बिंबे, प्रतिबिंबे साकारलेली आहेत. लावणी हे खास व अस्सल मराठी सगंग आहे. चित्रपटात भावगीते आली, पण मराठी मनाची या भावगीतांनी भूक भागली नाही. भावगीतात लावणीना ठेका, ठसका व रसिकाला पूर्णपणे आपलेसे करण्याची ताकद नाही, असेच जणू त्यावरून दिसून आले. भावगीतांची, लावणीप्रमाणे मराठी मनाला भुरळ पडलीच नाही. लावणीला कोल्हापुरी मिरचीचा झटका आहे, झणझणीतपणा आहे. त्यामुळे भावगीतात लावणीचा मराठी अस्सलपणा येऊ शकत नाही. त्यामुळेच लावणीची जागा भावगीत घेऊच शकत नाही. मराठी मनाला अस्सल लावणीचे, पेशवाई लावणीचे वेड आहे. कोणी काहीही म्हणो, नाटय असो की लोकनाटय असो, चित्रपट असो की दूरदर्शन असो, मराठी मन लावणीच्या शोधात असते हे अनुभवाने सिद्ध झालेले सत्य आहे. म्हणून टीकाकारांनी कितीही नाके गुरडली, तरीही तमाशाप्रधान (फार तर 'लोकनाटय'-प्रधान) चित्रपटच लोकांची तमाम गर्दी खेचीत असतात, हे उघड्या डोळ्यांनी दिसणारे सत्य आहे. म्हणून चित्रपटांचे किंवा दूरदर्शनाचे युग सुरू झाले तरी मराठी मन लावणीला विसरलेले नाही व विसरेल असेही नाही. जेव्हा चित्रपटाला लावणीची जोड दिली गेली तेव्हा तो मराठी रसिकाला जवळचा व 'आपला' वाटू लागला. येथूनच आजची लावणी मोहरून आली, बहरून आली. चित्रपटातील भावगीताने मराठी लावणीचे नाव पुसले गेले नाही, उलट लावणीला 'वाट पुसतच' भावगीताला पुढे यावे लागले आहे. भावगीताने लावणीला बदलले नसून लावणीनेच मराठी भावगीताला बदलले आहे, आपलेसे केले आहे. लावणीचे भावगीत होण्यापेक्षा भावगीतच, निदान चित्रपटातील भावगीतच, लावणीमय झाले आहे याचा प्रत्यय चित्रपटातील भावगीते ऐकताना, वाचताना आपणांस होतो.

मराठी चित्रपट सुरुवातीला रंगले ते भक्तिभावाच्या रंगाने. रामायण व महाभारत या महाकाव्यांतील रामचंद्र व श्रीकृष्ण या पुरुषोत्तमांच्या दिव्य तेजाच्या वलयांनी अशा चित्रपटांना आकार आला. भक्तीच्या सुगंधाने, 'रामभक्त हनुमान', 'लंकादहन', 'सीता-स्वयंवर', 'रुक्मिणीस्वयंवर', 'श्रीकृष्णदर्शन', अशा प्रकारचे चित्रपट दरवळून गेले आहेत. नंतर ऐतिहासिक चित्रपटांचा जमाना आला. त्यातूनच पुढे सामाजिक चित्रपटाकडे ही चित्रनगरी झुकली. पौराणिक, ऐतिहासिक व सामाजिक हा नाटयसृष्टीतील विकासक्रम चित्रपट-सृष्टीतही आपणांस दिसून येतो. भक्ती व वीर या रसांच्या ओघाओघांनीच चित्रपटरसिकांना सुरुवातीला जवळचा वाटू लागला. जनमानसात त्याला जिव्हाळ्याचे स्थान मिळाले. हुशार चित्रपटनिर्मित्यांनी कृष्णसख्याला आपलेसे केले व भक्तीच्या गंगेबरोबरच शृंगाराची यमुना वाहू लागली. भक्ति-प्रीती रंगांच्या पिचकाऱ्यांनी चित्रपटात चांगलाच रंग भरला. लावणीकार शाहिरांच्या पूर्वीच्या शृंगार भक्तीच्या मार्गानेच चित्रपटही मार्गक्रमण करू लागला. मग कृष्णाच्या भोवती रासक्रीडा रंगल्या, होरीगीते साकारली, गौळणीच्या रूपाने लावणीत रंगलेल्या नंदलालाचा मायापट चित्रपटालाही सोडता आला नाही.

राधाकृष्णाच्या मनोहारी मूर्तीने रसिकांच्या हृदयात पुनश्च कुंजवन निर्माण केले नि चित्रपटरूपी कलाकुंजवनात 'लावणी 'ची लावणी झाली. म्हणजे चित्रपटाचा जमाना आला तरीही 'लावणी' या रूपाने रसिकरंजनासाठी अवतीर्ण झाली.

पौराणिक आणि ऐतिहासिक चित्रपटांना ज्यांनी गीतसौंदर्याने नटविले त्यामध्ये ग. दि. माडगूळकर व पी. सावळाराम ही दोन नावे त्या वेळी आघाडीवर होती. पी. सावळाराम यांच्या भावगीतात असलेल्या मधाळ गोडीने त्या वेळचा रसिक अगदी आनंदून गेलेला होता. ज्ञानबा-तुकारामांच्या ओव्या-अभंगांशिवाय सर्व निषिद्ध मानले जाणाऱ्या चिमुकल्या गावागावांत चित्रपटांच्या गीतांचा नवा जमाना येत होता, बघता बघता आला होता. ग. दि. माडगूळकरांच्या गौळणींनी तर झपाट्याने हा कायाकल्प घडवून आणला. ग. दि. मा. यांनी चित्रसृष्टीत भावगीतांच्या रूपाने केलेले कार्य उल्लेखनीय आहे. चित्रसृष्टीला चैत्र-पालवी फुटल्यापासून तिचे 'चैत्रवन' निर्माण होईपर्यंत एकट्या माडगूळकरांनी दिलेली साथ, या कचकड्याच्या दुनियेतही अमर ठरावी एवढी श्रेष्ठ आहे. ग. दि. मां.च्या प्रतिभा-रूपी स्नेहाळ वसंतऋतूच्या स्पर्शाने चित्रपटगीतांचा कल्पवृक्षच महाराष्ट्राच्या अंगणात वहरून आला, फुलून आला. " फुले वेचिता अतिवहरू । कळियांसी आला " असेच येथेही घडले. सतत चाळीस वर्षे या कल्पवृक्षाने नानारंगी, नानागंधी फुले रसिकांना दिली. (पण बघता बघता हा सोन्याचा पिंपळच भरणीमातेने गिळून टाकला.)

माडगूळकरांच्या 'चैत्रवना 'त भक्तिरूपी जाईच्या फुलांचे शुभ्रकुंज आहेत, प्रीतिरूपी गुलाबी रंगाच्या धुंद मधुमती वहरल्या आहेत. चैत्रवनाच्या प्रवेशद्वाराजवळच्या दोन्ही बाजूंना, आकर्षक मंडपावर तरारलेल्या लावणीरूपी रानराणीच्या, मंद-मधुर गंधाने मराठी रसिक बराच वेळ घोटाळत राहावा, एवढे कौशल्य ग. दि. मां. नी या लावण्यांत वापरलेले आहे. अनेक कवींनी लावणीचे सौंदर्य भावगीतांत आणले; पण ग. दि. मां. नी मात्र भाव-काव्याला लोभसवाणे लावणीरूप दिले. त्यांच्या लावण्या या विविध अंगांनी विकसित झालेल्या आहेत. वैपुल्याबरोबरच वैविध्याने माडगूळकरांच्या लावण्या वैशिष्ट्यपूर्ण ठरलेल्या आहेत. संत-पंतांच्या नि लावणीकार शाहिरांच्या काव्याचा माडगूळकरांनी फार काळजीपूर्वक व सहृदयतेने अभ्यास केलेला होता. संतांची भावकोमलता, पंडितांची प्रगल्भता व शाहिरांची भावार्तता माडगूळकरांच्या लावण्यांत मुरावलेली आहे. त्यांच्या लावण्यातील शब्दकळा मनोहारी आहे. त्यांतील रस-रंगाची शिंपण चेतोहारी आहे. हळव्या पहाटवाऱ्याने नाजूक प्राजक्त पुष्पांची रास अवनीवर निथळावी किंवा सोन-चाफ्याच्या फुलांचा सडा सहजपणे वसुंधरेवर पडावा तितक्या सहजपणे माडगूळकर आपल्या लावणीतून मनमोहक शब्दांची रचना करतात. त्यांची संपूर्ण लावणीच अशा सहजतेने साकार झालेली असते. कृष्णजीवनाभोवती गुंफलेल्या अनेक लावण्या याची साक्ष देतील. ग. दि. मां. च्या लावण्या या विविध रंगांच्या, विविध ढंगांच्या आहेत. शुभ्र, निळ्या व लाल रंगांची कमळे ज्याप्रमाणे आपल्या मनाला आनंद देतात,

त्याप्रमाणे ग. दि. मां. च्या, विविध रसरंगांची उधळण करणाऱ्या लावण्या आपणांस आवडतात. कृष्णजीवनातील विविध प्रसंगांच्या मधूबिंदूंनी चित्ताकर्षक झालेल्या त्यांच्या लावण्या म्हणजे सावळ्या वनमाळीच्या गळ्यात घालण्यासाठी भक्तिरूपी शुभ्र कमळांच्या फुलांनी तयार केलेली सुंदर पुष्पमालाच होय. शृंगाररसाची उधळण करणाऱ्या त्यांच्या लावण्या म्हणजे जणू कृष्णार्पण केलेल्या लाल कमळांची पुष्पमाला. कधी कधी भक्ती व प्रीती या दोन रंगांनी त्यांच्या लावण्या खुलल्या आहेत. अशा दोन रंगांच्या संगमावर न्हाऊन निघालेल्या लावण्याही तितक्याच विलोभनीय उतरलेल्या आहेत. माडगूळकरांच्या लावण्यांत जुन्या-नव्या अभिरुचींचा सुंदर समन्वय साधलेला आहे. लोक-नाट्याच्या पडत्या काळी व चित्रपटाच्या चढत्या काळी माडगूळकरांनी केलेले हे कार्य लावणीच्या दृष्टीने फार फार मोलाचे आहे. कृष्णरंगाने रंगलेल्या, चित्रपटाशी एकरूप झालेल्या माडगूळकरांच्या लावण्या रसिकांच्या ' मनिच्या सिंहासनी ' विराजमान झालेल्या आहेत. ' चैत्रबना 'तील अशा लावण्यांमुळेच ' लावणी 'चा प्रवाह अनिरुद्धपणे खळाळत राहिला व पुढे ' लावणी 'ला लोकमान्यता व राजमान्यता लाभली. माडगूळकरांनी मागच्या लावणीकारांच्या लावणीतील अश्लीलपणा टाकून लावणीला नितळपणा प्राप्त करून दिला. त्या दृष्टीने कृष्णपर लावण्या विशेष महत्त्वाच्या आहेत. माडगूळकरांच्या अशा लावण्यांतील कृष्ण हा खट्याळ आहे, खोडकर आहे. त्यालाही रसराज शृंगाराची गोडी आहे, पण ' इष्काची चटक ' मात्र नाही. त्यांच्या लावण्यांतील कृष्ण गौळणींची वाट अडवितो, त्यांचे दह्यादुधांचे माठ फोडतो, यमुनेच्या तीरी धिंगाणाही घालतो, पण त्याचे हे सर्व प्रकार एका विशिष्ट मर्यादेपर्यंतच चाललेले आहेत. मर्यादा पाळूनही माडगूळकरांनी अशा लावण्या कशा चित्ताकर्षक केल्या आहेत, पाहा :

" काय म्हणू मी याच्या खोडिला !
ओला पदर की माझा ओढिला
चंद्रहार गळ्यातिल तोडला
कुणीतरी धावा " ('पुढचं पाऊल')

माडगूळकरांच्या लावण्यांची संतकाव्याने सततच पाठराखण केलेली आहे. तत्त्वज्ञानाच्या ऋणानुबंधाचे, त्यांच्या लावणीतील भावगंधाबरोबरच अनेकदा दर्शनही घडते. त्या दृष्टीने खालील लावणी उल्लेखनीय आहे :

" विषयवासना वाजे वीणा, अतृप्ती दे ताला,
अनय–अनीती नूपुर पायी, कुसंगती करताला,
लोभ–प्रलोभन नाणी फेकी, मजवर आला–गेला,
थकले रे नंदलाला " (' जगाच्या पाठीवर ')

माडगूळकरांच्या भावनोत्कट काव्यातून जीवनातील तत्त्वज्ञानाचे दर्शन आपणांस ठायी ठायी घडते. रामजोशी, परशराम इ. शाहिरांची, लावणीत तत्त्वज्ञान गुंफण्याची, किमया

त्यांनीही केलेली आहे. किंबहुना ही शाहिरी परंपराच त्यांनी पुढे चालविली आहे, असे म्हणावे लागेल. तत्त्वज्ञानाबरोबरच त्यांच्या लावणीला राग-तालाचाही विसर पडत नाही हेही वरील लावणीतून दिसून येते.

**चित्रपटासाठीच साकारलेली लावणी** :– अलीकडे लावण्या प्रामुख्याने चित्रपटासाठीच लिहिल्या जात आहेत. चित्रपट व लावणी यांचे असे अन्योन्य नातेच जमलेले आहे. माडगूळकरांची लावणीही प्रामुख्याने चित्रपटासाठीच साकारलेली आहे. त्यामुळे अर्थातच त्यांच्या लावणीवरही अनेक प्रकारची बंधने पडलेली आहेत. पण अशा बंधनांतूनही श्रेष्ठ गीतकाराचे स्थान त्यांना मिळाले. गीतकाराला वाटणारी खंत त्यांना कधीच वाटली नाही. त्यांच्या लेखणीला प्रतिभासूर्याकडून कवचकुंडलांचे वरदान मिळालेले होते. ते जे जे लिहितील त्याला काव्यत्वच नव्हे तर दिव्यत्व प्राप्त व्हावे, असे झाले होते मराठीतील या ' गजाननाने ' लावणीला स्पर्श केला आणि लावणीला अमरत्व प्राप्त झाले.

लावण्या या चित्रपटासाठीच असल्याकारणाने व काही मिनिटांचाच हा संसार असल्याने प्रत्येक लावणी म्हणजे एक परीक्षाच ! ती संगीतदिग्दर्शकाच्या तालावरची खऱ्या अर्थाने तारेवरची कसरत. पण अशा अडचणींतूनही माडगूळकरांची लावणी अंतर्बाह्य सौंदर्याने न्हाऊन निघालेली आहे, संगीताने निथळते आहे. तिच्यातील शब्द न् शब्द सौंदर्यसाज लेऊन आलेला आहे. लौकिक जीवनाच्या भोवती फुललेल्या त्यांच्या लावण्या भावगंधाने घमघमत आहेत. अर्थात शृंगार हा अशा लावण्यांचा प्राण आहे. प्रीतीच्या नवथर लहरींनी लहरून गेलेल्या, चित्रपटातील असंख्य लावण्यांच्या नायक-नायिकांच्या भावना माडगूळकरांनी जशाच्या तशा शब्दांकित केलेल्या आहेत. त्यांत अनेक गडद-फिके भावरंग आहेत. जलतरंगातील प्रत्येक पात्रात जलच असले तरी प्रत्येक पात्राचा नाद भिन्न भिन्न असतो. त्यातील नादतरंग श्रवणीय असले तरी अवर्णनीय असतात. ते श्रवणसुख 'न ये सांगता' अशा जातीचे असते. अगदी तसेच माडगूळकरांच्या लावण्यांचे आहे. प्रत्येक लावणीतील सौंदर्य अनोखे आहे, अनामिक आहे, आणि अनिर्वचनीय आहे. प्रीतीचे विविध भाव टिपणाऱ्या त्यांच्या लावण्यांना मोठे देखणेपण प्राप्त झाले आहे. माडगूळकरांच्या लावण्या, त्यांच्या नायिकांप्रमाणे प्रेमसागरात, सचैल भिजलेल्या आहेत. माडगूळकरांच्या प्रेमपर लावण्यांत विविध रसरंगांच्या रंगपंचमीची बहार आहे. पेशवाईतील शाहिरांच्या लावण्यांत नायिकेचे देहसौंदर्य व वस्त्रालंकारवर्णन यांवर विशेष भर होता तर माडगूळकरांनी मात्र ' अंतरंग– ओथंबुनी ओसंडे ती सुंदरता ' या दृष्टीने नायक–नायिकांच्या अंतरंगातील भावसौंदर्यावर भर दिलेला आहे. खालील लावणीत विरहव्याकूळ नायिकेची प्रीतीची भावना कशी सांगितली आहे, पाहा :

" कधी नाही झाली राया चांदण्यात भेट
कधी आड आली नाही धुक्याची पहाट
कधी नाही झाली गाली गुलाची निशाणी " ( ' गंगेत घोडं न्हालं ' )

माडगूळकरांच्या लावणीतील शब्दाशब्दांत सौंदर्याचे विविधरंगी ऐने जडविलेले असतात. कोनाकोन्यातील ऐन्यांनी, सारा संगमरवरी महालच प्रकाशाने लखलखू लागावा, त्याप्रमाणे प्रासादिक, ललितमधुर शब्दरचनेमुळे त्यांची सगळी लावणी नटूनथटून रसिकांसमोर येते. यौवनाने मुसमुसलेल्या, सुंदर नर्तिकेने फरसबंदीवर पदस्पर्श करताच, रुमझुमत्या चाळांतून नादांची असंख्य फुलपाखरे फेर धरतात, त्याप्रमाणे त्यांच्या लावणीतील ध्वन्यर्थाने व नादमधुर शब्दांनी, सगळी लावणीच आगळ्या सौंदर्याने चमकून उठते. यमक-अनुप्रासाच्या संगतीनेच त्यांची लावणी साकार होते. संगीतानुकूल अशीच त्यांनी आपल्या लावण्यांची रचना केलेली आहे.

" मी गौळ्याची उमदी पोर, जणु चंद्राची चढती कोर
...अंग गोरटे उमदा थाट, तंग कंचुकी उघडी पाठ
घागऱ्या घोळात, रुणझुण चाळात
बांधुन नेते मी कैकांला ! " ('सख्या सावरा मला')

माडगूळकरांनी केवळ संगीताचाच विचार केलेला नाही. अशा या लावण्यांतून त्यांनी भावसमाधीत बुडालेल्या नायक-नायिकांची मोहकशी भावओली चित्रेच शब्दांकित केलेली आहेत. या लावण्यांत प्रीतीची आतुरता आहे, कातरता आहे. निसर्गाच्या पार्श्वभूमीवर काढलेली, शृंगाररसात रसरसलेली लावणी रसिक हृदयाचा ठाव घेते. त्यांच्या शृंगारिक लावण्या उल्लेखनीय स्वरूपाच्या आहेत. या दृष्टीने खालील लावण्या पाहा :—

" रात चैताची जाते सुनी ग, माझ्या राया‌ला कळवा कुणी ! "

किंवा, " टिपेत वारा म्हणे लावणी, झील धरी वादळ
खदखद हासे फेस पुराचा, चढू लागले जळ
पावसात या तुझ्यावाचुनी नाच कशाला करू ? " ('पुनवेची रात')

अथवा, " पावसात मी भिजले नाथा, गाल निथळती जळी
ओठांनी ते टिपा नि सांगा शराब का वेगळी !
तो कैफ उतरतो एका घटकेमधी
या धुंदपणाला उतार नाही कधी " ('पुनवेची रात')

कोणत्याही जुन्यानव्या विषयाला व प्रसंगाला माडगूळकर अगदी सहजपणे लावणीच्या घाटात साकार करतात. " बुगडी माझी सांडली ग जाता साताऱ्याला " ही अशा प्रकारची लावणी आहे.

'सवालजबाब' व 'झगडा' हा माडगूळकरांच्या लावण्यांचा आणखी एक महत्त्वाचा प्रकार आहे. अशा प्रकारच्या लावण्यांत, माडगूळकरांच्या लावणीवाङ्मयाचा प्रकर्ष झालेला आहे. अशा लावण्या रागतालांच्या सुरावटीने जशा कर्णमधुर झालेल्या आहेत, तशाच त्या भावनोत्कटही उतरलेल्या आहेत. पारंपरिक लावणीकारांच्या लावण्यांतूनही हा प्रकार असला तरी माडगूळकरांनी या प्रकारच्या लावण्यांनाही आपल्या प्रतिभेच्या नवतेजाने

उजळून टाकलेले आहे. अशा लावण्यांनाही नवा थाट नवा घाट दिलेला आहे. पूर्वीच्या दीर्घसूत्री लावण्यांना त्यांनी आटोपशीर, सुटसुटीत व चित्रपटांच्या दृष्टीने गायनानुकूल करून, सौंदर्यसूत्रात बद्ध केलेले आहे. पारंपरिक लावणीत असलेल्या अभिनयाच्या अंगाची त्यांनी काळजी घेतलेली आहे. नायक-नायिकेचे व्यक्तिमत्त्व व मूळ चित्रपटातील प्रसंग चित्ताकर्षक होईल या दृष्टीने त्यांनी लावणी लिहिली आहे. विविध प्रसंगांची, विविध रसांची उधळण करणाऱ्या त्यांच्या लावण्या म्हणजे दवात भिजलेल्या मोगऱ्या गुलाबांच्या टपोऱ्या कळ्यांप्रमाणे, भावगंध उधळीत, सहजपणे रसिक हृदयापर्यंत येऊन पोहोचतात. यातच त्यांच्या लावणीचे चिरंजीवित्व आहे, अक्षरत्व आहे, अमरत्व आहे. नृत्य, गायन व अभिनय एवढ्याच कलांना उठाव देणारा ' सवाल जबाब ' हा लावणीप्रकार नाही, तर प्रज्ञा-प्रतिभेची याला जोड असावी लागते. चातुर्य, व्यवहारज्ञान, तत्त्वज्ञान या सर्वांचा समन्वय घालणारी या प्रकारची लावणी सर्वसामान्य कवीच्या प्रतिभेला पेलणारी नाही. प्रज्ञा-प्रतिभेचा सुरेख मेळ जमविणारा हा खेळ चित्रपटात मोठ्या मनोरम रीतीने रंगतो. ' वैजयंता ' या चित्रपटातील माडगूळकरांची लावणी तर अप्रतिम आहे. स्त्री आणि पुरुष यांत श्रेष्ठ कोण ? याबाबतीत रंगलेला सवालजबाब असा :

ती–" पुरुषावाचुनी जन्मे नारी, या पृथ्वीचा कोण पती ?
पित्यावाचुनी जन्मा आली, काय थांबली तिची गती ? "
तो–" पुरुषासाठी नार जन्मते, पुरुषासाठी जन्म तिचा
वृक्षावाचुन जन्म पांगळा फुलारणाऱ्या वेलीचा. "

चित्रपटसृष्टीला सवाल-जबाबाच्या रूपाने माडगूळकरांनी अक्षय्य सौंदर्याचे असे देणे दिलेले आहे.

रविकिरणमंडळात ज्याप्रमाणे माधव जूलियन यांच्या सभोवती अनेक कवींची प्रभावळ निर्माण झाली त्याप्रमाणे लावणीकार माडगूळकर यांच्या लावण्यांवर लोभावलेला एक गीतकारांचा वर्गच निर्माण झाला व लावणीचा दुसरा बहार फुलला. लावणीला शाहिरांची थोर आणि संपन्न परंपरा असली तरी चित्रपटानुकूल लावणीला खरे रूप दिले माडगूळकरांनीच. त्यांच्या लावण्यांप्रमाणेच चित्रपटासाठी लावण्या लिहिण्याचे प्रयत्न जगदीश खेबूडकरांसारख्या अन्य गीतकारांनी केले. कोल्हापूरच्या रंगेल मातीत जसा पोवाडा फुलला तशी रंगेल लावणी रंगली. हा एक योगायोगच म्हणावा लागेल.

बोरकर, अमरशेख, वसंत बापट, जगदीश खेबूडकर, शांता शेळके अशा काही समर्थ कवि-कवयित्रींनी लावणीची परंपरा पुढे चालविली आहे. लावणी आणि भावगीत यांत अगदी जवळचा व जिव्हाळ्याचा संबंध आहे. आवळ्या जावळ्या बहीण–भावाप्रमाणे त्यांचा चेहरा–मोहरा सारखा वाटावा असे अनेकदा घडते. भावगीताचे बरेच गुण लावणीत दृग्गोचर होतात; पण म्हणून लावणी व भावगीत हा एकच काव्यप्रकार नव्हे. लावणीचे सौंदर्य भावगीताला येऊ शकत नाही. गीत आणि संगीत या दोन्ही अंगांचा भावगीतातही

विचार केलेला असला तरी भावगीतापेक्षा लावणी हा काव्यप्रकार निश्चितच वेगळा आहे. अलीकडे भावगीतालाच लावणीची लेणी चढविण्याचा पुष्कळदा प्रयत्न होतो, परंतु त्यामुळे अस्सल लावणी ऐकल्यानंतर होणारा आनंद रसिकांना लाभत नाही. लावणी ही तिच्या ठेक्या–ठसक्यासकट ऐकली तरच रसिकाची कळी खुलते व लावणी ऐकल्याचे त्याला समाधान मिळते.

'बोरकरांची कविता' भावकविता आहे. त्यांची प्रतिभा भावगीतानुकूल स्वरूपाची आहे. त्यांच्या काही भावगीतांचा तोंडवळा अगदी लावणीसारखा वाटतो. उदा.—

"गडे लबाडी झाली उघडी पहा पहा परतीरी ग
निळ्या महाली स्वर्णमंचकी विडा रंगला जहरी ग"

('आपण दोघे लहरी ग–बोरकरांची कविता')

किंवा "घरात पडले आज चांदणे ऊठ साजणा ऊठ जरा
परस्परांवरि या किरणांपरी सोड़ पुनरपि नयनशरा"

('घरातले चांदणे')

शाहीर अमरशेख यांनी लावणीतून सामाजिक क्रांतीची सूक्ते गायिली व मराठी शारदेच्या 'कलशा'त, वालेघाटी मातीशी इमान राखून, शाहिरी अमृतबिंदू टाकले व माडगूळकरांच्याप्रमाणेच अकाली निधनाने मराठी मनाला चटका लावला. अमरशेख यांनी शाहिरी परंपरा पुढे चालविली व लावणीला नवीनच सामाजिक आशय प्राप्त करून दिला, नवीन दिशा दिली व गती दिली. त्यांची आधुनिक लावणी कशी आहे याची कल्पना आपणांस 'कलशा'तील त्यांच्या खालील लावणीने येईल :

"काम करून गिरणीत थकली रं
माझी मालन कामानं सुकली !
फाटं पिकलेलं जांभूळ ताजं
नाचे चौखुर हरिणच माझं
निस्त्या सायीचं रं लोणी लाजं
ज्वानी साच्याच्या सांध्यात टाकली रं" ('मालन कामानं सुकली')

शाहीर अमरशेख यांनी लावणीला नवे रूप दिले, नवा रंग दिला. स्वेदगंगेच्या काठा-काठाने जाऊन क्रांतिसागराला भेटण्यासाठी आतुरलेली त्यांची लावणी आहे. तिच्या हृदय-गर्भी क्रांतीच्या पाऊलखुणा उमटलेल्या आहेत हे त्यांच्या याच लावणीच्या उत्तरार्धातील

"झेंडा सुखाचा मैदानी पाहू ये
गाणी मिळून क्रांतीची गाऊ ये"

या ओळींवरून दिसून येते.

वसंत बापटांच्या काव्याला अमरशेख यांच्या काव्याप्रमाणेच सामाजिक बैठक आहे. 'बिजली'च्या रूपाने येणारी त्यांची प्रतिभा नेहमीच 'अकरावी दिशा' शोधीत असते.

या शोधामुळेच त्यांना 'शिवदर्शन' व 'महाराष्ट्र दर्शन' घडले. त्यांच्या नाट्यात काव्य आहे व काव्यात नाट्य आहे. सामाजिक जाणिवेचे कोंदण त्यांच्या काव्यरूप हिऱ्याला लाभल्यामुळे मराठी साहित्यात त्यांच्या काव्याचे वेगळेपण जाणवते. आकाशातून पृथ्वीवर येणाऱ्या थेंबाच्या जलधारा होऊन याव्यात, त्याप्रमाणे त्यांचे काव्य लयबद्ध भावधारांच्या रूपाने येते. त्यांचे काव्य हे रसिक हृदयावर विविध रसांची धारानृत्ये घेऊनच पदार्पण करते. त्यांच्या लावणीच्या यशाचे हेच गमक आहे. त्यांच्या लावणीला हीच लयबद्धता, तालबद्धता लाभली आहे. लावणीला अनुकूल अशी त्यांची शब्दशैली आहे हे 'अकरावी दिशा 'या त्यांच्या काव्यसंग्रहातील खालील लावण्यांवरून दिसून येते :

"वैशाखाच्या उन्हात फिरते पौषातिल यामिनी
मनामनाला वणवा लावी शीतळ सौदामिनी
चोळीसाठी हिने वेतली पांगाऱ्याची फुले
हिरवा वारा पदर होउनी हळव्या अंगी झुले
साळीच्या ओळीत मधे हे शेत तिळीचे खुले
हिला पहाता होति शहाणी वय सोळातिल मुले"

(लावणी-'शीतळ सौदामिनी')

निसर्गाच्या हलत्या चित्रफलकावरील हे सौंदर्यसंपन्न लावण्यचित्र कुणाही रसिकाला मोह घालील. खालील नवीन विषयावरील लावणी पाहा :

"मुंबइच्या मनकर्णिके, नेमुनी फिके, वमन हे गहिना
तू जातिस कोठे अशी गडे भरदिशी, उन्हाचा महिना
...टाचेत उचलले बूट घालुनी कूट, गोंधळे धरती !
ही फैनावाजी अशी ग शिकलिस कशी, उडविण्या दैना."

प्रतिभासामर्थ्य असेल तर नवीन विषयावरही लावणी अशी चटकदार होते. शांता शेळके यांच्या नावाने भावगीतकार म्हणून चित्रपटसृष्टीत स्वतःचे असे विश्व निर्माण केलेले आहे. लालित्य हा त्यांच्या भावगीताचा एक महत्त्वाचा विशेष. हेच ललितलेणे घेऊन त्यांची लावणी मराठी रसिकांना रिझवीत आहे. 'तोच चंद्रमा' या भावगीताच्या संग्रहात लावणीचे मुलायम विश्व फुललेले आहे. आजच्या लावणी-वाङ्मयात शांता शेळके यांनी स्वतःचा विशिष्ट दर्जा राखलेला आहे. माडगूळकरांच्या 'चैत्रबना'तून ज्याप्रमाणे लावण्यांचा भावगंध दरवळत रसिक हृदयापर्यंत येतो, त्याच प्रकारचा भावगंध 'तोच चंद्रमा' यातूनही येऊन त्यातील भंतरलेल्या क्षणांनी रसिकाची भावसमाधी लागते. शाहिरांच्या लावण्यांपासून आजच्या लावण्यांपर्यंत लावण्या या पुरुषांनीच लिहावयाच्या असा रिवाज निर्माण झालेला आहे; पण शांता शेळके यांनी लावण्या लिहून या लावण्यमयी दालनात स्त्रीच्या प्रतिभेचा साक्षात्कार घडविला आहे. स्त्रीनेच चित्रित केलेला स्त्रीचा स्वभाव, तिची सुखदुःखे, विरह-व्याकुळता, प्रीतीची सफलता-विफलता यांचे भावपूर्ण दर्शन त्यांच्या लावण्यांतून घडते.

शांता शेळके यांच्या लावणीला संवेदनक्षमतेचे विशेष वरदान लाभले आहे. त्यामुळे त्यांच्या लावण्या संगीतानुकूल व नादमधुर बनल्या आहेत. त्यांच्या लावण्यांत विविधता आहे. ‘ कशि अवचित वाजविली वेणू । या कृष्णाला काय वाई म्हणू ? ’ अशा कृष्ण-वेणूने वेडावलेल्या राधेच्या भावव्यथा वर्णन करणाऱ्या, भक्तिरसात रसरसलेल्या जशा त्यांच्या लावण्या आहेत तशाच सवालजवाबाच्या, शृंगाराच्या गुलाबी रंगाने रंगलेल्या लावण्याही आहेत. स्त्रीमनाचा एक एक पदरच त्यांच्या लावण्यांत उलगडत जातो. उदा.

“ कधी हळूच द्यावा जरिपदराला झटका
कधी मुरडुन डोळे राग धरावा लटका
कधी फुगुन बसावं उगीच घटका घटका
कधी उचलावी, भुवई डावी, हसुन बघावं जरा
माझ्या नखऱ्याच्या शंभर तऱ्हा ! ”

खरोखरच स्त्रीमनाच्या, स्त्रीच्या नखऱ्याच्या शंभर तऱ्हांचा मराठी लावणीने रसिकांना नजराणा दिलेला आहे. शांता शेळके यांच्या लावण्यांत ज्याप्रमाणे संगीतानुकूल लय असते त्याचप्रमाणे अभिनयानुकूल अशा या लावण्यांना नाटयाची मोहकताही लाभलेली आहे. एखाद्या भरजरी पैठणीची घडी डोळ्यांपुढे उलगडत जावी त्याप्रमाणे त्यांची लावणी कशी श्रवणमधुर व नयनसुभग असते व स्त्रीभावनेचा एकेक पदर तिच्यातून उलगडत जातो हे खालील लावणीवरून दिसून येईल :

“ घडी उकलता सोनसळयांचा दिसेल चमकुन रंग
रेशमातुनी खुलेल माझे फिक्कट पिवळे अंग
दंडावरती जडवुन ऐने चोळि अंजिरी शिवा
पैठणी मला नवी आणवा ”

संगीताची धून रसिक मनाला नेहमीच हरवून टाकते; पण तरीही खरी वेधवंती लावणी शब्दा शब्दांतील जादूने रसिकांना धुंद-फुंद करते. शांता शेळके यांच्या लावणीरूपी पैठणीत भावनेची सोनसळ व संगीताची रुपेरी तारेची झळझळ आहे. तसेच या गुलाबी पैठणीला निसर्गाची हिरवी किनार लाभलेली आहे. या किनारीने त्यांची लावणी थेट हृदयापर्यंत जाते. श्रावणाच्या रिमझिम सरीतील ही लावणी पाहा. ती भाव-कल्पनेच्या रिमझिम सरीत कशी ओलीचिंब झाली आहे :–

“ बाहेरी श्रावण, श्रावण फुलला घरी
उन्ह तुमचे माझ्या रिमझिम श्रावणसरी
उमटेल इंद्रधनु रंगित माझ्या उरी
उन्हात पाउस, पावसात उन्ह खेळ बघू रंगुनी
तोवरी थांबाना घरधनी ! ”  ( लावणी श्रावणाची )

अनुक्रमणिका

शांता शेळके यांच्या लावणीला ललित्याबरोबरच प्रसादमयता लाभली आहे. सूर ऐकताच जी कानामनाशी चटकन नाते जुळविते ती सुंदर लावणी. शाहिरांच्या लावण्यांनी यामुळेच रसिकांची, सामान्य माणसांची हृदये जिंकली व लावणी त्यांच्या हृदयसिंहासनावर विराजमान झाली. शेकडो वर्षे अशा या लावणीने मनरंजन केले. अशीच त्यांची ही एक लावणी पहा :

" हजार डोळं, करत्यात चाळं, सावरून पदरा घेऊ कशी ?
भरल्या बाजारी जाऊ कशी ? " (उभ्या चढाचा अवघड घाट)

अशी ही आजची लावणी आहे. मराठी माणसाचे ते एक वेड आहे. मराठी माणसाला लावणीची जबरदस्त ओढ आहे. काळाप्रमाणे या लावणीची रंगरूपे थोडीफार बदलली तरी लावणी ही विड्याप्रमाणे मराठी ओठात सतत रंगतच राहील यात तिळमात्र शंका नाही.

शारदेच्या दरबारात शाहिरांनी लाविलेल्या रत्नदीपाला, ग. दि. मां.च्या अकाली निधनानंतर तेवत ठेवण्याचे कार्य ज्या गीतकारांवर येऊन पडले आहे, त्या गीतकाराचे नाव आहे जगदीश खेबूडकर. शारदेचा वरदहस्त असलेल्या या भावकवीच्या लावण्यांनी चित्रपटसृष्टी आज रसरसलेली आहे. लावणीशिवाय चित्रपट म्हणजे मिठाशिवाय स्वयंपाक, असे वाटावयास लावणारी आजची लावणी, ' व्ही. शांताराम ' व ' शाहीर दादा कोंडके ' यांच्या सदिच्छेने फुलते आहे. या दोन्ही चित्रनिर्मात्यांनी मराठी चित्रपटाला आज सोन्याचे दिवस दाखविले. त्यांनीच लावणीप्रधान चित्रपटांचा एक जमानाच सुरू केला. ' सांगत्ये ऐका '-पासून हे एक नवीन युग सुरू झाले. ' पिंजरा ', ' झुंज ', ' चंदनाची चोळी अंग अंग जाळी ' अशा चित्रपटांनी आजची लावणी खऱ्या अर्थाने पुन्हा बहरून आली आहे. ' लावणी ' हे अशा चित्रपटांचे महत्त्वाचे आकर्षण ठरलेले आहे.

" चवन्नी न पावली चिल्लर खुर्दा त्यातली न्हवं मी वरं का
बंदा रुपाया हाय ह्यो पावनं नाद छनछना ऐका
आता लाज वेशीवर धडकली, अन् इंगळी इष्काची भडकली. "

माडगूळकरांच्या नंतरची लावणी ही अर्थातच अधिक भडकली आहे असे वाटते. ध्वन्यर्थाचा रस्ता सोडून ती वाच्यार्थाच्या वेशीवर आलेली आहे. पण खेबूडकरांची लेखणी लीलावती आहे; कलावती आहे. प्रसंगानुरूप ते आपल्या लावणीला गडद–फिके रंग देत आहेत. आजची लावणी विकासाच्या वाटेवर आहे. नवीन वळणावर आहे. ' तुमचं आमचं जमलं ', ' पांडू हवालदार ', ' सोंगाड्या ' यांतील खेबूडकर–दादा कोंडके यांच्या लावण्या नवीन प्रकारच्या आहेत. निळ्या नभात फुलपाखरांनी हव्या तशा गिरक्या घ्याव्यात, त्याप्रमाणे आजची नवी लावणी नव्या चाली-बोलीने, आकारा-प्रकाराने बहरत आहे. तिला नव्या आशा, नव्या दिशा लाभल्या आहेत. तिचे नवे दर्शन जरा चमत्कारिक वाटले, नवखे–अनोखे वाटले तरी तिचे लावणीपण हरवले जाणार नाही.

# ७

# भक्तिपंथाच्या नवचिंतनाची आवश्यकता

**ग्रंथ-समीक्षक : रामचंद्र चिंतामण ढेरे**

---

' भक्तिपंथ : नवचिंतन ' हे डॉ. हे. वि. इनामदारांचे नवे पुस्तक मी नुकतेच वाचून हातावेगळे केले. मला ते आवडले.

" भक्तिपंथीय संत आणि त्यांचा भागवत धर्म यांच्याविषयी वेळोवेळी केलेले चिंतन आणि लेखन एकत्रित करावे आणि त्यामधून या संप्रदायाच्या सांस्कृतिक संचिताचा आलेख रेखाटावा, या भूमिकेतून " डॉ. हे. वि. इनामदार यांनी आपला हा लेखसंग्रह सिद्ध केला आहे. संतसाहित्य हा लेखकाच्या अभिरुचीचा आणि अभ्यासाचा विषय आहे. संत-वाङ्मयावर प्रसंगोपात्त दिलेली व्याख्याने आणि केलेले लेखन यातून येथील बरेच लेख तयार झाले आहेत. भक्तिपंथाचे हे ' नवचिंतन ' आहे. येथील नऊ निबंधांतून व्यक्त झालेले चिंतन काहीसे नवे आहे; स्वागत आहे.

' भक्तिपंथ : नवचिंतन ' या पुस्तकाच्या संकलनामागची भूमिका आणि त्याचे स्वरूप लेखकांच्या शब्दांत हे असे आहे.

भक्तिपंथाचे हे नवचिंतन जसे नवविध आहे, तसेच नवे ( काहीसे ) आहे, असे स्वतः डॉ. इनामदार यांनीच आपल्या प्रारंभीच्या निवेदनात म्हटले आहे. भक्तिपंथाचा उदय आणि विकास ही केवळ मध्ययुगीन महाराष्ट्राच्याच नव्हे, तर अखिल भारताच्या सांस्कृतिक जीवनातील विलक्षण घटनामालिका असल्यामुळे, भक्तिपंथाचे नवचिंतन सातत्याने घडत राहावे ही सांस्कृतिक इतिहासाच्या क्षेत्रातील प्रत्येक अभ्यासकाची स्वाभाविक ओढ आहे. या ओढीपोटीच ' भक्तिपंथ : नवचिंतन ' या शीर्षकाने मी आकर्षित झालो आणि डॉ. इनामदारांच्या या पुस्तकाच्या निमित्ताने भक्तिपंथाच्या नवचिंतनाविषयी काही अपेक्षा व्यक्त करण्याची संधी घ्यायला प्रवृत्त झालो.

डॉ. इनामदार हे मराठी वाङ्मयाचे एक ज्येष्ठ अध्यापक आहेत; प्राचीन मराठी वाङ्मय, त्यातही संत-वाङ्मय हा त्यांच्या विशेष आवडीचा विषय आहे. ' संत नामदेव ' या विषयावर प्रबंध लिहून त्यांनी अत्युच्च पदवी प्राप्त केली आहे. या प्रबंधाबाहेरही त्यांनी संत नामदेव या विषयावर आणि तदनुषंगाने मराठी भक्तिपरंपरेवर स्फुट लेखन केले आहे. त्या विषयावर त्यांनी वेळोवेळी अनेक व्याख्याने दिली आहेत;

संतवचनांनी रंगलेल्या त्यांच्या वाणी-लेखणीला प्राप्त झालेला गोडवा भाविक रसिकांच्या प्रेमादराचा विषय झालेला आहे. अर्थातच अत्युच्च पदवीनंतरचे त्यांचे भक्तिपंथविषयक चिंतन म्हणून 'भक्तिपंथ : नवचिंतन' या त्यांच्या पुस्तकाकडे आपण विशेष अपेक्षेने वळतो.

या संग्रहातील नऊ लेखांपैकी पहिला लेख ' मध्ययुगीन मराठी वाङ्मयाची समीक्षा ' असा आहे. त्यानंतरचे क्र. २ ते ७ हे सहा लेख ज्ञानदेव, नामदेव व जनाबाई यांविषयीचे म्हणजे ज्ञानदेव नामदेव कालखंडाशी निगडित आहेत. आठवा लेख तुकारामांविषयीचा आणि नववा लेख वारकरी संप्रदायाविषयीचा आहे. पूर्वप्रकाशित स्फुट लेखनाला संकलित स्वरूप देताना त्यातील विषयसूत्र नंतरच शोधले जाते आणि नामकरणही नंतरच केले जाते. त्यामुळे शीर्षकाने सूचित होणाऱ्या विषयकक्षेत सर्व लेख आपले औचित्य राखतातच असे नाही. येथे अग्रमान दिला गेलेला ' मध्ययुगीन मराठी वाङ्मयाची समीक्षा ' हा लेख असाच आगंतुक वाटतो—' भक्तिपंथ : नवचिंतन ' या विषयकक्षेत त्याचे स्थान सिद्ध होऊ शकत नाही. जर शेवटचा वारकरी संप्रदायाविषयीचा लेख प्रारंभी घेतला असता आणि हा पहिला लेख अखेरीस परिशिष्ट-स्वरूपात समाविष्ट केला असता, तर ते त्याचे स्थान उचित ठरले असते. अर्थात ही उणीव पुस्तकाच्या विषयद्योतक नावामुळे जाणवते; एरवी स्फुट लेखसंग्रहात विषयसूत्र राखलेच पाहिजे, असा आग्रह असण्याचे कारण नाही.

हे सर्व लेख वाचताना अगदी प्रथमदर्शनी जाणवणारा विशेष हा आहे की, हे लेख अध्यापकाच्या–शिक्षकाच्या भूमिकेतून लिहिलेले आहेत. ज्ञानाचा कोणताही अंश अध्यापन-विषय झाल्यानंतर तो अनभिज्ञांना समजावून सांगण्यासाठी, त्या विषयाची गोडी निर्माण करण्यासाठी जशी पद्धती शिक्षकाला अवलंबावी लागते, तशा पद्धतीने हे सर्व लेख लिहिलेले आहेत. पूर्वोपलब्ध ज्ञानाची मुद्देसूद मांडणी करणे आणि ती रोचक करण्याचा प्रयत्न करणे हे अध्यापनात आवश्यक असते. डॉ. इनामदार यांनी बहुतेक सर्व लेखविषयांचा प्रस्ताव करताना विषय-संबद्ध संज्ञांच्या व्युत्पत्ती आणि संकल्पनांच्या व्याख्या देण्यापासून प्रारंभ केला आहे आणि पुढे विवेच्य विषयाचे मुद्दे सांगून, नंतर त्या मुद्दयांना अनुसरून विषय समजावून देण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ–

( १ ) " ज्ञानदेवांचे हे आत्मनिवेदन पुढील विषयांच्या प्रकाशात अभ्यासता येईल. " ( क्र. ३ )

( २ ) " पुढील मुद्दयांना अनुलक्षून ( नामदेवांच्या ) क्रांतदर्शित्वाचा हा शोध येथे घ्यावयाचा आहे. " ( क्र. ६ )

( ३ ) " संत जनाबाईविषयीचा प्रस्तुत अभ्यास पुढील मुद्दयांना अनुलक्षून मांडला आहे. " ( क्र. ७ )

' ज्ञानदेवे रचिला पाया ' ( क्र. २ ) या लेखात ज्ञानदेवांचे पायाभूत कार्य स्पष्ट करण्या-पूर्वी ते ' प्रस्तुत विषयाची व्याप्ती ' प्रारंभी स्पष्ट करतात आणि या वारा पानी लेखातील विवेचन ' तत्त्वज्ञान ' या संकल्पनेच्या व्याख्येपासून सुरू करतात. ' नामदेवांचे क्रांतदर्शित्व '

( क्र. ६ ) आपल्या वाचकांना स्पष्ट करून सांगायचे, तर ' क्रांतदर्शित्व ' म्हणजे काय, हे त्यांना प्रथम समजले पाहिजे, याचे ते भान ठेवतात. ' तुकारामांचा साक्षात्कार : एक संशोधन ' ( क्र. ८ ) या निबंधात तर संशोधन म्हणजे काय, त्याचे दोन प्रकार कोणते, तसेच त्याचे दोन विभाग कोणते, प्रस्तुत अभ्यासाची व्याप्ती कोणती, साक्षात्काराची संकल्पना काय आहे, साक्षात्काराचे निकष कोणते, हे सांगण्यासाठीच ते सर्व लेखाची व्याप्ती खर्ची टाकतात आणि ' तुकारामांचा साक्षात्कार ' हा मुख्य विषय तसाच राहून जातो. शेवटच्या ' वारकरी संप्रदाया 'विषयीच्या लेखातही वाचकांना मुद्द्याची कल्पना दिल्यानंतर ' वारकरी ', ' संप्रदाय ', ' संत ' इत्यादी संज्ञांचे व्युत्पत्तिसिद्ध स्पष्टीकरण देऊनच ते पुढे क्रमाने मुद्दे स्पष्ट करण्याकडे वळतात. प्रत्येकी सुमारे दहा-बारा पानांचे हे लेख वाचताना, एखाद्या उपचारप्रधान प्रबंधाच्या उपक्रमासाठी आवश्यक मानले गेलेले हे विशेष वाचक अपेक्षित नाही. तरीही डॉ. इनामदारांनी ज्या अर्थी आपल्या सर्व लेखांचे हे वैशिष्ट्य राखले आहे, त्या अर्थी त्यांची अध्यापक भूमिका हे लेख लिहिताना प्रसन्न राहिली आहे; हे स्पष्टपणे जाणवते.

ही अध्यापकाची–शिक्षकाची भूमिका एकदा ध्यानी घेतली, म्हणजे अशा लेखनाचे जीवितप्रयोजन आणि महत्त्व समजण्यास वेळ लागत नाही. आपल्या विवेच्य-विषयाचे पूर्वसिद्ध ज्ञान करून घ्यावे; त्याच्या सर्वजनसुगम मांडणीचे एक तंत्र बसवावे; भाषेत प्रसाद आणि माधुर्य राखावे आणि विवेच्य विषयाचा बोध जिज्ञासूंना घडावा, यासाठी ' विवरिलेंचि विवरावें, ' हा समर्थांचा संदेश प्रत्यक्षात आणावा, हे उत्तम अध्यापकाचे आवश्यक कर्तव्य ठरते. डॉ. इनामदारांच्या या सर्व लेखांत या अध्यापकीय गुणविशेषांचा प्रत्यय सर्वत्र येतो. त्यांनी या नऊ लेखांतून घडविलेले भक्तिपंथाचे दर्शन नवे असो–नसो, ते प्रसादपूर्ण आणि मधुर शैलीत घडविले असल्यामुळे ( वाचकाला अवघडून टाकणारे मुद्रणदोष असले, तरी ) वाचनीय झाले आहे, यात संशय नाही.

विशेषतः क्र. २ ते ७ हे सहा लेख डॉ. इनामदार यांना प्रिय असलेल्या ज्ञानदेव-नामदेवांविषयी आणि त्या कालखंडाविषयी असल्यामुळे वेधक झाले आहेत. जनाबाई-विषयीचा लेख ( क्र. ७ ) हा तर त्या विषयाच्या रूढ पद्धतीच्या सर्वांगीण अभ्यासाचा समृद्ध आलेखच म्हणावा लागेल.

हे सर्व लेख प्रसंगाप्रसंगाने लिहिलेले आहेत. काही लेख म्हणजे व्याख्यानांचे अक्षररूप आहे, असे लेखकानेच प्रारंभी म्हटले आहे. हे लेख संकलित करताना, त्यांचे साक्षेपाने पुनर्निरीक्षण करण्याइतका अवधी लेखकास मिळाला नसावा, असे काही स्थळांवरून वाटते. उदाहरणार्थ अशी काही स्थळे येथे नोंदवीत आहे :

१. ' मध्ययुगीन मराठी वाङ्मयाची समीक्षा ' या पहिल्याच टिपणात सामाजिक समीक्षे-विषयी लिहिताना राजवाडे, सहस्रबुद्धे, सुंठणकर, लालजी पेंडसे इत्यादींची मते नोंदवली आहेत आणि लालजी पेंडसे यांच्या मताच्या अवतरणानंतर लगेच " राष्ट्रवादी समीक्षकांची

ही टीका सर्वस्वी एकदेशीय व पूर्वग्रहदूषित आहे. ” ( पृष्ठ. ३ ) असे विधान केले आहे. या विधानातील ‘ राष्ट्रवादी ’ ही संज्ञा फक्त राजवाडे-सहस्रबुद्धे यांनाच लावता येईल. तुंळणकर-लालजी पेंडसे यांचा संप्रदाय वेगळा आहे.

२. याच टिपणात शेवटी शेवटी पुढील विधान आहे : “ वीरशैव, चैतन्य आनंद, पाशुपत इत्यादी संप्रदायांनी मराठी वाङ्मयनिर्मितीत आपला वाटा उचलला नसला, तरी जुन्या मराठी वाङ्मयावर त्यांचा प्रभाव पडलेला आहे; त्यामुळे त्या धर्मपंथांचाही अभ्यास होणे आवश्यक आहे, हे डॉ. ढेरे यांचे सांगणे मान्य होण्यासारखे आहे. ” ( पृष्ठ ५ ) वास्तविक पाशुपत हा पंथ नाथपंथात विलीन होऊन 'नामशेष' झाल्यावरच मराठी वाङ्मय-धारेचा उदय झाला आहे; त्यामुळे मराठी वाङ्मयनिर्मितीत त्याचा वाटा अपेक्षित नाही. वीरशैव संप्रदायाच्या मराठी वाङ्मयाचा पहिला विस्तृत परिचय मी स्वतःच घडविला आहे आणि आता त्या विषयावर प्रबंध झाले आहेत, होत आहेत. आनंद संप्रदायाचे अनेक थोर आणि प्रचंड ग्रंथकार माझ्या प्रेमादराचा विषय आहेत. त्यातल्या दोघांवर प्रबंध झाले आहेत. अशा स्थितीत वीरशैव व आनंद या पंथांचा मराठी वाङ्मयनिर्मितीत वाटा नसल्याचे विधान मी कसे करीन ? आणि तसे ते केले असले, तरी ते कोणाही जाणकाराने ‘ मान्य होण्यासारखे ’ मानू नये. कारण ते विधान पूर्णतः चूकच मानावे लागेल.

३. शेवटच्या लेखात महानुभावांच्या अप्रियतेची कारणे, ‘ निवृत्तिपरता, इंद्रियनिग्रह व समाजविमुखता ’ अशी दिली आहेत ( पृष्ठ. ९० ); ती कुणाही विचारकाला पटणारी नाहीत. कारण या कारणांमुळे फार तर उपेक्षा होईल, अप्रियता वाटयास कशी येईल ?

४. “ महानुभावांची कृष्णभक्ती वल्लभांच्या पुष्टिमार्गाच्या वळणावर आहे, ” ( पृष्ठ १०६ ) हे विधानही असेच अनैतिहासिक आणि वस्तुस्थितिविरुद्ध आहे. आदर्शाच विपरीत असणे आणि आदर्शापासून च्युत होणे या दोन भिन्न बाबी आहेत.

५. पृष्ठ ११० वर ‘ भक्तीचे डोळे ज्ञान ’ असे ज्ञानदेवांचे अवतरण दिले आहे; ते ‘ कर्माचे डोळे ज्ञान ’ ( ज्ञा. ९.३४६ ) असे हवे.

६. शेवटच्याच लेखात वारकरी संप्रदायाचा ‘ अन्य धर्मपंथांशी अनुबंध ’ स्पष्ट करताना, “ वेगवेगळ्या धर्मपंथांतील मतप्रवाह विठ्ठलभक्तीच्या महानदीत एकवटल्यामुळे वारकरी संप्रदायाला सर्वधर्मसमन्वयवादाचे स्वरूप आरंभापासून लाभले, हा प्रा. रेळेकरांनी लावलेला अन्वयार्थ महत्त्वपूर्ण आहे. ” असे म्हटले आहे ( पृष्ठ ११० ) हा अन्वयार्थ लेखकाचा संदर्भविषय बनलेल्या प्रा. रेळेकरांच्या लेखापूर्वी अनेकदा सांगितला गेलेला आहे, हे डॉ. इनामदारांनाही परिचित आहे. परंतु सहज हाताशी असलेला संदर्भ वापरताना त्यांचे संदर्भ देण्यातले नेमकेपण ढिलावले आहे.

अर्थात हे दोष नोंदवताना मला याचे पुरेपूर भान आहे, की अशा अनवधानजन्य वा सापेक्षपहीन चुकांचा आढळ माझ्याही लेखनात होऊ शकेल.

नऊ निबंधांतून व्यक्त झालेले भक्तिपंथाचे हे नवचिंतन काहीसे नवे आहे, स्वायत्त

आहे, असे जरी डॉ. इनामदार यांनी या संकलनाच्या निवेदनात म्हटले असले, तरी प्रत्यक्ष हे लेख लिहिण्याच्या वेळी नवतेचा वा स्वायत्ततेचा दावा त्यांच्या मनात नव्हता ( नसावा ) असे वाटते. भक्तिपंथाचे आकर्षण असणारा केवळ भाविकच नव्हे, तर नवशिक्षित चिकित्सक वर्गही महाराष्ट्रात मोठा आहे. या वर्गाला भक्तिपंथाच्या नवचिंतनाची ओढ आहे; त्यांच्या मनात भक्तिपंथाच्या उद्गम-विकासासंबंधी, स्वरूपासंबंधी अनेकानेक प्रश्न आहेत. या वर्गाच्या प्रतिनिधित्वाने भक्तिपंथाच्या नवचिंतनासंबंधी काही अपेक्षा येथे संक्षेपाने व्यक्त केल्या, तर ते अनुचित ठरू नये—

( १ ) भक्तिपंथाचा उदय ही अकल्पित घटना नव्हे. आधुनिक लोकभाषांच्या माध्यमातून भक्तिपंथ अभिव्यक्त व्हायला लागण्यापूर्वीपासून शैव-वैष्णवादी धारा नुसत्या अस्तित्वातच नव्हत्या, तर काही शतकांपर्यंत प्रभावीही होत्या. सर्व पुराणांतून या धारांचे समृद्ध दर्शन घडते. तर मग या पूर्वोत्तर कालखंडातील भक्तिपंथाच्या स्वरूपात अंतर कोणते होते? लोकजीवनाशी असलेल्या त्यांच्या संबंधाचे तौलनिक स्वरूप कोणते ?

( २ ) ज्ञानदेवांच्या भक्तिपंथात सर्व जातिजमातींचे संत समाविष्ट आहेत. खुद्द ज्ञानदेवांना आणि त्यांच्या भक्तिपंथाला विरोध करणारा वर्ग कोणता ? विरोधाची कारणे कोणती ? या कारणांचा उदय कोणत्या गंडातून घडलेला आहे ?

( ३ ) ज्ञानदेवादी संतांच्या भक्तिपंथाचा भर अंतःशुद्धीवर आणि सदाचारावर आहे. त्यांनी गुरुसंस्थेची असाधारण प्रतिष्ठा का मानावी ? भक्तिपंथातील गुरुगौरवाचे गूढ कसे उकलता येईल ?

( ४ ) द्विजांना स्वाध्यायासाठी 'ब्रह्मसूत्र', तर इतरांना 'स्तोत्र कां नाममंत्र' असे ज्ञानदेवांनी म्हटले आहे. भक्तिपंथात गुरुसंस्थेइतकेच महिमान पावलेल्या नाममंत्राचा मूळ स्रोत कोणता ? 'नामवेद' कोणत्या परिस्थितीत, कोणत्या लोकधारणेत जन्म पावला ?

( ५ ) गुरुमहिमा आणि नाममहिमा हे भक्तिपंथाचे दोन अत्यंत महत्त्वाचे विशेष आजच्या विज्ञाननिष्ठांना कमालीचे असमर्थनीय वाटतात; मानवी विकासाला हानिकारक वाटतात. भक्तिपंथाच्या कार्याचे वस्तुनिष्ठ ऐतिहासिक मूल्यमापन करणारे अभ्यासक या दोन विशेषांची काही विधायकता स्पष्ट करू शकतील काय ?

( ६ ) गुरुगौरवाच्याच संदर्भात विचार करायचा झाला, तर प्रत्यक्ष ज्ञानदेवी गुरुगौरवाने पूर्णतः भारलेली आहे–रंगलेली आहे. ज्ञानदेवीच्या प्रज्ञेचा माणूस गुरूला एवढे महत्त्व का देतो ? एवढेच नव्हे, तर गुरुदीक्षाहीन नामदेवांना ज्ञानेश्वरमंडळ 'कच्चा' का ठरवते ? आजचे काही अभ्यासक मानतात त्याप्रमाणे हा जातिगंडातून उद्भवलेला दुःस्वास आहे–मत्सर आहे, की गुरुदीक्षेच्या असाधारण महत्त्वाचे आणखी काही वेगळे सामाजिक कारण आहे ? सर्वच पारमार्थिक 'निगुरा' हा अप्रतिष्ठित मानतात, ते का ?

( ७ ) भेदांची उतरंड रचणाऱ्या 'पावित्र्य' संकल्पनेवर वर्णव्यवस्था आणि पर्यायाने जातिव्यवस्था उभी राहिली, असे प्रा. बेडेकरांसारखे ऋजू प्रकृतीचे ज्ञानसाधक व समाज-

हितचिंतक म्हणतात आणि भक्तिपंथही याच 'पावित्र्य' संकल्पनेचा पाठीराखा असल्यामुळे तोही या उतरंडीचा संरक्षक आहे, असे मत व्यक्त करतात. जातिभेदांना जन्म देणारी आणि त्यांना राखणारी 'पावित्र्य' संकल्पना संतांनी जशीच्या तशी स्वीकारली काय ? की त्यांनी त्या भेदजनक पावित्र्य संकल्पनेत परिवर्तन घडविले ? परिवर्तन घडविले असल्यास त्या परिवर्तनाची प्रेरणा कोणती ? त्याच्या यशापयशाच्या मर्यादा कोणत्या ?

( ८ ) भक्तिपंथाचे ( भागवतधर्माचे ) परमाराध्य दैवत जे विठ्ठल, त्याला संतांनी माऊली का म्हणावे ? अनेक मातृरूपिणी दैवते महाराष्ट्रात असताना एका पुरुषदेवाला 'माऊली' म्हणण्याचे कारण काय ?

या अपेक्षामूलक प्रश्नांची मालिका अशीच कितीही लांबविता येईल. डॉ. इनामदार यांच्या पुस्तकाच्या निमित्ताने काही प्रश्न मनात डोकावले, ते मोकळेपणाने मांडले. ते ज्ञानतपस्येने आणि उच्च पातळीवरील अध्यापन-अनुभवाने ज्येष्ठ आहेत; म्हणून भक्तिपंथाच्या नवचिंतनाविषयीच्या अपेक्षा त्यांच्यापुढे व्यक्त करण्यात संकोच वाटला नाही, कारण 'परिप्रश्न' हे ज्ञानाचे महाद्वार आहे.

**'भक्तिपंथ : नवचिंतन'**

लेखक : डॉ. हेमंत वि. इनामदार
प्रकाशक : श्री. मोरोपंत फडके, फडके बुकसेलर्स, महाद्वार मार्ग, कोल्हापूर–२.
प्रथमावृत्ती, नोव्हेंबर १९७७, पृष्ठे डेमी ११२, मूल्य आठ रुपये.

## परिषदेचे नवे आजीव सभासद

( परगावचे )

सौ. सुलभा वि. पुरंदरे ( मुंबई ), सौ. दीपा गोवारीकर ( मुंबई ),
डॉ. उषा मा. देशमुख ( मुंबई ), श्री. दि. प. दांडेकर ( मुंबई ),
श्री. सुधीर फडके ( मुंबई ),
श्री. मु. खं. वाघ ( खटाव ), प्रा. तारा भवाळकर ( सांगली ),
डॉ. नि. धों. मिरजकर ( सांगली ), श्री. अ. प्र. गाडगीळ ( कोल्हापूर ),
श्री. वा. आ. पाटील ( कोल्हापूर ), डॉ. सु. गो. गोखाककर ( कोल्हापूर ),
प्राचार्य बळवंत देशमुख ( गडहिंग्लज ), प्रा. ब. सो. सोळंगी (अहमदनगर),
डॉ. मदनमोहन तिवारी ( धुळे ), डॉ. गणेश चौधरी ( जळगाव ),
श्री. श. के. साठे ( ठाणे ), डॉ. कमलाबाई साने ( रत्नागिरी ),
डॉ. श. ग. घाटे ( रत्नागिरी ),
सौ. शशिकला काकोडकर ( गोवा), श्री. महेश जोशी ( नागपूर ),
डॉ. दा. वि. नेने ( बडोदे ), श्री. द. पं. जोशी ( हैद्राबाद ),

अनुक्रमणिका

# ८

# 'श्रीकेक्षी' ची आत्मकथा

## ग्रंथसमीक्षक : राजेंद्र वनहट्टी

---

'तसबीर आणि तकदीर' या पाचशे पृष्ठांच्या भरघोस आणि प्रदीर्घ आत्मचरित्रात प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी 'संपूर्ण आयुष्यातील अनुभवधन महाराष्ट्रीय वाचकांच्या स्वाधीन' केले आहे. 'हे अनुभवधन' वाङ्मयात मान्यता मिळविलेल्या पण मूलतः मराठीच्या एका प्राध्यापकाच्या जीवनातील आहे. त्यामुळे या 'अनुभवधना'तील अनुभवांची विविधता, स्वरूप आणि आवाका अपरिहार्यपणे सीमित झालेला आहे. प्राध्यापक या नात्याने क्षीरसागरांचे शिक्षणसंस्थेतील अनुभव, त्यांच्या साहित्यिक जीवनातील प्रसंग आणि खासगी आयुष्यातील घटना एवढ्यापुरताच त्यांच्या अनुभवांचा विस्तार बाह्यतः मर्यादित आहे. शिक्षणसंस्थेतील 'क्षुद्र कुरबुरीं'चे त्यांनी वारंवार चित्रण केलेले आहे. विशेषतः या आत्मकथेच्या उत्तरार्धात व्याख्यान-दौऱ्यांच्या व सभासंमेलनांच्या तपशीलवार वर्णनाने ग्रंथाचा बराच भाग व्यापला आहे. पण अशा घटनांना अनुभव म्हणावे की, प्राध्यापकाच्या आणि साहित्यिकाच्या जीवनातील नित्यकर्माच्या ( रूटीन ) स्वरूपाचा भाग म्हणावे, असा प्रश्न उपस्थित होतो. शिक्षणसंस्थेतील प्रासंगिक घटना आणि किरकोळ सभासंमेलनातील भाषणांची वर्णने सरसकट दिल्याने या आत्मकथेत वेचकतेचा अभाव तर जाणवतोच, पण त्याचबरोबर तिचा पसारा वाढून कथनात शिथिलता येते. वास्तविक क्षीरसागरांच्या जीवनात मुळातच गतिमान आणि परिवर्तनशील घटनांची कमतरता आहे.

प्राध्यापक म्हणून एका शिक्षणसंस्थेत रुजू झाल्यावर त्यांनी सतत चौतीस वर्षे तेथेच अध्यापन केले. त्यामुळे सामान्यतः प्राध्यापकाच्या बैठ्या पेशात जी स्थितिप्रियता असते ती त्यांच्या जीवनात आढळून आली तर त्यात नवल नाही. परंतु क्षीरसागरांच्या जीवनात ही स्थितिप्रियता इतकी पराकोटीला पोचली आहे की, कुठल्याही परिवर्तनाला विरोध हाच त्यांच्या जीवनाचा मंत्र झालेला दिसून येतो. त्यांच्या वैयक्तिक जीवनातील वादळी घटना म्हणजे त्यांनी केलेले दोन विवाह. पूर्वायुष्यात घटस्फोटित स्त्रीशी त्यांनी पहिला विवाह केला, तर दुसरा विवाह स्वतःच्या उतारवयात त्यांनी एका प्रौढ तरुणीशी केला. हे दोन्ही विवाह काहीशा विरोधी वातावरणात पार पडले. सामाजिक कुतूहलाचे आणि

टीकेचेही विषय झाले. काहीशा लोकविलक्षण अशा या दोन घटनांनीदेखील क्षीरसागरांच्या जीवनाला कुठलीच कलाटणी मिळालेली नाही. या विवाहांना होणारा सामाजिक विरोध त्यांनी फारसा जुमानला नाही. परंतु विवाहामुळे जीवनात होणाऱ्या बदलाचे स्वागत करण्यास मात्र ते कमालीचे अनुत्सुक होते. साधी राहण्याची जुनी जागा सोडून नवीन जागेत जाण्यातदेखील त्यांनी विशेष उत्साह दाखविला नाही. एकदा जी जीवनपद्धती निश्चित झाली ती क्षीरसागरांनी फारशी कधी बदलली नाही. या अतिरेकी स्थितिप्रियतेचे आणि त्यातून उद्भवलेल्या त्यांच्या धोपटमार्गी, सावध व काहीशा एकारलेल्या जीवनक्रमाचे एक कारण त्यांच्या शारीरिक दुर्बलतेत आहे, असे आढळते.

क्षीरसागरांनी आपल्या रुग्णाईत प्रकृतीला ' जन्माची वैरीण ' म्हटले आहे. ते म्हणतात, ' मी विचारात आक्रमक होतो तितका कृतीत नव्हतो. माझ्या मानसिक आक्रमकतेला व धडपडीला माझ्या अल्प शरीरबळाचे कुंपण पडले होते. माझ्या मनाइतके माझे शरीर बलवान असते तर माझे जीवन वेगळेच झाले असते. " शारीरिक अस्वस्थतेचे एक कुंपण असले तर स्थितिप्रियतेचे त्याहून मोठे एक दुसरे कुंपण होते. त्यातून निर्माण झालेल्या आत्मकेंद्रित व परंपरावादी वृत्तीचे तिसरे एक कुंपण होते आणि ही सर्व कुंपणे शाबूत राखण्यासाठी पत्करलेल्या निर्धोक, सरधोपट, मवाळ प्राध्यापकी पेशाचे चौथे एक कुंपण होते. या सर्व कुंपणांमध्ये बंदिस्त झालेले जीवन उंचावत गेले, पण विस्तारले नाही. त्यात वैचित्र्य आले नाही. विविधतेला ते पारखे झाले. लौकिक अर्थाने क्षीरसागरांच्या जीवनक्रमाला एक ठरीव, संथ, एकसुरी लय प्राप्त झाली.

वास्तविक अशा बाह्यतः सरळसूत, धीम्या व काहीशा रखडणाऱ्या ( Plodding ) जीवनाची ही लांबलचक कथा बहुतांशी नीरस आणि रटाळ होणे अपरिहार्य होते. पण ती तशी झालेली नाही. याचे मुख्य कारण म्हणजे या आत्मकथेत घडणारे क्षीरसागरांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनोखे दर्शन. या काहीशा जगावेगळ्या व्यक्तिमत्त्वाच्या क्षीरसागरांच्या बालपणापासून तर चरित्रग्रंथाच्या अखेरीपर्यंत झालेल्या, विकसनशील प्रवासाचे सम्यक चित्र येथे उमटलेले आहे. या चित्रात क्षीरसागरांच्या व्यक्तिमत्त्वातील अंतर्विरोधाच्या छटा प्रकट झालेल्या आहेत. " लहानपणापासून मी थोडा स्वप्नाळू बनलो. बोलका व बुद्धिमान गणला जात असूनही प्रत्यक्ष व्यवहारात थोडा कच्चा व परावलंबीच राहिलो. " " निग्रहपूर्वक उद्योग करणे हे मुळातच माझ्यात नव्हते. या आनुवंशिक आळसातच पुढे ' टाळाटाळ ' व ' पलायनवाद ' यांची भर पडली. " " अनिश्चय व चालढकल हा माझा स्वभावच बनलेला होता. " " माझा दोष अकारण आत्मसंशय हा होता. " रूढ आणि स्थितिप्रिय जीवनपद्धतीशी सुसंगत असणारा अशा प्रकारचा 'अतिविचारी संशयात्मा ' या आत्मकथेत ठायी ठायी डोकावताना आढळतो. पण त्याचबरोबर शिक्षणसंस्थेतील आजीव सेवकाचा भरसभेत निषेध करणारे, डांग्यांच्या भाषणाला जाहीर समारंभात अटकाव करणारे, सावरकरांच्या भाषाशुद्धीच्या चळवळीला उघड आणि कडवा विरोध करणारे,

अश्लीलताविरोधी खटल्यात कोर्टात निर्भीड साक्ष देणारे, सातारच्या संमेलनात विपर्यांतराबद्दल अत्र्यांना व्यासपीठावर ठामपणे खडसावणारे असे 'संशयात्म्या'शी विसंगत असलेले धारदार, निश्चयी आणि प्रसंगावधानी क्षीरसागरही या ग्रंथात प्रकट झालेले आहेत.

—पण क्षीरसागरांच्या व्यक्तिमत्त्वाच्या या काहीशा उठावदार विरोधी पैलूपेक्षाही अधिक लक्षणीय असा त्यांच्या व्यक्तित्वाचा एक विशेष या आत्मकथेत सातत्याने सर्वत्र वर्णिलेला आढळतो. तो म्हणजे त्यांची रोमँटिक किंवा सौंदर्यवादी वृत्ती. आपल्या रोमँटिक आणि स्वप्नाळू वृत्तीचे गोजिरवाणे उल्लेख या ग्रंथात त्यांनी परोपरीने आणि वारंवार केलेले आहेत. त्यावरून रोमँटिक किंवा सौंदर्यवादी वृत्ती हे क्षीरसागरांच्या व्यक्तिमत्त्वाचे व्यवच्छेदक वैशिष्ट्य आहे, अशी समजूत होण्याची शक्यता आहे. वास्तविक त्यांना अभिप्रेत असलेल्या सौंदर्यवादाची व्याख्या या ग्रंथात तरी त्यांनी कुठे दिलेली नाही. ही उणीव खटकणारीही आहे. पण आपल्या सौंदर्यवादी वृत्तीचे विश्लेषण त्यांनी अनेक ठिकाणी केलेले आहे. त्यावरून वादात त्यांना केवळ सौंदर्यनिर्मिती किंवा सौंदर्यपूजन अभिप्रेत नाही, तर सौंदर्याचे रक्षण हे त्यांनी आपले जीवितकर्तव्य मानले आहे. "वाचन, स्वप्नरंजन आणि निर्भेळ आळस" यातच ते आनंद मानत असले तरी 'रोमँटिक जीवांना कमलभक्षणाखेरीज दुसरीही एक बाजू असते,' हे त्यांनी स्पष्ट केले आहे. त्यांच्या मते 'खऱ्या आणि पुऱ्या सौंदर्यवाद्यांना एक प्रकारची सामाजिक कर्तव्याची जाणीव असते.' हे कर्तव्य कोणते ? तर स्वप्नरंजनातून जागे होऊन सौंदर्यावर आणि औचित्यावर होणाऱ्या आक्रमणाचा लगोलग वीमोड करणे आणि 'प्रयोग आणि प्रगती' यांच्या नावाखाली चालू असलेले कुरूपतेचे पूजन उद्ध्वस्त करणे. आपल्या सौंदर्यवादी वृत्तीचे विश्लेषण करताना क्षीरसागरांनी सौंदर्याची स्वतःची कल्पना गृहितसत्य मानली आहे, तसेच 'प्रयोग आणि प्रगती' म्हणजे कुरूपतेचा प्रादुर्भाव ही समजूत उराशी घट्ट बाळगली आहे. त्यामुळे त्यांचा सौंदर्यवाद हा निखळ सौंदर्यवाद नसून सौंदर्यवादाचे कातडे पांघरलेला प्रच्छन्न परंपरावाद किंवा 'कॉन्झर्वेटिझम' आहे काय असा प्रश्न निर्माण होतो. वास्तविक परंपरावादी म्हणविण्यात क्षीरसागरांना संकोच वाटत नाही. 'सामाजिक व राजकीय बाबतीत मी कॉन्झर्वेटिव्ह वृत्तीचा होतो" हे त्यांनी मान्यच केले आहे. पण हा कॉन्झर्वेटिझम् तरी निर्भेळ आहे काय ? कारण क्षीरसागरांची कॉन्झर्वेटिव्ह वृत्ती एकीकडे सुधारणावादाला जाऊन भिडणारी आहे, असे आढळून येते. लोकहितवादींवरील लेखात त्यांनी परंपरावादी चिपळूणकरांच्या विरुद्ध लोकहितवादींची तरफदारी केलेली आहे. क्षीरसागरांचा हा 'पहिला टीकालेख' होता; आणि तेव्हापासून 'महाराष्ट्रीयांचे कित्येक रूढ समज दुरुस्त करण्याचे काम आपण केले पाहिजे,' असे त्यांना वाटू लागले. म्हणजे एकीकडे 'प्रयोग आणि प्रगती' यांना विरोध आणि दुसरीकडे समाजात पसरलेले रूढ समज दुरुस्त करून त्या संदर्भात नवमतांचा पुरस्कार या दोन परस्परविसंगत टोकापर्यंत क्षीरसागरांच्या सौंदर्यवादाचे कातडे ताणले गेलेले आहे.

वास्तविक क्षीरसागरांच्या मते सुधारणावादी आणि सौंदर्यवादी यांचे गोत्र जमत नाही. माधवराव पटवर्धन यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विश्लेषण करताना क्षीरसागरांनी सुधारक आणि रोमँटिक अशा व्यक्तिमत्त्वाच्या दोन जाती कल्पिल्या आहेत. " रोमँटिक मनुष्य सुधारकही असू शकेल, पण सुधारक मात्र रोमँटिक क्वचितच असू शकेल. कारण तो तार्किकतेची झापड बांधून सरळ रेषेत समाजाचे कोडे सोडवू पाहत असतो. तर रोमँटिक भावनाशक्ती व कल्पनाशक्ती यांच्यावर भिस्त टेवून जीवनाचा खोल अनुभव घेत असतो," असा ' जातिभेद ' क्षीरसागरांनी स्पष्ट केलेला आहे. वास्तविक, असे ढोबळ भेद मानल्यामुळे व्यक्तिमत्त्वाची गुंतागुंत सुटू शकेल काय ? केवळ सौंदर्यपूजक किंवा स्त्रीपूजक असला म्हणजे तो फक्त रोमँटिक आणि स्त्रियांच्या उद्धाराची भूमिका घेणारा केवळ सुधारक हे फार संकुचित आणि वरवरचे वर्गीकरण झाले. माणसाच्या व्यक्तिमत्त्वाचे कोडे अशा प्रकारचे बटबटीत लेबलिंग करून किंवा शिक्के मारून सुटण्याइतके सोपे नाही. खुद्द क्षीरसागरांच्या व्यक्तिमत्त्वात एकीकडे सुधारणेची ऊर्मी आहे, तर दुसरीकडे आहे तेच कायम राखण्याची धडपडही आहे. आपले जीवन व आपले व्यक्तिमत्त्व स्वप्नाळू आणि रोमँटिक आहे, अशी आळवणी त्यांनी या आत्मचरित्रात अनेकदा केलेली आढळते. पण क्षीरसागरांचे डोके आभाळात असले तरी पाय घट्ट जमिनीवर रोवलेले आहेत, असे बहुतेक प्रसंगी दिसून येते.

क्षीरसागरांच्या आयुष्यातील दोन काहीशा जगावेगळ्या घटना म्हणजे त्यांनी केलेले दोन विवाह. हे विवाह करण्यात त्यांनी एक प्रकारचे मनोधैर्य आणि साहस दाखविले, यात वाद नाही. पण या संदर्भात दोन गोष्टी लक्षात घेण्यासारख्या आहेत. एक म्हणजे दोन्ही वेळा वधूपक्षाकडील घरच्या मंडळींचा विरोध बराचसा मावळल्यावर त्यांनी हे साहस केले. आणि दुसरी गोष्ट म्हणजे हे साहस करण्यापूर्वी त्यांनी इतका साधकबाधक आणि तौलनिक विचार केल्याचे दिसून येते की, त्यामुळे प्रत्यक्ष साहसातला सर्व ' रोमान्स ' किंवा अद्भुत आकर्षण अखेरीला, वाचकांच्या दृष्टीने तरी, नामशेष झालेले आहे. केवळ विवाहाचाच निर्णय घेताना नव्हे, तर जीवनातील लहानसहान गोष्टींची विल्हेवाट लावतानादेखील, त्यांनी उलटसुलट, बरावाईट तर्कशुद्ध विचार करूनच सावध पावले उचलली आहेत. किंबहुना रोमँटिक वृत्तीपेक्षा तारतम्य आणि सारासारविवेक यांचेच प्राबल्य क्षीरसागरांच्या व्यक्तिमत्त्वात अधिक आहे, असे ही आत्मकथा वाचताना कित्येकदा जाणवते.

अन्यांनी बहाल केलेले ' समीक्षक 'चे संपादकत्व स्वीकारण्याचा मोह त्यांनी कटाक्षाने आवरला. तसेच मंत्री आणि पटवर्धन यांच्या सहकार्याने 'सारथी' साप्ताहिक काढताना आर्थिक जबाबदारी घेण्याचे त्यांनी शिताफीने टाळले. अशा अनेक घटना त्यांच्या सावध आणि विलक्षण व्यवहारी वृत्तीवर नेमका प्रकाश टाकतात. " फुलाचा विचार मनात आला की त्याबरोबर काव्यांचाही विचार मनात येणे हा माझा स्वभावच बनला होता. किंबहुना फुलापेक्षाही काव्यांचाच विचार माझे मन अधिक व्यापून टाकी ! " अशी जाणीव

क्षीरसागरांनी व्यक्त केली आहे. पण क्षीरसागरांच्या वृत्तीत केवळ असा जागरूक व्यवहार नाही. यवतमाळचे वकील पाटणकर यांनी म्हटल्याप्रमाणे त्यांच्याजवळ ' जन्मजात लॉजिक ' आहे. सुधारकाचे वर्णन करताना त्यांनीच म्हटल्याप्रमाणे ' तार्किकतेची झापड ' लावून क्षीरसागर आपल्या जीवनातील प्रत्येक घटना व प्रसंग निरखीत आहेत आणि आपल्या जीवनाचे व व्यक्तिमत्त्वाचे कोडे ' सरळ रेषेत सोडवू पाहत आहेत, ' असे कित्येदा वाटते.

पण केवळ तार्किकतेपाशीच त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची ही मजल थांबत नाही. शिक्षण-संस्थेतील आजीव सदस्याने कायदेशीर नोटीस देताच क्षीरसागरांचे कायदेशीर मन जागृत होते. " मी स्वप्नाळू आणि साहित्यिक असलो तरी एके काळी एलूएल्. बी. होऊन वकिली करण्याचा माझा विचार होता. हे विसरता येत नाही. " असे स्मरण ते वाचकांना देतात. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष असताना त्यांनी दिलेल्या एका निर्णयावरून कायदेशीर प्रकरण उद्‌भवले. तेव्हा दत्तो वामन पोतदार त्यांना म्हणाले, " ज्याला लीगल माइण्ड नाही, त्याला या गोष्टी अवघड जातात. पण तुमची गोष्ट तशी नाही. यू हॅव अ लीगल माइण्ड. " पोतदारांची ही शिफारस या ग्रंथात दोनदा उद्धृत केलेली आहे. ' जन्मजात लॉजिक् ' आणि ' लीगल माइण्ड ' असलेल्या, साधकबाधक तार्किक विचार करून निर्णय घेणाऱ्या क्षीरसागरांची प्रत्यक्ष जीवनात, प्रत्येक प्रसंगी दिसून येणारी सावध व्यवहारी वृत्ती आणि ( ते जिची विरुद्धे मिरवितात ती ) स्वप्नाळू रोमँटिक वृत्ती यांची सांगड कशी घालायची ? की त्यांचा सौंदर्यवाद किंवा रोमँटिसिझम हे केवळ एक थोतांड आहे ?

या अंतर्विरोधाचे एक कारण असे असू शकते की, क्षीरसागरांची सौंदयवादी वृत्ती ही त्यांची जीवनव्यापी प्रेरणा नसावी. निदान या आत्मकथेत तरी असे आढळते की, स्त्रीपुरुष-संबंध, प्रेमभावना, स्त्रीसंपर्क आणि तत्सम विषय यांवरील क्षीरसागरांच्या विचारांशी त्यांचा सौंदर्यवाद किंवा रोमँटिसिझम् प्रामुख्याने निगडित आहे. रूढ स्त्रीपुरुषसंबंधापेक्षा काही वेगळ्या संबंधांची किंवा नेहमीच्या शिष्टसंमत वैद्धिक आणि शारीरिक स्त्रीसहवासाच्या कल्पनेपेक्षा काही अनोख्या अनुभवाची आसक्ती त्यांच्या रोमँटिक वृत्तीत आढळून येते. माधवराव पटवर्धन यांच्या प्रेमभावनेला ' मॉर्बिड ' म्हणणाऱ्या विठ्ठलराव घाट्यांची क्षीरसागरांनी सडकून हजेरी घेतली आहे. पण अखेरीला, सौंदर्यवादी किंवा रोमँटिक माधवराव स्त्रीप्रेमाच्या बाबतीत ' मॉर्बिड नव्हते तरी थोडेफार अपवादभूत वा अब्नॉर्मल होते ' या निष्कर्षाप्रत क्षीरसागर पोचले आहेत. कारण माधवरावांच्या आणि स्वतःच्या वृत्तीत त्यांना फरक करायचा आहे.

स्वतःचे ' वस्तुनिष्ठ विश्लेषण ' करताना क्षीरसागर म्हणतात, " मी सौंदर्यवादी अथवा रोमँटिक वृत्तीचा होतो; पण ॲब्नॉर्मल मात्र नव्हतो. " माधवरावांच्या आणि स्वतःच्या सौंदर्यवादी वृत्तीत असा फरक कल्पिल्यानंतर स्त्रीसंपर्काचा आपल्यावर होणारा परिणाम " स्थूल पातळीवर न होता सूक्ष्म व उच्च पातळीवर होत असे, " असा दावा क्षीरसागर करतात. ही ' सूक्ष्म व उच्च पातळी ' कोणती, हे स्पष्ट न करता ते या परिणामाचे स्वरूप

विशद करतात. " स्त्रीसंपर्काने माझ्या मानसिक शक्तींना फक्त ' स्टिम्युलेशन '–उत्तेजन मिळत असे. म्हणजे मी संयमीही नव्हतो व असंयमीही नव्हतो. माझ्या मनाचे दार घट्ट बंदही नव्हते की ढिले आणि नादुरुस्तही नव्हते. ते उघडे आणि सौंदर्याच्या संपर्काला सहज तयार असे. " याचा अर्थ स्त्रीसंपर्काच्या बाबतीत माधवराव ' अॅब्नॉर्मल ' होते, तर क्षीरसागर ' नॉर्मल ' होते, असा घ्यावयाचा काय ? त्यांना मिळणारे मानसिक ' स्टिम्यु-लेशन ' सामान्य संसारी पुरुषांना स्त्रीसहवासात मिळू शकत नाही काय ? रूढ पद्धतीने संसार करणाऱ्या साहित्यिकांच्या व कवींच्या जीवनातून पत्नीच्या सहवासात मानसिक ' स्टिम्युलेशन ' मिळाल्याची अनेक उदाहरणे दाखविता येतील.

पण मुख्य प्रश्न असा निर्माण होतो की, क्षीरसागरांवर होणारा स्त्रीसंपर्काचा परिणाम ही फक्त रोमॅंटिक व्यक्तीच्या बाबतीत घडणारी काही जगावेगळी प्रतिक्रिया आहे, की सर्वसामान्य, सहृदय, संवेदनाक्षम आणि सुबुद्ध पुरुषाच्या संदर्भातही ही प्रतिक्रिया घडू शकते ? आणि ही जर ' नॉर्मल ' पुरुषाच्या बाबतीत घडणारी ' नॉर्मल ' प्रतिक्रिया असेल तर तिचे वर्णन करण्यासाठी सौंदर्यवादी व रोमॅंटिक वृत्तीचा बुरखा कशाला हवा ? या प्रश्नांची उत्तरे बाजूला ठेवली तरी एक गोष्ट स्पष्ट दिसते. ती म्हणजे क्षीरसागरांनी माधव-रावांच्या रोमॅंटिक वृत्तीपासून आपली रोमॅंटिक वृत्ती अलग मानली आहे; आणि तसे करताना कुठलीही अतिरेकी टोकाची भूमिका न पत्करता स्त्रीसहवासाच्या स्वत:वरील प्रभा-वाचा सावध व समतोल उलगडा करून तारतम्य साधले आहे.

क्षीरसागरांच्या सावचित्त तारतम्यबुद्धीचे त्यांच्याच जीवनातील उत्कृष्ट उदाहरण म्हणजे स्वतःच्या रुग्णाईत प्रकृतीचा त्यांनी केलेला नेटका सांभाळ. त्यांच्या आजारपणाचे आणि प्रकृतीबद्दलच्या तक्रारींचे उल्लेख या ग्रंथात सर्वत्र विखुरलेले आहेत. विशेषतः ते कुठल्याही सभासंमेलनाला निघाले किंवा त्यांना काही लेखनकार्य करायचे असले तर प्रकृतीचा उल्लेख अटळपणे आलेला आहे. पण त्यांची प्रकृती ' ट्रेचरस ' असली तरी तिने त्यांना कधी दगा दिल्याचे आढळत नाही. कारण नियमित पथ्यपाणी करून आणि आहारविहारावर सक्त नियंत्रण ठेवून त्यांनी प्रकृती सतत काबूत ठेवली आहे. प्रकृतीला जपण्याच्या निमित्ताने त्यांच्या जीवनात कुठल्याही शारीरिक व मानसिक अतिरेकाला अपरिहार्यपणे मज्जाव निर्माण झाला. आयुष्यभर शिस्त आणि संयम पाळावा लागून दीर्घायुष्याचे वरदान त्यांना मिळाले, असे निदान या आत्मकथेवरून करता येईल.

क्षीरसागरांच्या दीर्घायुष्याच्या या दीर्घकथेत, त्यांच्या प्रारंभीच्या निवेदनातील एका विधानाची प्रचीती देणारा काही भाग आला आहे. ' आत्मचरित्राच्या काही भागास कादं-बरीचे रूप येणे शक्य असते, ' असे त्यांनी सुरुवातीच्या निवेदनात म्हटले आहे. माधवराव पटवर्धन यांचा अकाल मृत्यू आणि क्षीरसागरांच्या प्रथम पत्नी मीराबाई यांचे आकस्मिक निधन हे या आत्मकथेतील दोन्ही प्रसंग कादंबरीच्या प्रकरणांसारखे हृद्य आणि प्रभावी वठलेले आहेत. या दोन्ही प्रसंगांतील क्षीरसागरांच्या शोकार्त आणि संभ्रमित अवस्थेचे

प्रत्ययकारी चित्रण या आत्मचरित्रात आढळते. क्षीरसागरांच्या जीवनात मधूनमधून डोके वर काढणारा निराशावाद या आघातांमुळे उफाळून आल्याचे दिसते. दोन्ही वेळा जीवनाचे वैयर्थ्य पटून त्यांनी निविड निराशेचे उद्‌गार काढलेले आहेत; 'Nothing avails not even virtue.'

या आत्मचरित्राचा आणखी एक रम्य विशेष म्हणजे क्षीरसागरांच्या जीवनाला स्पर्श करणाऱ्या काही जणांची व्यक्तिचित्रे माधवराव पटवर्धन आणि मीराबाई यांच्याखेरीज शीलवती केतकर, आहिताग्नी राजवाडे, न्यायरत्न विनोद यांची, तसेच चितळे, चिपळूणचे साने व जोशी हे डॉक्टरद्वय, शिर्के, महाबळेश्वरकर, माणगावकर, नलावडे या मित्रमंडळींची जिव्हाळ्याची आणि जिवंत व्यक्तिचित्रे या आत्मकथेत उमटलेली आहेत.

ही सारी व्यक्तिचित्रे केवळ वर्णनपर नाहीत, तर विश्लेषण हा त्यांचा गाभा आहे. किंबहुना या संपूर्ण आत्मचरित्रातच वर्णनापेक्षा आणि कथनापेक्षा विश्लेषणाला अधिक प्राधान्य आहे. त्या दृष्टीने हे आत्मचरित्र म्हणजे एक प्रदीर्घ आत्मविश्लेपण आहे, असे म्हणता येईल. व्यक्ती, घटना किंवा प्रसंग यांचे वस्तुनिष्ठ वर्णन किंवा केवळ कथन या आत्मचरित्रात नाही. व्यक्ती, घटना व प्रसंग यांच्या संबंधातील स्वतःची भूमिका आणि स्वतःच्या व्यक्तिमत्त्वावर झालेला त्यांचा परिणाम यांचे सुश्लिष्ट आणि सढळ विश्लेपण क्षीरसागरांनी ठिकठिकाणी केलेले आहे. या आत्मविश्लेपणातून क्षीरसागरांचे व्यक्तिमत्त्व सलगपणे उलगडत जाते, त्या व्यक्तिमत्त्वाचे कंगोरे स्पष्ट होत जातात. पण आश्चर्य असे की एवढ्या पसाऱ्यातूनही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दलचे कुतूहल पूर्णपणे शमत नाही; उलट ते वाढते. ही आत्मकथा क्षीरसागरांच्या व्यक्तिमत्त्वाचे कोडे पूर्णपणे सोडवत नाही. उलट त्यासंबंधी नवे प्रश्न निर्माण करते. या आत्मचरित्राचे हेच बलस्थान आहे; आणि दुबल स्थानही तेच!

## तसवीर आणि तकदीर

लेखक : प्रा. श्री. के. क्षीरसागर

पॉप्युलर प्रकाशन, ३५ सी, ताडदेव रोड, मुंबई–३४,
पहिली आवृत्ती, ऑक्टोबर १९७६,
पृष्ठे डेमी ५२६ + १६, मूल्य चाळीस रुपये.

१

# वाबगावकरांचे संशोधन-फलित

## ग्रंथसमीक्षक : कृ. ज्ञा. भिंगारकर

प्रा. म. शं. वाबगावकर यांची 'संशोधन व आस्वादन' व 'संशोधन व समीक्षा' अशी दोन पुस्तके आज माझ्या टेबलावर अभिप्रायासाठी आलेली आहेत. दोन्ही पुस्तकांच्या शीर्षकांखाली कंसात लिहिले आहे : 'संशोधनात्मक व टीकात्मक लेखांचा संग्रह.' मी दोन्ही पुस्तके वाचली. पुस्तकांतील लेखांवरून लेखकाच्या व्यासंगाची व विद्वत्तेची साक्ष पटते. संतवाङ्मय, इतिहास, ज्ञानेश्वर, विठ्ठल, वारकरी पंथ, महानुभाव संप्रदाय इत्यादी विषय तर त्यात आलेच आहेत, पण 'कुंजविहारींची कविता', 'अनिलांची श्रावण झड—एक रसग्रहण', 'शंकर रामाणींच्या आभाळवाटा' यांसारखे आधुनिक विषयही त्यात आले आहेत. लेखकाच्या व्यासंगाचे क्षेत्र असे व्यापक आहे.

प्रा. वाबगावकरांच्या संशोधनाचा दुसरा एक विशेष दिसून येतो की ते कधीही पुराव्याशिवाय बोलत नाहीत. 'नामूलं लिख्यते किञ्चित् नानपेक्षितमुच्यते' अशी जणू त्यांची प्रतिज्ञाच आहे. अर्पणपत्रिकेतही (संशोधन व आस्वादन) त्यांनी स्पष्ट केले आहे :

> "नात्र प्रमाणरहितं केवलं बुद्धिकल्पितम्
> इत्येषा वाङ्मयी पूजा कृता श्रीगुरुतुष्टये।"

'विठ्ठलपंतांच्या गुरूचा शोध' (संशोधन व समीक्षा) या लेखात त्यांनी अनेकांच्या मतांचा परामर्श घेतला आहे. त्याच लेखात त्यांनी आपला तर्क मांडला आहे की, विठ्ठलपंतांचे गुरू श्रीपाद व पीठापूरला जन्मलेले दत्तावतार श्रीपाद श्रीवल्लभ हे दोन्ही एकच तर नसतील ? ही गोष्ट पुराव्यानिशी सिद्ध झाली तर अनेक प्रश्नांची उकल होईल. श्रीपाद श्रीवल्लभांच्या चरित्रात विठ्ठलपंतांचा उल्लेख येतो काय, तेही पाहावे लागेल. 'ज्ञानेश्वर आणि रामदेवराव यादव' (संशोधन व समीक्षा) या लेखातही डॉ. अ. ना. देशपांड्यांच्या शंकेला समर्पक उत्तर दिले. ज्ञानेश्वरी लिहिली जात असताना काशी ही रामदेवरावाच्या ताब्यात होती. हिंदूंची मुक्तिपुरी मुक्त करणारा रामदेवराव ज्ञानेश्वरांच्या गौरवाला पात्र व्हावा हे स्वाभाविकच आहे.

अनुक्रमणिका

संशोधनात्मक लेख लिहिताना लेखकाने पूर्वसूरींच्या सर्व मतांचा परामर्श घेतला आहे. ' मूळ ज्ञानदेवीचा शोध ' ( संशोधन व आस्वादन ) या लेखात एकनाथांना मूळ ज्ञानेश्वरी मिळाली होती की नाही, याची चर्चा करताना ज्ञानेश्वरी संशोधनाच्या इतिहासाचाही लेखकाने संक्षेपी आढावा घेतला आहे, पण ज्ञानेश्वरीची मूळ प्रत शोधण्याचा त्यांचा मार्ग सर्वांनाच पसंत पडेल असा नाही. ते म्हणतात की, गुलाबराव महाराज स्वतःला ज्ञानेश्वरकन्या म्हणवत असत. ज्ञानेश्वरांनी त्यांना प्रत्यक्ष अनुग्रह दिला होता. भावावेशात ज्ञानेश्वरीचे निरूपण करताना त्यांनी पहिल्या अध्यायातील तिसरी ओवी वेगळी म्हटली. ती ओवी कोणत्याच प्रतीत आढळत नाही. ती ओवी ज्या प्रतीत आढळेल ती मूळ प्रत असावी. ' ज्ञानेश्वर : समग्र अध्ययन ' ( संशोधन व आस्वादन ) हा लेखही अभ्यासपूर्ण आहे. त्या लेखात लेखकाने गीता व संबोधिनी अशी दोन पदे मानली आहेत, पण माझ्या मते ते एकच पद आहे. पैठणला असताना ' गीतासंबोधिनी ' नावाची शैवागमी गीताटीका ज्ञानेश्वरांजवळ होती व तिच्या आधारे ते निरूपण करीत. यावरून ज्ञानेश्वरांवर काश्मिरी शैवागमाचा प्रभाव दिसून येतो. ज्ञानेश्वर नाथपंथी असल्याने गीता संबोधिनी टीका जवळ असणे अशक्य नाही. ' वारकरी संप्रदाय : एक अभ्यास ' व ' महानुभाव संप्रदाय : एक अभ्यास ' (संशोधन व आस्वादन) हे दोन लेख विद्वत्तापूर्ण आहेत. ' मराठी आत्मचरित्र–स्वातंत्र्यपूर्व काल ' ( संशोधन व आस्वादन ) या लेखात लेखकाच्या मते ' लीळाचरित्र ' हे मराठीतील पहिले आत्मचरित्र आहे. त्यामुळे संत नामदेव हे मराठीतील आद्य आत्मचरित्रकार होते हे डॉ. तुळपुळ्यांचे मत मान्य करणे काहीसे कठीण आहे. ( संशोधन व आस्वादन पृ. ७८ ) हे लेखकाचे मत संशोधकांना प्रेरणा देणारे आहे.

टीकात्मक व आस्वादनपर लेखातसुद्धा लेखकाचा व्यासंग दिसून येतो. ' मोरोपंत : एक अध्ययन ' ( संशोधन व आस्वादन ) या लेखात मोरोपंतांवरील आक्षेपांचे अभ्यासपूर्ण खण्डन केले आहे. रसग्रहण करताना लेखकाची समतोल बुद्धी दिसून येते. ' शिवायन ' महाकाव्याचे ( संशोधन व आस्वादन ) रसग्रहण करताना लेखकाने महाकाव्याच्या गुणांबरोबर दोषही दाखविले आहेत. त्या दृष्टीने ' शिवायन महाकाव्य ' रसग्रहणाचा एक आदर्श वस्तुपाठच ठरावा. ' कुंजविहारींची कविता ' ( संशोधन व समीक्षा ) या लेखात मराठीतील उपेक्षित कवी कुंजविहारी यांच्या काव्यगुणांचे रसग्रहण केले आहे व त्यांच्या कवितेवर असणारा इतर कवींचा प्रभावही स्पष्ट केला आहे.

अशा रीतीने प्र. म. शं. वावगावकरांची दोन्ही पुस्तके म्हणजे त्यांच्या व्यासंगाचा व चिंतनाचा परिपाकच आहेत. त्याचा उपयोग इतर अभ्यासकांना व संशोधकांना निश्चितच होईल. शेवटी एकच गोष्ट सुचवावीशी वाटते की, संशोधनात्मक लेखांचा वेगळा व आस्वादक लेखांचा वेगळा, असे दोन स्वतंत्र संग्रह केले असते तर ते औचित्यपूर्ण ठरले असते.

( १ ) संशोधन व समीक्षा : ले. मधुकर शंकर वावगावकर, प्र. भा. ल. कुलकर्णी, साहित्य प्रसार केन्द्र, सीतावर्डी, नागपूर १२.
पृष्ठे ८४ + ८० प्रकाशन वर्ष १९७७. मूल्य बारा रुपये.

( २ ) संशोधन व आस्वादन : ले. मधुकर शंकर वावगावकर, प्र. भा. ल. कुलकर्णी, साहित्य प्रसार केन्द्र, सीतावर्डी, नागपूर १२.
पृष्ठ संख्या ११२, प्रकाशनकाल १९७७, मूल्य दहा रुपये.

## साभार-स्वीकार

कोलारकर राम संपा. : सर्वोत्कृष्ट मराठी कथा खं. १०; सौ. छाया कोलारकर, पिंपरी, पुणे १८; रु. २२·५०

भगत रा. तु. संपा. : हा गंध शब्दफुलांचा : वी. वी. पाटील, कोल्हापूर; रु. १५/.

श्री संतकल्याण सेवक महाराज : धर्माचार; श्रीकल्याण सेवक प्रकाशन मंदिर, संकेश्वर, बेळगाव; रु. ५/.

थत्ते सुरेश हरी : सृजन; अपर्णा प्रकाशन, मुंबई; रु. ८/.

आठलेकर हरिहर : छान छान गोष्टी; अनंत प्रकाशन, पुणे १; रु. १/.

कसबे रावसाहेब : स्रोत; जवाहर कोटेचा, जनबोध प्रकाशन, चिंचवड गाव, पुणे ३३ रु. ५/.

जोशी श्री. ज. : पुणेरी; श्री. दा. दि. कुलकर्णी, श्रीविद्याप्रकाशन, पुणे ३०; रु. १५/.

भांड बाबा : जरंगा; बाबा भांड, बन्सीलालनगर, औरंगाबाद; रु. १०/.

खरात शंकरराव : दलित वाङ्मय-प्रेरणा आणि प्रवृत्ती; इनामदार बंधु-प्रकाशन, पुणे ३०, रु. १७/

तळेगावकर प्रफुल्लबुवा रंगनाथबुवा (प्रकाशक) : श्रीअमृतरायांची पदे : भाग पहिला; श्रीअमृतराय मठ, नाथ गल्ली, पैठण, जिल्हा औरंगाबाद, (चरित्रपर प्रस्तावना . प्रा. भास्कर दोडे, पुणे) ० = ५०.

# १०

## श्रीगोळवलकर गुरुजींची जीवनगाथा

**ग्रंथसमीक्षक : दा. सी. देसाई**

---

मध्यभागी शांतपणे तेवणारी एक भगवी ज्योत. तिच्याभोवती मंडलाकार विविधरंगी उजळती तेजोवलये. त्यांच्या दीप्तीने दूर कोपऱ्यात रेटले गेलेले काळोखाचे वेडेवाकडे पळपुटे अस्तित्व. श्री. ह. वि. दात्ये यांनी लिहिलेल्या ' तेजाची आरती 'च्या मुखपृष्ठावरचे हे सौम्य, सात्त्विक प्रतिकात्मक चित्रच सांगून जाते की, या मुखपृष्ठाच्या मागे मलपृष्ठाच्या मर्यादेपर्यंत सुमारे तीनशे पृष्ठांत कोणा एका लेखकाने एक मंगल तेजस्विता कहाणीच्या रूपाने शब्दबद्ध करण्याचा प्रयत्न केलेला आहे. अनेक अपसमजांची काजळी, लोकक्षोभ, कारस्थानी राजकारण्यांनी जाणूनबुजून उठविलेली वादळे, शासनाच्या अवकृपेच्या वावटळी इत्यादी आपत्तींना तोंड देत स्थिरपणे आणि संथपणे प्रकाशदानाचेच व्रतपालन करणाऱ्या एका समर्पित जीवनाचे मंगल दर्शन आतील पानापानांमधून उलगडत जाणार याची कल्पना या मुखपृष्ठावरूनच येते. वाचक जेव्हा मुखपृष्ठ बाजूला करून प्रत्यक्ष ग्रंथाची पाने वरवर चाळतो, तेव्हा त्याला जाणवते साधेपणातील सौंदर्य : मोहक मांडणी, सुबक छपाई आणि दृष्टी तोषविणारा व मन आकर्षून घेणारा रेखीवपणा.

' कोणा एका लेखकाने ' असा उल्लेख मी मुद्दामच केला. कारण श्री. हरि विनायक दात्ये हे मराठी साहित्यातील कोणी नामजादे चरित्रकर्ते लेखक नव्हेत. संगीत क्षेत्रातील त्यांच्या ' गायनी कळा ' या एका लेखनकृतीने महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट वाङ्मयाचा पुरस्कार सहजरीत्या संपादन केलेला असला, तरी या एकमेव वाङ्मय निर्मितीने नामवंत सिद्धहस्त साहित्यिकांच्या पंक्तीमध्ये त्यांना कोणी बसवणार नाही. पण अंतःकरणाने अतिशय भाविक निष्ठावंत अनुयायी सेवाभावी स्वयंसेवक. आणीबाणीच्या काळात अनुशासनाच्या नावाखाली आसुरी दुःशासनाने अनेक थोर व्यक्तींचे आणि संघटनांचे सरकारी प्रचारयंत्रणा राबवून चारित्र्यहनन केले. त्या भंजनाच्या धबडग्यात श्री. दात्ये यांचे दैवत असलेला राष्ट्रीय स्वयंसेवक संघ आणि त्याचे भूतपूर्व सरसंघचालक श्रीगुरुजी यांना छिन्नभिन्न करून टाकण्याचा प्रयत्न झाला. त्यामुळे त्यांचे भावनाशील अंतःकरण गलबलून गेले असल्यास नवल नाही. ही अभ्रे दूर सारण्यासाठी सत्यदर्शनाचा आपल्या परीने प्रयत्न करावा, म्हणून त्यांनी लेखणी उचलली आणि ' तेजाची आरती 'चे लेखन पूर्ण केले. आणीबाणी होती तोपर्यंत

त्याची हस्तलिखिते कारागृहात व कारागृहाबाहेर अनेकांच्या हातून फिरली. कारण छापील स्वरूपात त्यांना दिवसाचा प्रकाश दिसणे त्या काळात दुरापास्त होते. आणीबाणी सरून देशाला दुसरे स्वातंत्र्य लाभल्यावर ही ' आरती ' ग्रंथरूपाने अवतरली.

' तेजाची आरती ' या शीर्षकाखाली एक खुलासेवजा उपशीर्षक आहे–॥ ' श्री गुरुजी : एक दर्शन ॥ ' ! याचा अर्थ एवढाच की ' तेजाची आरती ' कोणी केवळ चरित्रग्रंथ म्हणून वाचू नये. ग्रंथारंभी स्वतःचे मनोगत सादर करताना लेखकानेच म्हटले आहे, " माझ्या प्रस्तुत लेखनाला कोणी चरित्रग्रंथाची कसवटी लावण्याचा प्रयत्न केला तर त्यात वावगे काहीच नाही. पण तो कस माझ्या मते काहीसा अस्थानी ठरेल... ही ' आरती ' चरित्राच्या अंगाने विकसित झालेली असली तरी ती ' आरती ' आहे, ते एक ' दर्शन ' आहे, ते निव्वळ निखळ चरित्र नव्हे. श्रीगुरुजींच्या नेतृत्वावर संपूर्ण विश्वास ठेवणाऱ्या एका अनुयायाला निष्ठावंत स्वयंसेवकाला, श्रीगुरुजी जसे दिसले, जसे जाणवले, त्याचे हे दर्शन आहे. ( ' दर्शन ' हा तत्त्वज्ञानातील अर्थाने केलेला शब्दप्रयोग नव्हे ! ). एकाच व्यक्तीला घडलेले हे दर्शन असल्यामुळे ते एकांगी, एकसुरी आणि त्यामुळे पारंपरिक चरित्रप्रकारापेक्षा वेगळे होणे शक्य आहे. ' आरती ' किंवा ' दर्शन ' या भूमिकेमुळे चरित्राला पडलेली ही मर्यादा ध्यानात घेतली की, त्याचे मूल्यांकन आपोआपच वेगळेपणाने करणे भाग पडते.

मात्र याच ग्रंथाचा शेवट करताना ( कदाचित अनवधानाने असेल ! ) लेखक लिहितात– " असे आहे हे गुरुजींचे चरित्र ! त्याचे वर्णन कोठवर करणार ? त्यात अनेक आकृत्या आहेत, अनेक रंग आहेत, अनेक नाद आहेत, रस आहेत नि गंधही आहेत. त्याला कित्येक पैलू आहेत. त्यांतले मला जे जे दिसले ते ते मी यथामति या ' आरती 'त उजळले आहेत. तिने तुमचे आमचे–सर्वांचे जीवन उजळून निघो हीच अपेक्षा. तथास्तु ! ' ' आरती'ची घडण आणि त्यामागचे उद्देश या अखेरच्या विधानांवरून स्पष्ट होतात. त्यावरून चरित्रापेक्षाही ' आरती ' म्हणूनच या ग्रंथाची आलोचना करणे सयुक्तिक ठरेल.

श्रीगुरुजी म्हणजे कै. माधव सदाशिव गोळवलकर, रा. स्व. संघाचे द्वितीय सरसंघचालक. चारित्र्याचे संस्कार विविध दैनंदिन कार्यक्रमांतून आपल्या स्वयंसेवकांवर करून एका विधायक मार्गाने आपले राष्ट्र समर्थ करण्याचा प्रयत्न करणाऱ्या रा. स्व. संघासारख्या संघटनेला एक राष्ट्रीय विद्यापीठ मानायला हरकत नसावी. म्हणून तर संघातले अधिकारी शिक्षक गणशिक्षक, मुख्य शिक्षक इ. नावाने ओळखले जातात. संघाचे आद्यसरसंघचालक ( डॉ. हेडगेवार ) होते; आणि आजचे सरसंघचालक श्री. बाळासाहेब देवरस आहेत. कै. गोळवलकर हे बनारस हिंदू विद्यापीठात एम्. एस्सी. परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर अध्यापनाचे कार्य करीत म्हणून ते 'गुरुजी ' झाले. त्यानंतर एलएल. बी. ची परीक्षाही ते उत्तीर्ण झाले. पण ते 'वकील 'ही पाटी लावण्यापुरतेच झाले होते; अखेरच्या श्वासापर्यंत ते ' गुरुजी'च– ' मार्गदर्शक ' च राहिले.

अर्थात ' तेजाची आरती ' हे त्यांचे चरित्र असले तरी ते निव्वळ त्यांचे चरित्र नव्हे. आपल्या कार्याशी एकरूप, एकात्म होण्यामुळे ज्या व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व त्याच्या स्वीकृत कार्यापेक्षा वेगळे उरतच नाही, अशा एका अलौकिक अपवादात्मक व्यक्तीत श्रीगुरुजींची गणना करायला हवी. म्हणून श्री. गुरुजींच्या चरित्रावरोबरच मांडला जातो रा. स्व. संघ या संघटनेचा इतिहास. श्री. दात्ये यांनाही हे चरित्र मांडताना आरती अभिप्रेत आहे " ती तेजाची; व्यक्तीची नव्हे ! मी पूजा बांधू इच्छितो ती गुणांची–चैतन्याची ! तीत मूर्तीला स्थान अवश्य आहे; पण भक्तीला आधार म्हणून सगुण भक्ती सोपी असते म्हणून; ती माझ्यासारख्या सामान्य जनांना जमते म्हणून. येथे कोण्या व्यक्तीचा मानसन्मान दिसला, तर तो तिच्याद्वारा दिव्यत्व प्रत्ययाला ते येते म्हणूनच दिसेल. अन्यथा मी या वाटेला गेलो नसतो. त्यामुळे मला असा विश्वास वाटतो, की या आरतीचे तबक जेथून जेथून फिरेल, तेथे तेथे प्रकाश आणि प्रसन्नता सुगंधित स्वरूपात दरवळत राहील. "

लेखकाची या लिखाणामागची ही प्रेरणा, हा हेतू ध्यानात घेतला की चरित्र या वाङ्मय-प्रकाराला लावायच्या बाकीच्या कसोट्या आपोआपच निरर्थक ठरतात. लेखकाने ' आरती ' साठी आवश्यक म्हणून ' घटनाक्रम किंवा कालक्रम यापेक्षा विषयांच्या सहज स्फुरित अनुक्रमाला ' झुकते माप टाकलेले आहे. मात्र तरीसुद्धा लेखनात शिथिलता राहू नये किंवा सत्याचा अपलाप होऊ नये, तसेच, विश्वसनीय पुराव्याविना एकही विधान केले जाऊ नये, यासाठी दक्षता घेतल्याची ग्वाही लेखकाने दिलेली आहे.

लेखकाची सावधगिरी याबाबतीत कितीही प्रशंसनीय असली तरी कोणत्याही वस्तुस्थिती-लाच एकापेक्षा अधिक बाजू असल्यामुळे चरित्रातील अनेक बाबी विवाद्य ठरतात. लेख-काला प्रामाणिकपणे एकच बाजू मांडायची असते. त्याला जी दिसते ती. इतर बाजू दिस-तात कारण ते अन्योन्य दृष्टिकोनातून बघत असत. म्हणूनच एकच पुरावा त्याच्या लावल्या जाणाऱ्या अन्वयार्थामुळे वेगवेगळे निष्कर्ष काढायला उपयोगी ठरतो. ही जाणीव असली की चरित्रलेखन विविध बाजू लक्षात घेऊन, पुराव्यांचा अधिक खोलवर अभ्यास करून का मांडावे लागते, याची कल्पना येते. 'आरती 'चा उद्देश असे चरित्राच्या धर्तीचे मूल्यां-कन करण्याचा नसल्यामुळे निरनिराळे वादविवाद त्यात स्वाभाविकरीत्या टाळलेले आहेत. व त्यात स्तोत्राची भाविकता, प्रसन्नता असली तरी एकसुरीपणा येणे सहजगत्या घडते.

संघीय परिवारात घटनांचे जे जसे अन्वयार्थ व विश्लेपण लावले जाईल ते तसे इतरांना समजू शकेलच असे नाही. राजकारणाच्या सोयीसाठी व पक्षीय स्वार्थासाठी म्हणून का होईना इतरेजन काही विपरीत रीतीने, विकृत स्वरूपात गोष्टी मांडणारच. उदाहरण द्यायचे तर डॉक्टरांच्या पाठी सरसंघचालक पदावर श्रीगुरुजींची नियुक्ती; देशाच्या विभाजनाच्या काळात, बेचाळीस सालच्या स्वातंत्र्य आंदोलनात संघाने स्वीकारलेली भूमिका, चातुर्व-र्ण्याच्या बाबतीत श्रीगुरुजींनी मांडलेल्या भूमिकेची विरोधकांनी केलेली विकृत व विपरीत मांडणी, भारतीय कौटुंबिक परंपरेशी सुसंगत असा अर्थ न लावता एकचालकानुवर्तित्वाला

फॅसिझमशी, 'हुकुमशाहीशी' समानार्थी मानून करण्यात येणारी टीका, 'हिंदू' शब्दाचा संघाला अभिप्रेत असणारा व्यापक अर्थ जाणूनबुजून समजून न घेता, स्वतःला जाणवणाऱ्या हिंदुत्वाच्या कल्पनेने संघावर केले जाणारे आरोप वगैरे अनेक प्रश्न वादविवादाचे मोहोळ उठवू शकतात आणि यात बराचसा जाणूनबुजून केलेला गडबडगोंधळ असल्यामुळे, त्याचे निष्कर्ष आधीच पूर्वरचित असल्यामुळे, कोणी कितीही प्रामाणिकपणे त्याचे निरसन करण्याचा प्रयत्न करूनही काही उपयोग होत नसतो, हे ध्यानात ठेवले की 'सत्याचा अपलाप' व 'विश्वसनीय पुराव्याविना विधान नाही' वगैरे दावा करण्यात फारसे स्वारस्य उरत नाही. श्रीगुरुजींची याबाबतीतील बाजू वादविवादाच्या गर्दीत न घुसता लेखकाने व्यवस्थितपणे मांडलेली आहे, ही या ग्रंथाची जमेची बाजू. त्याचप्रमाणे खोल पाण्यात जाण्याचा, किंवा असा एखादा भोवरा तोडण्याचा साहसी प्रयत्न त्याने टाळला आहे, ही त्याची मर्यादाही ध्यानात घेणे न्यायाचे ठरेल.

श्रीगुरुजींच्या चरित्राची मांडणी हा तसा लेखकांना एक आव्हानाचाच विषय आहे. भारताच्या खंडप्राय देशात कधीही न साधलेली एक देशव्यापी, राष्ट्रीय चारित्र्य निर्मितीच्या विधायक कार्याला वाहिलेली संघटना उभारणे हे एक अभूतपूर्व कार्य आपले जीवनव्रत म्हणून स्वीकारलेल्या, स्वीकृत कार्याव्यतिरिक्त वेगळे व्यक्तिगत जीवन अजिबात न ठेवलेल्या व्यक्तीचे चरित्र मांडणे फारच कठीण. त्यातून श्रीगुरुजी प्रसिद्धिपराङ्मुख. छायाचित्रकाराला आपले छायाचित्र टिपता न यावे म्हणून चेहरा त्याकडे फिरवूही नये, जमले तर झाकावाच अशी वृत्ती असणाऱ्या या माणसाकडून त्याच्या वैयक्तिक जीवनासंबंधी काही माहिती मिळणे अशक्य. आपण कोणीतरी मोठे होणार या कल्पनेत दैनंदिनी लिहून ठेवावी, भावी इतिहासकारांना मदत व्हावी म्हणून पुरावा तयार करून ठेवावा, अशी जागरुकता आपल्यासारखी सामान्य माणसेही अलीकडे घ्यायला शिकली आहेत. पण अशी काही जाण नसणारे श्रीगुरुजी—ना आत्मचरित्र, ना दैनंदिनी, ना काही कोणाजवळ व्यक्तिगत जीवनासंबंधी बोलणेचालणे. अशा व्यक्तीला शब्दबद्ध करणे जवळजवळ अशक्यच. कै. ना. ह. पालकरांनी असा एक प्रयत्न कै. गुरुजींच्या पन्नासाव्या वाढदिवसाच्या निमित्ताने केला. त्यानंतर श्री. दात्ये यांचा हा असा 'आरती'चा प्रयत्न. तेव्हा असा हा आव्हानात्मक प्रयत्नही 'कौतुकास्पदच' म्हटला पाहिजे! आपल्या साध्यासुध्या, प्रासादिक भाषेत श्री. दात्ये यांनी केलेली ही 'तेजाची आरती' चरित्रग्रंथ म्हणून नव्हे तर कार्यरूप झालेल्या एका आदर्श अलौकिक जीवनाचे दर्शन म्हणून वाचनीय ठरते. 'आदर्श' विरळा, दुर्मिळ होत चाललेल्या अशा अंधकारमय काळात ही ज्योत स्फूर्तिदायी ठरो, प्रसिद्धिविन्मुख विधायक कार्याची ओढ लावणारी, उमलत्या पिढीला आकर्षून घेणारी ठरो, असेच कोणाही सामान्य वाचकाला वाटेल; कारण 'आरती'चा प्रकाश असे नवे प्रसन्न वातावरण निर्माण करण्यासाठीच उजळण्याचा प्रयत्न लेखकाने मनस्वीपणाने केलेला आहे.

तेजाची आरती ॥ श्रीगुरुजी : एक दर्शन ॥
लेखक : हरि विनायक दात्ये
हिंदुस्थान साहित्य, पुणे; मूल्य तीस रुपये.
पृष्ठे-२०+२६४+आर्ट प्लेट्स् २८.

## लता मंगेशकरांचे गाणे

पार्श्वगायिका म्हणून चित्रपटसंगीताच्या क्षेत्रात लताबाईंनी पाऊल टाकताच त्यांच्या अगदी आगळ्या अशा कंठमाधुर्याने आणि कोणत्याही प्रकारचे गाणे त्याला शोभेल अशा ढंगाने म्हणण्याच्या शैलीमुळे संगीतप्रेमी लोक तात्काळ त्यांच्याकडे आकृष्ट झाले. कानन, सुरैय्या, शमशाद बेगम, नूरजहान वगैरे अनेक गायिका त्यापूर्वी आपापल्या परीने लोकप्रिय होत्या. पण लताबाईंचा या क्षेत्रात उदय होईपर्यंत ते चांदण्यांनी भरलेले आकाश होते. त्यात चंद्रकोर उगवलेली नव्हती. 'महल', 'बरसात' वगैरे चित्रपटांतील लताबाईंची गीते ऐकणारांना कलेकलेने वाढणाऱ्या त्या चंद्रकोरीचे दर्शन झाले. लताबाईंच्या यशाचे 'She came, she sang and she conquered' असे वर्णन केले तर त्यात अतिशयोक्ती नाही. या क्षेत्रात पदार्पण केल्याबरोबर मिळालेल्या विजयाची परंपरा त्यांनी वर्षानुवर्षे अखंड चालवली आहे. चित्र असो, शिल्प असो, साहित्य असो वा संगीत असो; प्रत्येक कलेच्या अंतरंगी एक प्रकारचा दर्द असतो. जो कलाकार त्याचा सुंदर रीतीने आविष्कार करू शकतो तोच सामान्यापासून रसिकश्रेष्ठापर्यंत सर्वांची मने जिंकू शकतो. हा दर्द व्यक्त करण्याच्या कामी गोड गळ्याची देवाने दिलेली देणगी लताबाई अतिशय चतुरतेने वापरतात. लताबाईंची कला राजवाड्यांच्या भिंतींत किंवा कलावंतांच्या मैफलीत कोंडून पडलेली नाही. ही सर्वसामान्य मनुष्याच्या दृष्टीने भाग्याची गोष्ट आहे. त्यांच्या गाण्याचा गोडवा झोपडीपर्यंत पोहोचला आहे; कष्ट करून थकलेल्या जीवांना तो रिझवीत आहे. ही कला त्यांच्या दैनंदिन विरंगुळ्याचे एक साधन बनली आहे. हल्ली संध्याकाळी मी फिरायला जातो तेव्हा संध्यारंगांची पश्चिमेकडली कलाकुसर पाहुन मन आनंदून जाते. पण फिरून परत येताना ती कलाकुसर दिसत नाही. काळोखाने ती नाहीशी करून टाकलेली असते. मात्र त्या गमावलेल्या आनंदाची भरपाई करणाऱ्या दोन गोष्टी वाटेत मला हटकून भेटतात. रातराणीचा सुगंध आणि लताबाईंच्या कुठल्यातरी गाण्याचे गोड सूर. बंगल्यांतून, घरांतून, झोपड्यांतून नाचत नाचत बाहेर येणारे सूर! जनजीवनात असे अढळ स्थान मिळण्याचे भाग्य असामान्य कलावंताखेरीज दुसऱ्या कुणाला लाभू शकेल?

—वि. स. खांडेकर

अनुक्रमणिका

# ११

## ' आम्ही कुणीही नाही. '

**काव्यसमीक्षक : श्यामला थडानी**

---

या छोट्या कवितासंग्रहाचे कर्ते प्रा. रमेश पानसे हे अर्थशास्त्राचे प्राध्यापक असले, तरी हाडाचे कवी आहेत. ' ऋचा ' हे कवितेला वाहिलेले अ-नियतकालिक ते निष्ठेने चालवीत असतात. या त्यांच्या संग्रहात १९७२ ते ७७ या पाच वर्षांतल्या २६ कविता एकत्रित करण्यात आल्या आहेत. त्यांपैकी दोन दीर्घ व बाकीच्या छोटया आहेत. या साऱ्या कवितांचा सूर एकच आहे : ' आम्ही कुणीही नाही ! '

यातल्या बहुतांश कविता राजकारणासंबंधी असून त्यातल्या त्यात त्या आणीबाणीच्या काळात झालेली वंचना मुखर करतात. राजकीय नेते खुर्चीचा फायदा घेऊन सत्ता बळकट करतात. तोंडाने ' गरीबी हटाव 'चा मंत्र म्हणत सामान्य माणसाला दडपशाहीच्या वरवंटयाखाली नगण्य करून टाकतात. यामुळे कधी कवीचा अहंकार, उपहास–उपरोधाची फणा काढून आपली चीड व्यक्त करताना दिसतो, तर कधी ' हे असंच चालायचं ! ', ' आमची मनंच मुर्दाड झाली आहेत ', ' धावऱ्या मुंग्यांसारखो ! ' हे सत्यही कवीला जाणवले आहे व त्या वेळी त्याची हताश आणि अगतिक निःश्वसिते कविता-रूप घेऊन प्रगट होतात.

अगतिकतेबरोबरच या कवितेतील संतापाची तीव्रताही मन वेधून घेते. अगदी पहिल्याच कवितेत ' नेते हो ! ' या संबोधनासह आवाहन करून कवी नेत्यांपाशी ' जगण्याचीच ' मुळी परवानगी मागतो. ' लोकशाही बाळंतपणात बापाचे नाव लावत नाहीत ', हे दारुण सत्य कळून आल्यामुळे कवी म्हणतो, ' आम्ही मतं देऊन नेत्यांना जन्म दिला ही समज भ्रामक होती ! ' ही जाणीव व्हायलाही स्वातंत्र्याची पंचवीस वर्षे जावी लागली, तेव्हा कवी पुढे म्हणतो, ' पिळवणुकीचे दूध प्यालेल्या मुर्दाड मनाच्या नेत्यांच्या मनांवरून आमच्या दैन्याचं पाणी असंच वाहून जाणार आणखी सव्वाशे वर्षे ! ' कधी यातूनच विद्रोही भावना उफाळून येते, व ' अहो मी फॅसिस्ट 'सारखी कविता जन्माला येते. भावनांची कोंडी होत असताना मी कविता लिहितोय, म्हणून आपणांस पकडून मारझोड करण्याची कवी विनंती करतो. अशी ही तुच्छतेच्या राखेखाली धुमसत राहिलेली चिडीची ठिणगी !

पानसे यांची कविता बहुधा विधानरूप आहे. त्यामुळे कित्येकदा नारायण सुर्व्यांच्या कवितेची आठवण होते. अर्थात कवीचा साम्यवाद सुर्व्यांइतका पक्का मुरलेला नाही. पण 'म्हाताऱ्यांनी पेरलेल्या पापांचे पीक त्यांनी काढून न्यावे, भूमीलाही आता नव्या हातांचे दान हवे' अशी बंडखोरीची भाषा तो करतो. या काही विधानात्मक कवितांत वायवली प्रार्थनांची लय जाणवते. उदा० 'सूर्या, तू आम्हांला विचारून उगव–आम्ही तुलाच मतं देऊ';: 'माझ्या महान पितरांनो', ह्यांसारख्या याच लयीतल्या कविता कारुण्याकडे झुकताना दिसतात. आमच्याजवळ जपलेली मालमत्ता दारिद्र्य एवढीच आहे. म्हणून पितरांनी या देशात जन्माला येऊ नये; त्यांचे पिंडदान येथे होण्यासारखे नाही !

कवीला आयुष्यात जे 'चार क्षण' भेटले आहेत तेही घाईगर्दीच्या, वैफल्याच्या भावनेला किंचित विरजण मिळावे इतपतच. बाकीची सारी कविता वैफल्याची, निराशेची, आत्मक्लेशाचीच अभिव्यक्ती करताना दिसते. या अभिव्यक्तीला साजेसेच संग्रहाचे मुखपृष्ठ आहे.

[ रमेश पानसे : आम्ही कुणीही नाही, प्रकाशक : अरुंधती पानसे, ऋचा प्रकाशन, १९७७, ठाणे, मूल्य तीन रुपये. ]

## शपथ

शपथेला एका वेळी, एका संस्कृतीत अफाट महत्त्व होते आणि आता पाहावे तर 'शपथ' ही एक फालतू गोष्ट झाली आहे. याचे कारण काय ? शपथ म्हणजे तरी काय ? दानपत्राच्या शिलालेखाखाली गाढव व मनुष्याकृती दगडावर कोरलेली आढळते. तिला गद्धेगाळी म्हणत. आणि दानपत्रातील अटींचा भंग करणाराला त्या गद्धेगाळीत एक अश्लील शिवी हासडलेली असे, शपथ घातलेली असे. यातच शपथेचा मूळ अर्थ उगवतो. शपथ हा शाप असतो. अमुक करशील तर तमुक होईल, असा हा शाप असतो. शपथ आणि शाप यांच्यामध्ये असा अतूट संबंध आहे आणि या शब्दांवरूनच हे उघड आहे. दोन्ही शब्द 'शप्' या धातूपासूनच निघालेले शब्दबंधू आहेत. शाप, उःशाप, वर, शपथ, प्रतिज्ञा ही सारी एका कुळी-तली भावंडे आहेत. आपल्या महाभारत-रामायणादी महाकाव्यांतून आणि पुराणांतून या शाप-शपथांची रेलचेल आहे. जणू काही, माणसे अशा शाप उःशापाच्या विळख्यातच जगत होती !

—दि. के. बेडेकर

१२

# मराठी नियतकालिकांची सूची

## समीक्षक : प्रल्हाद नरहर जोशी

[ ' मराठी नियतकालिकांची सूची : १८००–१९५० ' या महान संदर्भ ग्रंथाच्या प्रथम खंडावर ( कालिक-वर्णन-कोश ) ' महाराष्ट्र साहित्य पत्रिके 'च्या एका अंकात डॉ. सु. रा. चुनेकर यांचे विस्तृत ग्रंथ-परीक्षण छापले आहे. १९७४ पासून प्रतिवर्षी एक याप्रमाणे दुसऱ्या खंडाचे ( कालिक लेख-लेखक-कोश ) चार भाग ( प्रत्येकी सुमारे ९०० पृष्ठे ) प्रसिद्ध झाले. या चार भागांत १५० वर्षांतील, विविध विषयांवरील, असंख्य विचार-प्रवर्तक लेखांची नोंद झालेली असल्याने प्रस्तुत ग्रंथ ज्ञानोपासकांच्या दृष्टीने सर्वसमावेशक व सर्वोपयुक्त असाच मानला जात आहे. आता समग्र ग्रंथ उपलब्ध झाल्याने अभ्यासकांची मोठीच सोय झाली यात संदेह नाही. येथे प्रा. डॉ. प्र. न. जोशी यांनी केलेले चौथ्या भागाचे चिकित्सापूर्ण समालोचन देत आहे. मध्यंतरी प्रकाशित झालेल्या तीन भागांवरील अभिप्राय ' पत्रिके 'त दिलेले नसले तरी डॉ. जोशी यांच्या प्रस्तुत लेखावरून संपूर्ण ग्रंथाचे सम्यक ज्ञान जिज्ञासूंना निश्चितच होईल असा विश्वास वाटतो.

—संपादक म. सा. पत्रिका

ज्ञानाच्या किंवा विद्येच्या निर्मितीची वा जोपासनेची हौस म्हणजे काय हे कोणास पाहावयाचे असल्यास ' मराठी नियतकालिकांची सूची ' [१८००–१९५०] द्वितीय खंड-चौथा भाग हा संदर्भग्रंथ नुकताच प्रसिद्ध झाला आहे तो नजरेखालून घालावा. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या पुणे येथील शं. ग. दाते सूचिमंडळासाठी शं. ग. दाते, दि. वि. काळे व शं. ना. बर्वे यांनी हे एक प्रचंड कार्य सन १९६५ सालीच सुरू केले. जिद्दीने वा चिकाटीने कष्ट करून वरवर रूक्ष वाटणाऱ्या या प्रचंड कामात विशेष रस घेतला तो दि. वि. काळे आणि शं. ना. बर्वे यांनी. गेल्या तेरा वर्षांत पहिला खंड व द्वितीय खंडाचे चार भाग प्रकाशित करून संपादकांनी आपल्या सचोटीचा व कार्यतत्परतेचा एक मोठा आदर्शच उभा केला आहे. अशा कार्यासाठी शासनाकडून अनुदाने मिळतात. सार्व-जनिक संस्थांकडून देणग्या मिळतात. पण अनुभव असा की, एक वेळ भरपूर पैसा राहील, पण ही असली कामे रेंगाळत राहतात. परंतु मराठी वाचकांचे व अभ्यासकांचे भाग्य असे की, सतत कार्यतत्पर राहून संपादकांनी गेल्या चार वर्षांत चार मोठे खंड ( प्रत्येक

खंड सुमारे ९५० पृष्ठांचा ) प्रसिद्ध करून संपादकीय कार्याच्या इतिहासात एक उच्चांकच प्रस्थापित केला आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती वाटू नये. असे हे मोठे अभिनंदनीय कार्य उभे करणाऱ्या संपादकांना प्रथमच धन्यवाद द्यावेसे वाटतात.

सुमारे दीडशे वर्षांची जुनी नियतकालिके शोधायची, मिळवायची, तपासायची, त्यांतील लेखांचे वाचन करायचे, त्यांचे विषयवार वर्गीकरण करायचे त्यांना ग्रंथालयाच्या शास्त्रानुसार क्रमांक देऊन त्यांची सूची अकारविल्हे करावयाची, तीत काटेकोरपणा यावा म्हणून पुनःपुन्हा तपासून पाहायची, मुद्रणप्रत करून प्रेसकडे द्यायची, मुद्रितात अशुद्धता न राहावी म्हणून डोळ्यांत तेल घालून जागरूक राहायचे, या सर्व कामांत आनंद मानून रस घेणाऱ्या संपादकांच्या उद्योगाचे दर्शन या चौथ्या भागातही घेण्यासारखे आहे. सन १९६९ साली प्रसिद्ध झालेल्या प्रथम खंडात पाक्षिकापासून वार्षिकापर्यंतच्या सुमारे १८०० मराठी नियतकालिकांचा जीवनेतिहास आलेला आहे. द्वितीय खंडाच्या पहिल्या भागात सन १९७४ साली धर्म, तत्त्वज्ञान, समाजकारण, राजकारण इत्यादी विषयांवरील लेखांची सूची प्रसिद्ध झाली आहे. दुसऱ्या भागात सन १९७५ साली अर्थशास्त्र, व्यापार, भौतिकशास्त्रे, सामाजिक शास्त्रे इत्यादी विषयांवरील लेखांचा समावेश आहे. सन १९७६ साली प्रसिद्ध झालेल्या तिसऱ्या भागात उद्योग, ललितकला, वाङ्मय इत्यादी विषय आले आहेत आणि आता सन १९७७ मध्ये प्रसिद्ध झालेल्या भागात व्यक्तिचरित्रे, घराण्यांचे इतिहास, प्राचीन व अर्वाचीन राष्ट्रांचे इतिहास इत्यादी विषयांचा अंतर्भाव आहे.

मानवी मनाच्या गाभाऱ्यात विविध विचारविकारांची गर्दी झालेली असते. त्याने केलेल्या लेखनास शास्त्रीय चौकटीत बसविणे अतिशय कठीण असते. एक चरित्र हा प्रकार म्हटला तरी त्यातही व्यक्तिचित्रे, आत्मचरित्रे, शब्दचित्रे, स्वभावचित्रे असे उपप्रकार होतात. इतिहास म्हटला की व्यक्तींचे इतिहास, घराण्याचे इतिहास, विविध देशांचे इतिहास, वंशवृक्ष, कालखंडात्मक इतिहास असे कितीतरी उपप्रकार होतात. त्या सर्वांचा समावेश शास्त्रीय दृष्टीने होण्यासाठी प्रत्येकाला वर्गांक देण्याची रीत येथे पत्करली आहे. ९२०.१ सामान्यचरित्रे, ९०२.३ आत्मचरित्रे, ९२९ वंशवृक्ष व कुलचिन्हविद्या, ९३१ प्राचीन चीन, ९४० युरोपचा इतिहास, ९५० आशियाचा इतिहास, ९५४.३ शिलालेख व ताम्रपट अशी विस्तृत विभागणी या भागात दिसते.

या ग्रंथाची उपयुक्तता पाहण्यासाठी आपण एकदोन उदाहरणे घेऊ. गेल्या दीडशे वर्षांत, म्हणजे १८०० ते १९५० पर्यंतच्या कालखंडात ' गोपाल कृष्ण गोखले ' यांच्यासंबंधी कोणत्या मराठी नियतकालिकात कोणते प्रमुख लेख कोणीकोणी लिहिले, याचा शोध घेण्यासाठी वर्णांच्या क्रमानुसार ' गोखले, गोपाळ कृष्ण ' ही नोंद पाहावयाची. बालबोध, ज्ञानांजन, प्रभात, विहार, लोकमित्र, मनोरंजन इत्यादी नियतकालिकांत आलेल्या गोखले यांच्यासंबंधीच्या लेखांची माहिती महिना व सन यांच्यासहित मिळेल. शिवाय अभ्यंकर ग. र., तुळपुळे गो. वि., देशपांडे वाग्भट नारायण, पटवर्धन वासुदेव बळवंत, परांजपे

रघुनाथ पुरुषोत्तम असे लेखक त्यांच्या आद्याक्षरानुक्रमाने भेटतील व त्यांनी गोव्याविषयी लिहिलेले लेख व त्यांच्यासंबंधी कोणत्या शीर्षकाचा लेख कोणत्या नियतकालिकात केव्हा लिहिला इत्यादींची ओळखही चारदोन मिनिटांत होईल. गोव्याच्या इतिहासाचा मागोवा घ्यावयाचा असेल तर ९५४०७९९ ची नोंद पाहायची. सत्संग, विविधज्ञानविस्तार, ज्ञानोदय, भारतमित्र इत्यादी नियतकालिकांतील गोमंतकाबद्दलच्या लेखांची सूची येथे मिळेल.

आपणास तुकडोजी महाराजांविषयी कोणी केव्हा लिहिले, हे पाहावयाचे असेल तर त-मधील नोंदी पाहावयाच्या. तुकडोजी महाराज [ ठाकुर मा. बं. ] अशी नोंद येथे दिसेल. याचा अर्थ असा की, ठाकुर माणिक बंडाजी हे यांचे नाव असून या नावाखाली पुढील नोंदी पाहावयाच्या. या प्रकारची नोंद पाहण्यात दुहेरी आनंद आहे. एक तर तुकडोजी महाराज यांच्याविषयीचा तपशील मिळतो, आणि अपरिचित असलेले त्यांचे संपूर्ण नाव कळते. सवाई गंधर्व हे कुंदगोळकर, कुमार गंधर्व हे कोमकलीमठ, उदयशंकर हे चौधरी, उमाजी नाईक हे खोमणे, गाडगेबुवा हे देवुजी सिंगराजी, अशी नवीन व कुतूहलजनक माहिती मिळाल्याने एक प्रकारचा आनंद वाचकांना हा संदर्भग्रंथ पाहताना होतो.

संपादनाच्या कौशल्याचे असे अनेक हृद्य नमुने या ठिकाणी पाहावयास मिळतील. मराठी नावे, विशेषनामेही विविध प्रकारांनी उच्चारली, लिहिली जातात. जोतीराव गोविंदराव, जोती गोविंद जो / ज्योतिराव, जोतीराव, जो / ज्योतिबा म्हणजे महात्मा फुले, कुल / कर्णी, अ / आजगावकर, अग्र / गरवाल असे प्रकारही पाहावे लागतात. गटे हा गोटे, ग्योऽटे, गोयूटे, गॅटे अशा विविध पद्धतींनी लिहिला गेलेला आढळल्यास त्यातून एका पद्धतीची निश्चिती करावी लागते. आडनावे, टोपणनामे, पर्यायी नावे यांचा विवेकपूर्वक शोध घ्यावा लागतो. चतर्जी—चट्टोपाध्याय, बॅनर्जी—बंदोपाध्याय अशी इंग्रजी—भारतीय भाषांची भेसळ असतेच. वणकुद्रे शांताराम की व्ही. शांताराम ? पालवणकर बाळू की पी. बाळू ? इत्यादींचा निवाडा करावा लागतो. कोशरचनेची स्थूल कल्पना वाचकांना देणेही महत्त्वाचे असते. नियतकालिकांच्या नावांचे संक्षेप, पारिभाषिक शब्दांची ओळख, वर्गीकरणी, संकेतचिन्हे इत्यादींचा निर्देश करणे अगत्याचे असते.

एवढा खटाटोप केल्यानंतरही छापून फॉर्म हाती आला की, संपादकीय करडी नजर त्यावरून फिरतेच. मग ' काही लक्ष्य न्यूनाधिके ' आठदहा पानांची यादी लागतात. पुनः येथे चुका राहू नयेत म्हणून दक्षता घ्यावी लागते. अशा अगदी बारीकसारीक कामानही कुचराई झाली तर पुढील अभ्यासकाची अडचण होईल, या जाणिवेने संपादकांनी याही भागात आपल्या पूर्वीच्या लौकिकास शोभून दिसेल असाच नेटका व साक्षेपी प्रयत्न केलेला दिसून येईल. काळे-बर्वे व त्यांचे सहायक वेलसरे-बोरगावकर यांनी ' मराठी नियतकालिकांची सूची ' या एका प्रचंड व उपयुक्त ग्रंथमालेचे संपादन निरलसतेने केलेले पाहून नव्या अभ्यासकांची नुसतीच सोय होईल असे नव्हे तर त्यांना असे उद्योग हाती घेण्यास

प्रेरणा मिळत राहील. आणि यातच संपादकांना सर्वांत मोठे असे समाधान मिळेल यात शंका नाही.

**‘ मराठी नियतकालिकांची सूची ’**

[ द्वितीय खंड, चौथा भाग : संपादक-शं. ग. दाते, दि. वि. काळे, शं. ना. वर्दे, प्रकाशक : मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई ४. पृष्ठे २८+२५८१ ते ३३९४, किंमत रुपये ७५/– ]

## इतिहासाचे उद्दिष्ट

विशिष्ट काल, विशिष्ट स्थल व विशिष्ट व्यक्तींचे विशिष्ट आचरण ह्या तीन घटकांचा संघात झाला असता प्रसंग ही वस्तू बनली जाते व अनेक प्रसंगांच्या व्यवस्थित संगतीपासून इतिहास म्हणून ज्या वस्तूस म्हणता येईल तिची निर्मिती होते. ही निर्मिती होत असता अनेक कालांशानी घटित जो कालाचा महाभाग ज्यास Epoch, Age, मन्वंतर वगैरे संज्ञा देतात त्यात कोणत्या विचाराचे प्राधान्य आहे हे सहज समुद्भूत होते. ह्या विचारापासूनच वर्तमान व भावी पिढ्यांना गत कालीन पिढ्यांच्या कर्मसंततीचे ज्ञान होते. कोणती कर्मसंतती घेऊन आपला समाज जन्माला आला आहे व कोणत्या दिशेचे आचरण ठेविले असता, वर्तमान व भावी समाजाचा कर्मलोप होऊन समाज आत्यंतिक सुखाचा वाटेकरी, कालांतराने का होईना, पण होईल हेही ह्या गतकालीन विचारापासून अंशत: कळू लागते. गतकालीन पिढ्यांच्या कर्मांचे जे ज्ञान–ज्यास युगमाहात्म्य–Spirit of the age—Esprit d 'epoc, वगैरे निरनिराळ्या भाषांतून समानार्थक संज्ञा आहेत, त्यासच इतिहासाचा आत्मा म्हणतात; किंवा इतिहासाचा आत्मा अशी औपचारिक भाषा योजण्यापेक्षा इतिहास हा व्यपदेश सामान्येकरून देतात. History is past politics and politics is present history हे भ्रामक सूत्र तोडून टाकले, म्हणजे इतिहासाचा विषय काय व प्रांत कोणता ते यथाशास्त्र कळण्याचा मार्ग खुला होतो आणि मानव समाजाचे अखिल चरित्र हा इतिहासाचा विषय व वर्तमान क्षणाच्या पाठीमागील सर्व गतकाल हा त्याचा प्रांत, अशी व्यापक दृष्टी स्वीकारावी लागते. राजकीय उलाढाली घ्यावयाच्या व सामाजिक सोडावयाच्या किंवा हजार वर्षांपलीकडील हकीकत द्यावयाची, व पाच वर्षांअलीकडील टाकायची असा संकुचित भेदभाव राहात नाही. तसेच वर्तमानकाळ क्षणमात्रावस्थायी असल्यामुळे वर्तमान इतिहास ह्या शब्दापासून काही एक बोध होत नाही. आणि भविष्यकाल अनागत असल्यामुळे हा शब्द वायफळ ठरतो. सारांश, मानवसमाजात गतकाली घडलेल्या उलाढालींची हकीकत देण्याचे काम इतिहासाचे आहे.

—वि. का. राजवाडे

अनुक्रमणिका

## १३

# मुद्रित-शोधनावरील एक सर्वंकष संदर्भ-ग्रंथ

### ग्रंथसमीक्षक : मुरलीधर शंकर देशपांडे

'मुद्रित-शोधन' हा श्री. य. ए. धायगुडे यांच्या संपन्न अनुभवातून सिद्ध झालेला उत्कृष्ट ग्रंथ आहे. लेखनकला अस्तित्वात आल्यावर शुद्धतेकडे लक्ष देण्याची जरुरी भासू लागली. छापखान्याच्या व्यवसायामुळे सामाजिक जीवनात क्रांती झाली. टाईप प्रिंटिंग, लिथोग्राफी, फोटोग्राफी, कोलोटाईप इत्यादी अनेक मुद्रण-प्रकार प्रचारात आले, व मुद्रित-शोधनकलेची निर्मिती झाली.

प्राचीन काळी सुवाच्य व शुद्ध लिहिण्याकडे, त्याचप्रमाणे सुंदर, वळणदार अक्षर येण्यासाठी अक्षर घटविण्याकडे सर्वजण लक्ष देत असत. वृत्तपत्राचे जग सुरू झाल्याने मुद्रण व्यवसाय झपाट्याने वाढला. शिक्षणाचा प्रसार अनेक अंगांनी वाढत राहिला. गुरुगृही न जाता विद्यालयात जाऊन विद्याग्रहण करण्याची सोय झाली. पाठांतर करण्याची प्रवृत्ती कमी झाली. प्राचीन विद्या मस्तकी होती ती आता पुस्तकी झाली. पुस्तके व वृत्तपत्रे अचूक, आकर्षक व शुद्ध स्वरूपात छापणे अगत्याचे होऊन बसले. तरीपण कामाच्या धवडग्यात अनेक चुका राहून जातात. या मुद्राराक्षसांना वाव न देण्यासाठी मुद्रित-शोधन आवश्यक असते. यासाठी जाणकार माणसे अनुभवाने तयार होतात. त्यांच्यामध्ये एक मेळ असावा लागतो, म्हणून योग्य असे मार्गदर्शन देणाऱ्या पुस्तकांची जरुरी भासणे साहजिकच आहे. ही उणीव रा. यशवंत एकनाथ धायगुडे यांच्या 'मुद्रित-शोधन' या पुस्तकाने निर्विवादपणे भरून काढली आहे.

या पुस्तकात सत्तावीस प्रकरणे आहेत; शिवाय चार परिशिष्टे आहेत. या परिशिष्टांत महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या शुद्धलेखन-मंडळाचे नियम (पृ. २७५), उपयुक्त कोष्टके (कागदांचे आकार व प्रकार, पॉइंट सिस्टिम, टाईप व गेज इत्यादी माहिती), रासायनिक मूलद्रव्यांची संक्षिप्त चिन्हे यांची माहिती, आणि गणित, भौतिकशास्त्र व मुद्रणविषयक आनुषंगिक चिन्हांची माहिती दिली आहे. शेवटी सूची, अभ्यासविषयक प्रश्न व संदर्भ-ग्रंथांची यादी दिली आहे.

मुद्रित-शोधन हा विषय तसा महत्त्वाचा आहे, पण त्याबद्दल एकत्रित व सविस्तर असे पुस्तक लिहिलेले नाही. पुस्तक विनचूक व आकर्षक निघावे अशी प्रत्येकाची इच्छा

असते, तरीपण आलेला मजकूर कंपोज केला व न तपासता म्हणजे त्यावर योग्य ते संस्कार होण्याच्या आधीच छापला तर मोठाच प्रसंग ओढवेल! पुस्तकाला शुद्धिपत्र शक्य तो नसावे, तथापि काही दोष राहिले असतील तर शुद्धिपत्राची आवश्यकता आहे.

शुद्ध मुद्रणाचे महत्त्व व मुद्रित-शोधनाचा इतिहास या पहिल्या दोन प्रकरणांत मुद्रणाचे प्रकार व मुद्रक-प्रकाशकांची जबाबदारी याची माहिती लेखकाने दिली आहे. वृत्तपत्राचे काम थोड्या वेळात उरकावे लागते, त्यामुळे शोधनाकडे तितकेसे लक्ष दिले जात नाही, अशी खंत लेखकाने व्यक्त केली आहे. मुंबईच्या 'टाइम्स ऑफ इंडिया' या इंग्रजी दैनिकाच्या अग्रलेखातील चुका दाखविणारास प्रशस्तिपत्र देण्यात येई. अशी दक्षता घेतल्याचा निर्वाळा (पृ. ४) लेखकाने दिला आहे. वृत्तपत्रे ही राष्ट्राची गरज आहे. त्यासाठी संपादकांनी (बिनचूक व सत्य माहिती देण्याकडे) जातीने लक्ष देणे अगत्याचे आहे (पृ. ३). लेखकाने मुद्रित शोधनाच्या इतिहासात लेखनकलेच्या आरंभी व नंतर, ऐतिहासिक काळी, मुद्रणशोधानंतर, ब्रिटन व अमेरिका येथील मुद्रित-शोधकांची माहिती दिली आहे (पृ. १० व ११).

या पुस्तकातील तीन व चार ही प्रकरणे फारच महत्त्वाची आहेत. या प्रकरणांत मुद्रित-शोधकाचे महत्त्व, त्याचे अनुभव व ज्ञान इत्यादी माहिती लेखकाने दिली आहे. मुद्रित-शोधन ही फार किचकट गोष्ट आहे. किंबहुना मुद्रित-शोधकाचे काम म्हणजे चुका कमीत कमी राहतील असा प्रयत्न करणे. निर्दोष काम होणे केवळ अशक्यप्रायच. (It is a process of eliminating mistakes.) यावरून या व्यवसायाच्या किचकटपणाची कल्पना येईल. मुद्रित-शोधकाला मनाची एकाग्रता, व्याकरणाचे व भाषेचे सखोल ज्ञान, मुद्रितातील भागाकडे पूर्ण लक्ष, उत्तम दृष्टी, बारीक व कावळ्यासारखी दोषशोधक नजर आणि जाणतेपणा हे गुण अत्यंत आवश्यक आहेत. त्याला नुसत्या मुद्रित-शोधनाच्या सांकेतिक खुणा माहीत असून भागत नाही, तर ज्या विषयाचे तो मुद्रित-शोधन करणार असेल तो विषय जाणण्याची कुवत, ज्ञान व अद्ययावत दृष्टी असली पाहिजे. (पृ. १६). महिलावर्ग या व्यवसायाकडे वळू लागला आहे, याबद्दल लेखकाने चांगले उद्गार काढले आहेत (पृ. १७ व ३१).

मुद्रित-शोधक तयार होणे हे अलबत्यागलबत्याचे काम नाही, त्यासाठी काही काल तपश्चर्या करावी लागते (पृ. १९). यासाठी लेखकाने मुद्रित-शोधकाला प्रत्यक्ष मुद्रणविषयक अनुभव, सामान्यज्ञान, संदर्भाचा उपयोग, शैक्षणिक योग्यता याबद्दलची साधार माहिती प्रकरण चारमध्ये दिली आहे. या संदर्भात कॉपी-होल्डरच्या कामाची माहिती पाचव्या प्रकरणात दिली आहे. प्रकरण सहामध्ये खुणांचे स्पष्टीकरण अंकवार दिले आहे. तेच अंक सोबतच्या तक्त्यात द्यावयास पाहिजे होते. अशा प्रकारचे आणखी तक्ते दिले असते तर पुस्तकाचे महत्त्व अधिक वाढले असते. प्रकरण सातमध्ये मुद्रिते किती वेळा वाचावीत याबद्दलचे विवेचन दिले आहे. त्यात सात वेळा मुद्रित-शोधन करावे असे लेखकाने म्हटले

आहे (पृ. ५२). वेळेचा अपव्यय टळावा म्हणून पहिले वाचन फारच महत्त्वाचे आहे. दुसऱ्या वाचनाला पेजिंगमध्ये तर तिसऱ्या वाचनानंतर मशीनवर छापण्यास देता आले पाहिजे. तथापि शोधनासंबंधीची सविस्तर व साधार अशी जी माहिती दिली आहे, ती अभ्यसनीय खासच आहे. प्रकरण आठ व नऊ यांमध्ये विरामचिन्हे, वाक्यरचना, दुसरे मुद्रित व शेवटचे मुद्रित यांची माहिती अठरा पृष्ठांत दिली आहे. मुद्रणालयाकडे मुद्रणप्रत स्वच्छ, शुद्ध व कागदाच्या एका बाजूस समास सोडून लिहून देणे आवश्यक आहे याचा माहितीपूर्ण ऊहापोह प्रकरण १० व १६ मध्ये द्विरुक्ती पत्करूनही लेखकाने केला आहे. प्रकरण अकरा ते चौदा यांमध्ये जुळणीचे प्रकार, मुद्रित–शोधन विभाग, मुद्रित-शोधकाचे समन्वयात्मक स्थान, मुद्रित-शोधनाचे प्रकार यांची माहिती आली असून, प्रकरण सतरा ते चोवीस या आठ प्रकरणांत मायबोलीचे जुने-नवे व उच्चारानुसारी शुद्धलेखन, तोड-जोड, शब्दसिद्धी, शुद्धाशुद्ध शब्दांची जंत्री, वाक्यशुद्धी, विरामचिन्हे यांची माहिती आहे. भाषा म्हणजे काय, मायबोलीचे महत्त्व, विरामचिन्हे वगैरे माहितीचा फापटपसारा झाला आहे. याऐवजी लेखकाकडून आलेल्या मजकुराचे पहिले व दुसरे मुद्रित-शोधन कसे केले जाते यांचे आणखी ठसे यावयास पाहिजे होते. पृ. १५४ वर शुद्धलेखन (जुने) दिले आहे, तर प्रकरण १९ मध्ये नवे सांगोपांग दिले आहे. प्रकरण पंचवीसमध्ये इंग्रजी–संस्कृत–हिंदी मुद्रित-शोधनाची माहिती आहे. प्रकरण सव्वीसमध्ये कोश, संदर्भ ग्रंथ व इतर ग्रंथांच्या मुद्रित–शोधनाची माहिती आहे. पुस्तकाचा ले-आउट लेखक, मुद्रक व प्रकाशक ठरवितात. मुद्रित-शोधकाशी याचा फारसा संबंध नाही, स्वतःचा छोटासा प्रेस चालवावा अशी जिद्द बाळगणारासाठी ही माहिती असावी. पहिल्या प्रकरणात पाठ्यपुस्तकांची माहिती दिली असून ती पुनः सत्ताविसाव्या प्रकरणात विस्ताराने दिली आहे.

मुद्रित–शोधनाचेच हे पुस्तक आहे. ते बिनचूक होणे आवश्यक आहे. तसे ते आहे. पृ. नऊवर मुद्रणा सुरुवात, पृ. ४२ वर बिणू अशा काही चुका राहून गेल्या आहेत. छपाई नीटस व आकर्षक झालेली आहे.

आर्यभूषणसारख्या मुद्रणालयात रा. धायगुडे यांनी मुद्रित शोधक व उपव्यवस्थापक म्हणून छत्तीस वर्षे सेवा केली आहे हे लक्षात घेता हे पुस्तक त्यांच्या अनुभवाचा परिपाक होय. पुणे मुद्रण विद्यालयात शिकविण्याची जबाबदारी त्यांच्यावर असल्याने त्याही अनुभवाचा उपयोग या पुस्तकास लाभला आहे. रा. धायगुडे यांनी या व्यवसायाला मार्गदर्शक अशी पुस्तके लिहून इतरांना आपल्या अनुभवाचा फायदा द्यावा अशी इच्छा करू या. इ. स. १९६० च्या पुस्तकाची ही सुधारून वाढविलेली आवृत्ती आहे. या आवृत्तीला महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांच्याकडून आर्थिक साह्य झाले आहे.

मुद्रित–शोधन : लेखक–य. ए. धायगुडे, दुसरी आवृत्ती, १९७७
मुद्रक : आयुर्विद्या मुद्रणालय, पुणे ३०, प्रकाशक : चिटणीस, दि पूना प्रेस ओनर्स असो. लि. पुणे ३०. आकार डेमी १/१६ पृष्ठे १०+३१२, मूल्य वीस रुपये.

# १४

## डॉ. पठाणांची ‘ शोधणी ’

**अरुण प्रभुणे**

डॉ. यू. म. पठाण हे औरंगाबादला मराठवाडा विद्यापीठात मराठी विभागाचे प्रमुख म्हणून काम करतात. मराठवाड्याची भूमी ही प्राचीन मराठीतील अनेक ग्रंथकारांची जन्मभूमी व कर्मभूमीही आहे. ‘ मराठवाडा ’ ही नाममुद्रा धारण करणाऱ्या विद्यापीठात मराठीचे अध्यापन–संशोधन करण्याची संधी डॉ. पठाणांना लाभली आहे. ‘ शोधणी ’ या ग्रंथाच्या रूपाने प्राचीन मराठीच्या संशोधनाची एक पावती त्यांनी सादर केली आहे. प्रा. सरदारांची प्रस्तावना ग्रंथास लाभली आहे.

“ ‘ शोधणी ’ ही संज्ञा तशी मूळची महानुभावीय. तेवढाच थोडाफार महानुभावत्वाचा स्पर्श या संग्रहास झाला आहे !...‘ शोधणी ’चे व्यवच्छेदकत्व यावरून लक्षात येईल, ” असे डॉ. पठाण ‘ शोधणी ’च्या प्रस्तावनेत म्हणतात. या ग्रंथात त्यांच्या संशोधनाची दिशा आणि त्यांचे प्राचीन मराठी वाङ्मयावरील निखळ प्रेम दिसून येते. त्यांच्या दृष्टीने प्राचीन मराठी वाङ्मयाच्या संदर्भातले संशोधन महत्त्वाचे. विशिष्ट संप्रदाय गौण ! मराठवाड्यातील संतवाङ्मयाचे हे संशोधन–समीक्षण आहे. बरेच महत्त्वाचे पण दुर्लक्षित राहिलेले प्रश्न त्यांनी येथे उपस्थित केलेले आहेत, त्यांची चर्चा केली आहे व स्वतःच्या दृष्टिकोणातून निष्कर्षाबाबत एक दिशा निश्चित केली आहे.

‘ शोधणी ’तील संगृहीत लेखांचे सर्वसाधारणपणे चार प्रकार आढळून येतात. पहिल्या प्रकारात संशोधकोपयोगी लेख आढळतात. प्राचीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकाला उपयोगी पडेल अशी महत्त्वपूर्ण माहिती आढळते. उदा०– ‘ मराठवाड्यातील प्राचीन साहित्यसंशोधन ’ व ‘ प्राचीन हस्तलिखिते व त्यांचे जतन ’ हे दोन लेख या प्रकारात मोडणारे आहेत. त्यांपैकी पहिल्या लेखामध्ये मराठवाड्यातील प्राचीन मराठी वाङ्मयाचे संशोधन करणाऱ्या लेखांचा व लेखकांचा एकत्रित विचार करण्यात आलेला आहे. दुसऱ्या लेखात अमूल्य अशा प्राचीन हस्तलिखितांच्या जतनाबाबतचा महत्त्वपूर्ण विचार मांडलेला दिसतो.

वरील दोन्ही लेख 'शोधणी'त मोडणारे नाहीत, हे उघडच आहे. पण 'शोधणी'-चा मार्ग कसा सुकर होऊ शकेल हे मात्र निश्चितच सांगणारे आहेत. या दृष्टीने 'शोधणी' या ग्रंथाचा ते एक भाग आहेत.

दुसऱ्या प्रकारात 'प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास : काही प्रश्न' व 'प्राचीन मराठी वाङ्मयाचे अध्ययन-अध्यापन' हे दोन लेख येतात. या दोन्ही लेखांत प्राचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहास-लेखनाबाबतचा व त्याच्या अभ्यासकाच्या टिकाणच्या निर्मळ, पूर्वग्रहविमुक्त दृष्टीवर भर दिलेला दिसतो. प्राचीन मराठी वाङ्मयाचे (अलीकडचे) इतिहास लेखकांची श्रद्धाळू वृत्ती प्रकट करणारे आहेत व काही विशिष्ट कालखंडावरच अधिक भर देणारे आहेत असे ते म्हणतात. उदा०– "यादवकालीन महानुभाव साहित्यावर वाङ्मयेतिहासकाराचे जितके लक्ष केंद्रित होते, तितके त्यापुढील कालखंडातील महानुभाव ग्रंथकारांवर होत नाही......त्यामुळे दुर्मिळ, अप्रकाशित ग्रंथकारांच्या साहित्याचे अध्ययन-संशोधन झाले असूनही त्याची नोंद वाङ्मयेतिहास-काराने जितकी व जशी घ्यावयास हवी तशी न घेतल्यास ती पुन्हा कालाच्या उदरात गडप होण्याची शक्यता असते." अशी धोक्याची सूचना डॉ. पठाण देतात. अ. का. प्रियोळकर व रा. चिं. ढेरे यांच्या 'मुसलमान मराठी संतकवी' या पुस्तकांकडे इतिहासकारांचे दुर्लक्ष होते, त्याचप्रमाणे जैन, लिंगायत, नागेश, आनंद इ. सांप्रदायिकांचे वाङ्मयीन कार्य इतिहास बऱ्याच प्रमाणात दुर्लक्षितो, इ. महत्त्वाच्या न्यूनांवर डॉ. पठाणांनी नेमके बोट ठेवलेले दिसते. परिपूर्ण व अद्ययावत असा प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास का नाही, यांची ही कारणे आहेत व ती दूर करण्यासाठी सूचनाही दिलेल्या आहेत. 'प्राचीन मराठी वाङ्मयाचे अध्ययन-अध्यापन' यात अभ्यासकाने वि. ल. भावे, बा. अ. भिडे, ल. रा. पांगारकर, अ. ना. देशपांडे यांच्याच इतिहास–ग्रंथांवर सर्वस्वी अवलंबून न राहता रामदास-रामदासी, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, महाराष्ट्र संशोधन पत्रिका, यांसारख्या संशोधनपर नियतकालिकांवर सुद्धा लक्ष केंद्रित करावयास हवे, इतिहासकार पूर्वग्रहाने तर लेखन करीत नाही ना, याचे नीट परीक्षण करावयास हवे, शक्यतो मूलग्रंथ मिळवून वाचावयास हवेत, आणि इतिहासलेखनही लेखकानुगामी नसावे तर एक एक वाङ्मयप्रकार घेऊन त्याचा आढावा घेणारे वाङ्मयेतिहास लिहिणेही आवश्यक आहेत. डॉ. पठाणांची ही सूचना विचारार्ह आहे.

'शोधणी'च्या फलिताचा एक तुकडा म्हणून जर प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास आपण पाहत असलो, तर या दृष्टीने त्या 'शोधणी'ला कशा प्रकारे परिपूर्ण शिस्तबद्ध रूप देता येईल, याचा हा विचार आहे. म्हणजे पहिल्या प्रकारात 'शोधणी'-पूर्व सामग्रीचा विचार तर दुसऱ्या प्रकारच्या लेखात 'शोधणी' उत्तर सामग्रीचा विचार येतो.

तिसऱ्या प्रकारात प्रत्यक्ष 'शोधणी'वर केंद्रित झालेले 'नामदेवगाथेची संहिता-निश्चिती', 'श्री गुरू ग्रंथसाहेबावरील मराठी संस्कार,' 'स्वामी रामानंद व त्यांच्या संपादण्या' हे लेख येतात.

'नामदेवगाथेची संहितानिश्चिती' या लेखामध्ये अत्यंत तर्कशुद्धपणे भाषाशास्त्रीय चिकित्सा सांगून नामदेवगाथेतील प्रक्षिप्त अभंग दूर करून नामदेवांचे मूळ अभंग शोधण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. उदा०—नामदेवांची हिंदी पदे, 'तीर्थावळी', नामदेव-कृत संतचरित्रे यांचा प्रामुख्याने विचार करून याच प्रकारे "यादवकालीन भाषेशी अधिक जुळणारे रूप प्रमाण मानून 'कोलेशन'च्या पद्धतीने नामदेवांच्या अभंगांच्या मूळ स्वरूपाप्रत जाण्याचा प्रयत्न निश्चित करता येईल...नामदेवांच्या प्रत्येक अभंगाची अशी भाषिक चिकित्सा केल्यास आज नामदेवगाथेवर आलेले सावट नष्ट होईल. 'शोधणी'मध्ये डॉ. पठाणांनी तसा प्रयत्नही केलेला दिसतो. 'श्री गुरू ग्रंथसाहेबावरील मराठी संस्कार' या लेखात नामदेवांच्या हिंदी पदांचा भाषिक अभ्यास करून श्री. शं. पु. जोशी, आचार्य विनयमोहन शर्मा व डॉ. राजनारायण मौर्य यांच्या मतांवर आक्षेप घेऊन "नामदेवांचे महाराष्ट्रीयत्व मान्य करूनही नामदेवांच्या या हिंदी पदांत जे 'मऱ्हाटपण' आढळते ते न स्वीकारण्याची प्रवृत्ती काही विद्वानांत आढळते. वस्तुतः असे असण्याचे काहीच कारण नाही, असा निष्कर्ष डॉ. पठाणांनी साधार विवेचन करून व भाषाशास्त्रीय चिकित्सा करून काढलेला दिसतो. नामदेवांच्या हिंदी पदांचा शब्दसंग्रह, विभक्ती, सर्वनामे, क्रियापदे, काळाची रूपे इ. सर्व भाषिक विशेष स-प्रमाण घेऊन श्री. शं. पु. जोशी यांच्या "संत नामदेव यांच्या ग्रंथसाहेबातील काव्यकृतीवर मराठीचा छाप अथवा छाया आहे, असा एक जो सर्वसाधारण समज महाराष्ट्रात झाला आहे तो सर्व चुकीचा आहे" यासारख्या मतांचे वैय्यर्थ संशोध-कांच्या लक्षात आणून देण्याचा हा नीटस प्रयत्न आहे. तर 'स्वामी रामानंद व त्यांच्या 'संपादण्या' या लेखाबाबत 'शोधणी'च्या प्रस्तावनेत प्रा. गं. बा. सरदार म्हणतात, "हा लेख आपल्याला मराठी साहित्याच्या एका अपरिचित दालनाचे दर्शन घडवितो." आणि हे अगदी खरे आहे. अत्यंत विस्तारपूर्वक व मुळातील उताऱ्यांसह 'संपादणी' म्हणजे काय ते सांगून रामानंदांच्या 'संपादण्या' वाचताना नाथांच्या व तुकोबांच्या भारूडांची आठवण होते असे मत त्यांनी साधार स्पष्ट केलेले आहे. आध्यात्मिक रूपकात्मकता व प्रयोगक्षमता हे संपादण्यांचे महत्त्वाचे विशेष आहेत. संपादण्यांचा हिंदी अवतार, त्यांचे प्रयोजन व वर्गीकरण असा हा एका अपरिचित पण महत्त्वाच्या विषयाचा विचार आहे. लेखाच्या शेवटी जिज्ञासूंसाठी रामानंदांच्या संपादण्यांचा अनुक्रम व मूळ संपादण्यांची संहिता दिली आहे.

चौथ्या प्रकारच्या लेखात संशोधित मूळ ग्रंथांचे अंतःस्वरूप स्पष्ट करून त्यांचे समीक्षण करण्याचा व प्राचीन मराठी वाङ्मयात त्या ग्रंथाचे विशिष्टत्व सिद्ध करण्याचा

अनुक्रमणिका

प्रयत्न दिसतो. उदा०– 'अज्ञानसिद्ध विरचित वरदनागेश', 'संतचरित्रकार उद्धव-चिद्घन', 'मन्मथस्वामी विरचित 'परमरहस्य', 'परमानंदांचे अभंग', 'बहिणा-बाईचे अभंग' हे लेख पहावेत.

'अज्ञानसिद्ध विरचित वरदनागेश'चा विचार करताना 'भाष्य' म्हणजे काय, याचे प्रथम तात्त्विक विवेचन येते व नंतर सदर ग्रंथ एक भाष्यग्रंथ म्हणून कसा उत्कृष्ट आहे याचे विवेचन येते. अज्ञानसिद्ध हे कवी की भाष्यकार हा प्रश्न चर्चेला घेऊन व मुळातील उतारे उद्धृत करून "केवळ काव्यनिर्मितीसाठी ही निर्मिती नाही" हा मुद्दा स्पष्ट केलेला दिसतो. त्यानंतर त्यातील अद्वैती तत्त्वज्ञानाचे स्वरूप विस्ताराने व मूळ उतारे देऊन स्पष्ट केलेले आहे.

या लेखात एक मात्र उणीव जाणवते. ती अशी, की डॉ. पठाण 'केवळ "...या ग्रंथात तत्त्वज्ञान व काव्य यांचा सुरेख संगम झाला आहे." असे विधान करतात. लेखाच्या सुरुवातीला कवीची भूमिका 'कवीची नसून भाष्यकाराची आहे', हे सिद्ध केल्यावर पुन्हा हे विधान कसे? शिवाय जरी आपापतः काव्यनिर्मिती झालेली असेल तर ती कशी व तिचे स्वरूप काय? हे प्रश्न अनुत्तरितच राहतात. डॉ. पठाणांच्या विवेचनातून वरील मुद्दे सिद्ध होत नाहीत. ते निसटल्यासारखे वाटतात.

प्राचीन मराठी वाङ्मयात 'चरित्रलेखन' हा प्रकार फारसा नाही. म्हाइंभट, नामदेव, महीपती अशी काहीच नावे चरित्रलेखनाबाबत डोळ्यांसमोर येतात. त्यातही वरील व्यक्ती परिचित संतांच्याच चरित्रावर लेखन करणाऱ्या आहेत. डॉ. पठाण यांनी बराचसा दुर्लक्षित संतचरित्रकार उद्धवचिद्घन त्याच्या वाङ्मयकृतींसह उभा करून मोलाचे कार्य केले आहे. त्यातही त्याने अपरिचित संतांची चरित्रे लिहिलेली दिसतात. त्याने नागेश सांप्रदायिक संतांची चरित्रात्मक आख्याने लिहिली आहेत. अर्थात त्यांहीपैकी फारच थोडी रचना आज उपलब्ध आहे. उद्धवचिद्घन हा चैतन्यसंप्रदायी असूनही त्याने विशेषतः नागेश सांप्रदायिक संतांची चरित्रे लिहिण्यात का रस घेतला असावा, असा प्रश्न उपस्थित करून सारस्वतकारांनी दिलेली त्याची गुरुपरंपरा डॉ. पठाणांनी दिली आहे. ती देऊन शेवटी "...हा कवी चैतन्य संप्रदायातला आहे. नागेश संप्रदायाचा व चैतन्य संप्रदायाचा निकटचा संबंध असावा असे दिसते" असा महत्त्वपूर्ण निष्कर्ष काढलेला दिसतो. लेखाच्या शेवटी जिज्ञासू अभ्यासकांसाठी नागनाथ, बहिरंभट, मृत्युंजय प्रभृतींची उद्धवचिद्घनाने लिहिलेली चरित्रे मुळातून उद्धृत केलेली आहेत.

'मन्मथस्वामी विरचित परम-रहस्य' हा ग्रंथ तत्त्वविवेचनात्मक आहे. याच नावाच्या संस्कृत ग्रंथावरील ती टीका आहे. "आध्यात्मिक उद्बोधन ही ग्रंथामागील प्रमुख प्रेरणा आहे." म्हणून मग "या ग्रंथात वीरशैव धर्माच्या तत्त्वज्ञानाचे, आचारधर्माचे, पूर्वपीठिकेचे आणि विकासाचे सुस्पष्ट प्रतिबिंब उमटलेले दिसते."

असे या ग्रंथाचे अंतःस्वरूप डॉ. पठाण यांनी समर्थपणे स्पष्ट केले आहे.

एक उणीव मात्र जाणवते, ती अशी की, "हा ग्रंथ मुख्यत्वेकरून तत्त्वविवरणात्मक असल्याने स्वामींची प्रधान भूमिका ही भाष्यकाराची आहे, कवीची नाही. असे असूनही त्यांच्या कवित्वाचा प्रत्ययही या ग्रंथात जागोजाग आल्याविना राहत नाही." 'जागोजाग' म्हणजे नेमका कोठे ? इतर ठिकाणी डॉ. पठाण जसे मुळातील उतारे उद्धृत करतात तसे ते जर येथेही केले असते तर अभ्यासकांची अधिक चांगली सोय झाली असती.

भक्तीच्या प्रमुख प्रेरणेने लिहिले गेलेले 'परमानंदांचे अभंग' हे 'संवाद' कसे आहेत, याचे सुरेख व सुस्पष्ट चित्र 'परमानंदांचे अभंग' यात येते. "हा संवाद कधी ते स्वंतःशीच करतात तर कधी समाजाशी करतात. हा 'स्व' एकान्तात तटस्थपणे स्वतःशीच बोलू लागतो, तर कधी तो लोकान्तात बोलू लागतो. व्यक्ती आणि व्यक्ती, व्यक्ती आणि समाज यांतील हा संवाद आहे." अत्यंत निरलंकृत, प्रासादिक वाणीतून व्यक्त झालेले ते अभंग आहेत. जरी हा लेख अभंगाचे अंतः-स्वरूप स्पष्ट करणारा असला, तरी 'एका अप्रकाशित संतकवीच्या मौलिक कवितेचा मराठी भाविकांना परिचय'करून देण्याचा हा प्रामाणिक प्रयत्न आहे.

'बहिणाबाईच्या 'स्वगता'तून बहिणाबाईच्या मनातील संघर्ष उत्कटपणे डॉ. पठाण यांनी दाखवून दिला आहे. त्यातून तिच्या काव्यातील काव्यात्मतेचा शोध घेण्याचा हा प्रयत्न दिसतो. परमात्मप्राप्तीच्या ध्येयात मन हेच अडथळा निर्माण करते हे लक्षात घेऊन बहिणाबाई व तिचे मन यांतील हा संघर्ष आहे आणि त्यामुळे तिचे लक्ष उद्बोधनावर केंद्रित न होता भावनात्मक आंदोलनांचे प्रकटीकरण अपरिहार्यरीत्या ती करते.

'शोधणी' या ग्रंथाचे स्वरूप असे आहे. 'शोधणी'पूर्व व 'शोधणी'उत्तर व्यवस्था कशी असावी याचे विवेचन येथे येते. तसेच संशोधित ग्रंथांचे अंतःस्वरूप वाचकांना स्पष्ट करून दिले आहे. प्रस्तावनेत प्रा. गं. बा सरदार म्हणतात त्यानुसार डॉ. पठाण यांनी आपल्या या लेखसंग्रहात अनेक महत्त्वाचे प्रश्न उपस्थित केले आहेत. त्यांची चर्चा होणे अगत्याचे आहे. ह्या संग्रहातील विविध विषय पाहिले की लेखकाचा व्यासंग किती व्यापक व सर्वस्पर्शी आहे याची कल्पना येते.

प्राचीन मराठी वाङ्मयातील महत्त्वपूर्ण व दुर्लक्षित कवी व कविता डॉ. पठाण यांनी मराठी वाचकांसमोर नेटकेपणे व अभ्यासू वृत्तीतून ठेवलेली आहे, याची प्रतीती 'शोधणी' वाचताना जाणकारांना आल्यावाचून राहत नाही. 'ग्रंथु निका जाला असेः'

**शोधणी**

लेखक : प्रा. डॉ. यूसुफखान महमदखान पठाण.
प्रकाशक : कुलसचिव, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.
मूल्य वीस रुपये.

# १५

## मराठी साहित्य संमेलन शताब्दीच्या निमित्ताने—

### गो. म कुलकर्णी

अखिल भारतीय मराठी साहित्यसंमेलन हे आता महाराष्ट्राच्या सांस्कृतिक व्यवहाराचे एक महत्त्वाचे अंग बनले आहे. सर्वसामान्य मराठी रसिकाच्या दृष्टीने हा महोत्सव म्हणजे मराठीच्या साहित्यविश्वात एकत्रितपणे विहार करण्याची एक नामी संधी. दूरदूरच्या ठिकाणाहून आलेल्या साहित्ययात्रींच्या भेटीगाठींची एक पर्वणी. मोकळेपणाने काव्यशास्त्रविनोदात रममाण होण्याचे एक सहलवजा ठिकाण. यामुळे साहित्यसंमेलनाविषयीचे औत्सुक्य साहित्यलोभी मराठी मनात नेहमीच नांदत असते. संमेलन भरण्याच्या आसपासच्या काळात या औत्सुक्याला उधाण येते. हवेत अनेक प्रकारच्या वावड्या उडत राहतात. संमेलनाध्यक्षाच्या निवडीला अटीतटीचे स्वरूप प्राप्त होते, संमेलन संपल्यानंतरही काही काळ, त्याविषयीची वादळी किंवा वातड चर्चा चालूच असते.

अशा या साहित्यसंमेलनाचा उगम अकरा मे १८७८ ला पुण्यात भरलेल्या ग्रंथकारांच्या पहिल्या मेळाव्यात आढळतो. मराठी ग्रंथकारांना एकत्र आणून ग्रंथनिर्मिती आणि ग्रंथव्यवहार यासंबंधीचा विचार करण्याच्या उद्देशाने हा मेळावा भरविण्यात आला होता. त्या वेळचा हा चिमुकला मेळावा, आजच्या विशाल साहित्यसंमेलनांची गंगोत्री ठरला आहे. अकरा मे १९७८ ला या घटनेला शंभर वर्षे पूर्ण होत आहेत. या निमित्ताने पुण्याच्या साहित्यपरिषदेने एक सोहळा साजरा करण्याचे योजिले आहे. 'शतायुर्भव' ही सदिच्छा सर्वत्र आणि नेहमीच प्रकट होत असली तरी व्यक्तीच्या किंवा संस्थेच्या जीवनात असा भाग्यक्षण क्वचितच उजळणारा. साहित्यसंमेलनाचे पहिले अधिवेशन, पुण्यात आणि पुणेकरांच्या पुढाकाराने भरलेले असल्यामुळे पुण्याच्या साहित्यपरिषदेने या आनंदसोहळ्यात अग्रभागी राहावे, हे स्वाभाविकच आहे. या साहित्यपरिषदेने दीर्घकालपर्यंत या साहित्यसंमेलनाच्या अधिवेशनाचे सूत्रसंचालनही केलेले आहे. १९६५ पासून ही अधिवेशने मराठी साहित्य महामंडळातर्फे भरविली जातात; पण त्याआधीच्या बहुतेक अधिवेशनांचे धुरीणत्व या साहित्य परिषदेकडेच होते.

न्या. रानडे व लोकहितवादी देशमुख हे या पहिल्या संमेलनाचे किंवा मेळाव्याचे अध्वर्यु. त्या मेळाव्याचे अध्यक्षपदही न्या. रानडे यांनीच भूषविले होते. १८८५ साली भरलेल्या

साहित्यसंमेलनाचे अग्रणीही न्या. रानडे हेच होते. नी. ज. कीर्तने, का. वा. मराठे, म. मो. कुंटे, गो. ग. आगरकर, ह. कृ. दामले प्रभृतींचाही यात पुढाकार होता. या संमेलनाच्या निमित्ताने घडलेली एक छोटीशीच पण महत्त्वाची घटना नोंदविण्यासारखी आहे. म. जोतिराव फुले यांना या संमेलनाचे आमंत्रण येऊनही संमेलनास उपस्थित राहण्यास त्यांनी नकार दिला. अशा प्रकारच्या संमेलनांनी 'शूद्रांदी अतिशूद्रांचा काही एक फायदा होणे नाही, यावद्दल आमचा आम्हीच विचार केला पाहिजे' असे त्यांनी संमेलनचालकांस परखडपणे कळविले. मराठी साहित्य संमेलने आणि बहुजनसमाज यांच्या नात्याचा प्रश्न आज अनेक कारणांनी विशेष जिव्हाळ्याचा आणि ज्वालाग्राहीही बनलेला आहे. १८८५ मध्ये म. फुलेंनी लिहिलेल्या वरील पत्रातून या प्रश्नाची धग प्रथम प्रकट झाली आहे. इतका दीर्घकाळ लोटूनही वरील प्रश्न अद्यापि लोंबकळलेल्या त्या अवस्थेतच राहावा हे दुर्दैव. या प्रश्नाच्या सोडवणुकीची निकड किती तीव्र बनली आहे, हे पुण्यात भरलेल्या परवाच्या साहित्य संमेलनात घडलेल्या आव्हानात्मक घटनांनी दाखवून दिले आहेच. आगामी साहित्य संमेलनांना याचा विचार केल्याशिवाय पुढे पाऊल टाकता येणार नाही.

संमेलनाच्या जन्माला संवत्सरशत होऊन गेले असले तरी प्रत्यक्षात भरलेल्या आजवरच्या अधिवेशनांची एकूण संख्या बावन्नच भरते. संमेलनाच्या अडखळत्या वाटचालीची यावरून कल्पना यावी. पहिले संमेलन १८७८ साली भरले तर दुसरे संमेलन उभे राहण्यास १८८५ साल उजाडावे लागले. संमेलनाने त्यानंतर जी दडी मारली ती १९०५ पर्यंत तब्बल वीस वर्षे. पुढे १९०६ पासून १९०९ पर्यंत नियमितपणे भरणाऱ्या ह्या संमेलनाला १९०९ नंतर अनियमितपणाने पुनश्च ग्रासले. १९१२, १९१५, १९१७, १९२१, १९२६ असे हे त्याचे पुढचे लंगडते टप्पे. १९२६ नंतर मात्र संमेलनाचा गाडा बऱ्याच नियमितपणे चालू झालेला दिसतो. या संमेलनांना घटनात्मक स्वरूप देण्याच्या उद्देशाने १९०६ मध्ये साहित्य-परिषदेची स्थापना करण्यात आली. वा. गो. आपटे यांचा या बाबतीत विशेष पुढाकार होता. श्री. आपटे हे बंगाली भाषेचे जाणकार असल्यामुळे या बाबतीत त्यांच्यासमोर जो आदर्श होता, तो १८९२ साली स्थापन झालेल्या वंगीय साहित्य-परिषदेचा. परंतु वंगीय साहित्य-परिषदेच्या तुलनेने मराठी साहित्यपरिषदेचा साराच व्यवहार तुटपुंजा होता. सुशिक्षितांतील उपेक्षाबुद्धीमुळे ही संस्था म्हणावे तसे बाळसे धरीत नव्हती; याबद्दलची खंतही श्री. आपटे यांनी जाहीरपणे व्यक्त केली होती (कृतिप्रवणतेच्या संदर्भात ही उपेक्षाबुद्धी आजही कमी झालेली नाही. वाटल्यास ही तिची शताब्दी मानावी!) परिस्थिती अनुकूल असो वा प्रतिकूल, काही जिद्दीच्या कार्यकर्त्यांच्या तळमळीमुळे परिषद आणि संमेलन यांचे कार्य कूर्मगतीने का होईना, पण आजवर चालत आलेले आहे. हा कार्यभार उचलण्यात वा. गो. आपटे, वि. मो. महाजनी, दा. गो. पाध्ये, द. वा. पोतदार, ना. गो. चापेकर, वा. दा. गोखले, र. छ. जोशी प्रभृतींचा महत्त्वाचा वाटा आहे.

१९०९ मध्ये बडोद्यास भरलेल्या साहित्य-संमेलनाच्या वेळी संमेलनविषयक नियमांचा एक आराखडा तयार करण्यात आला. तोपर्यंत जे केवळ ग्रंथकारांचे संमेलन होते, ते त्या नंतर ' महाराष्ट्र साहित्य संमेलन ' झाले. ग्रंथकाराबरोबरच त्यात इतरही साहित्यप्रेमी मंडळींचा समावेश होऊ लागला. दिल्लीच्या साहित्य संमेलनाच्या वेळी या संमेलनाला ' अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन ' असे नामाभिधान प्राप्त झाले. १८७८ पासून १९२० पर्यंत भरलेल्या साहित्य संमेलनांचे स्वरूप स्थूलपणे विद्वत्सभेसारखे होते. भाषणे, निबंधवाचन, चर्चा, टराव यांसारख्या कार्यक्रमांनाच त्यात प्राधान्य असे. १९२१ मध्ये बडोद्यास न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या साहित्यसंमेलनापासून वरील कार्यक्रमात थोडा बदल झाला. याला काव्यगायनासारख्या रंजनात्मक कार्यक्रमांची जोड मिळू लागली. विद्वत्सभेचे स्त्रीपुरुषांच्या रसिक मेळाव्यात रूपांतर झाले.[1] आजतागायत हेच स्वरूप कायम आहे. अलीकडे त्यातील रंजनात्मक अंग विशेषत्वाने वाढीस लागलेले दिसते. त्याबद्दल प्रतिक्रियाही आता जोर करू लागली आहे.

मराठी भाषेचा चांगल्या प्रकारे विकास होण्यास, ती बलसंपन्न होण्यास, ज्या साधनांची व प्रयत्नांची जरुरी आहे, ती एकत्र करणे; ग्रंथकारांना उत्तेजन देणे; ग्रंथप्रसाराला साह्य करणे; परस्परांतील विचारविनिमयाला टरावरूपाने मूर्त स्वरूप देऊन त्याच्या अंमलबजावणीसाठी कटिबद्ध होणे, थोर अधिकारी मंडळींचे मार्गदर्शन मिळविणे, साहित्यविषयक चर्चा घडवून आणणे, व्यासंगशीलता व रसिकता यांच्या वाढीला अनुकूल वातावरण निर्माण करणे, ही जी संमेलनाची व परिषदेची प्रमुख उद्दिष्टे, ती अद्यापि प्रत्यक्षात फारशी उतरलेली नाहीत. या संमेलनांनी प्रामुख्याने जे काम केले आहे ते साहित्यमूलक वातावरणनिर्मितीचे. विशिष्ट राजकीय परिस्थितीमुळे संमेलनाला विधायक कार्यापेक्षा प्रतिक्रियात्मक चळवळीचे स्वरूप प्राप्त होत गेले. संमेलनाच्या जीवनातील १८७८ पासून १९४६ पर्यंतचा दीर्घकाळ पारतंत्र्यातच लोटला. सांस्कृतिक किंवा भाषाविषयक महत्त्वाच्या व्यवहारांचा राज्यकर्त्यांच्या धोरणाशी संघर्ष येत राहिल्याने या संमेलनांतून साहित्यकारणापेक्षा राजकारणाचेच वर्चस्व राहिले. स्वातंत्र्योत्तर काळातही वरील परिस्थितीत फारसा फरक पडला नाही. भाषावार प्रांतरचनेसारख्या प्रश्नांनी मराठी साहित्य संमेलनांत अनेक वेळा गदारोळ माजविलेला आहे. अजूनही हा प्रश्न सुटलेला नाही. आणीबाणीच्या किंवा आणीबाणीनंतरच्या परिस्थितीमुळे तर साहित्यसंमेलन आणि राजकारण यांची युती आजतागायत अविभाज्यच राहिली आहे. अध्यक्षांच्या निवडीत किंवा संमेलनांतील टरावात याचे वारंवार प्रतिबिंब उमटलेले दिसेल. मात्र साहित्य-संमेलनांतील हे टराव अखिल भारतीय मराठी भाषिकांच्या

---

१. १८८५ साली भरलेल्या ग्रंथकार संमेलनात दादोबा पांडुरंग यांच्या कन्या, अहिल्याबाई तर्खडकर या एकमेव महिला उपस्थित होत्या. आगरकरांनी संमेलनात स्वतंत्र टराव मांडून या घटनेची दखल घेतली होती.

मताचे प्रतिनिधित्व करीत राहिल्यामुळे शासनसंस्थेवर त्यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे दबाव येत गेला हेही खरे आहे. या दृष्टीने भाषावार प्रांतरचना किंवा प्रादेशिक विद्यापीठे समूर्त होण्यास या संमेलनांनी फार मोठा हातभार लावलेला आढळेल. साहित्य-संमेलनाशी निगडित असलेल्या साहित्यसंस्थांनी कोशरचना, वाङ्मयेतिहासलेखन, ग्रंथप्रदर्शने, प्रकाशने यांसाठी काही विधायक कामे चालविली असली तरी ती साहित्यसंमेलनाशी प्रत्यक्षपणे निगडित नाहीत. साहित्यसंमेलनाने आजवर मुख्यतः आणि महत्त्वाचे कोणते कार्य केले असेल तर ते भिन्नभिन्न ठिकाणच्या, भिन्नभिन्न प्रवृत्तींच्या मराठी भाषिकांना एकत्र आणण्याचे, त्यांना संघटित करण्याचे. मराठी मायबोलीवर स्पष्ट प्रेम करण्याची आपल्या परीने दीक्षा देण्याचे.

या संदर्भात मराठी साहित्यसंमेलनांनी केलेले भौगोलिक भ्रमण खूपच बोलके आहे. ही संमेलने पुण्या–मुंबईच्या परिसरांशी अधिक निगडित झालेली असली तरी या 'संमेलन-स्थळांत दिल्ली, हैदराबाद, इंदूर, बडोदा, भोपाळ, ग्वाल्हेर, अहमदाबाद, कारवार, बेळगाव, मडगाव, नागपूर, औरंगाबाद, वर्धा, यवतमाळ, अकोला यांसारखी स्थळे आहेत. महाराष्ट्रातील जिल्ह्यांच्या बहुतेक ठिकाणी या संमेलनांचा संचार झालेला आहे, एवढेच नव्हे तर मालवण, इचलकरंजी, कऱ्हाड यांसारख्या लहान गावीही या संमेलनांनी फेरफटका मारलेला दिसतो. मराठी महामंडळाच्या स्थापनेपासून तर तत्त्वतः ही संमेलने प्रादेशिक दृष्ट्या सर्वसमावेशक झालेली आहेत असे म्हणण्यास हरकत नाही. या महामंडळाशी पुण्याची साहित्य परिषद, मुंबईचा साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद, विदर्भ साहित्य संघ, मध्यप्रदेश साहित्य सभा, आंध्र मराठी साहित्य परिषद यांसारख्या संस्था संलग्न झालेल्या आहेत. ' असू दूर पेशावरी उत्तरी वा असू दक्षिणी दूर तंजावरी; मराठी असे आमुची मायबोली ' या कविवाणीला या संमेलनांमुळे एक प्रकारची यथार्थता लाभलेली आहे.

भौगोलिक व्याप्तीच्या तुलनेने या संमेलनांतून भावनिक विशालता मात्र कमी आढळते. याला आपल्या समाजाची जडणघडणही बऱ्याच अंशी कारणीभूत म्हणावी लागेल. आजपर्यंतची बहुतेक सारी साहित्य संमेलने एका उच्च मध्यमवर्गीय स्तरात वावरत आलेली आहेत. अध्यक्षपदी किंवा स्वागताध्यक्षपदी स्थानापन्न झालेल्या व्यक्तींत सत्ता किंवा संपत्ती हेच ज्यांचे बळ आहे, अशाही बऱ्याच व्यक्ती आढळतात. अशांत काही राजे, महाराजे वा संस्थानिकही आहेत. साहित्येतर व्यक्तींना साहित्याच्या प्रांगणात महत्त्वाचे स्थान नसावे, नव्हे मज्जावच असावा, अशा प्रकारचा विचार आज हिरीरीने प्रकट केला जात आहे. साहित्याचा प्रांत निखळपणे साहित्य भिमुख असावा; सत्तेच्या किंवा संपत्तीच्या बळावर साहित्यिकाचे सत्त्व हिरावून घेण्याची संधी कोणाला दिली जाऊ नये; साहित्यिकानेही या बाबतीत जागरूक राहावे; ही या मागणीमागील भूमिका मूलतः योग्यच म्हणावी लागेल. तथापि या प्रश्नाची व्यावहारिक आणि संघटनात्मक बाजूही लक्षात घ्यावयास हवी.

साहित्याभिमुख किंवा साहित्यात जिव्हाळ्याने रस घेणाऱ्या व्यक्ती कोणत्याही समाजात आणि कोणत्याही काळी तुलनेने कमीच असतात. मराठी साहित्य संमेलनांची सूत्रे

अनुक्रमणिका

आजवरच्या परिस्थितीमुळे अकिंचन अशा मध्यमवर्गीयांच्याच हाती प्रामुख्याने राहिली आहेत. संमेलनाचा सारा सामूहिक व्याप आर्थिक दृष्ट्या तडीस नेण्यासाठी द्रव्यबलाची नितान्त आवश्यकता असते. त्यासाठी समाजातील आर्थिक दृष्ट्या प्रबल असलेल्या घटकाचे सहकार्य मिळवावे लागते; संमेलन सर्वसमावेशक करण्याच्या दृष्टीनेही याची गरज असतेच. मराठी संस्थानिकांचा या दृष्टीने एके काळी बराच उपयोग झालेला आहे. भारताच्या विविध भागांत पसरलेल्या मराठी संस्थानिकांचा मराठी साहित्याशी आणि संस्कृतीशी जिव्हाळ्याचा संबंध होता. एके काळी ही संस्थाने मराठी अस्मितेची चालतीबोलती प्रतीके मानली जात. यांतील काही संस्थानिकांनी मराठी नाट्य-संगीत साहित्यादी कलांना दीर्घकाळ उघड आश्रयही दिलेला आहे. फार कशाला, मराठी साहित्य परिषदेस पहिली घवघवीत देणगी मिळाली ती इंदूरच्या महाराजांकडून; आणि पुण्यातील महाराष्ट्र साहित्य परिषदेची वास्तू उभी राहिली, ती औंधकरांच्या दातृत्वावर. वरील परिस्थितीमुळे साहित्य संमेलनाची कक्षा एका बाजूने मर्यादित झाली आणि दुसऱ्या बाजूने व्यामिश्र. या व्यामिश्रतेमुळेच संमेलनाला आज-पर्यंत एकजिनसी असे कोणतेच धोरण आखता आलेले नाही; त्यात विशिष्ट प्रकारच्या साहित्याचाच विचार न होत राहता, व्याकरण, कोश, शुद्धलेखन, नभोवाणी, चित्रपट, यांसारखे संकीर्ण विषय समाविष्ट झालेले आहेत. संमेलनांनी पसार केलेल्या आजवरच्या विविध संकीर्ण ठरावांत पंचम जॉर्ज बादशहाचे अभीष्टचिंतन करणाराही एक ठराव आहे.

संमेलनाच्या अध्यक्षपदावरून जी भाषणे केली गेली त्यावरही या व्यामिश्रतेचा परिणाम झालेला आढळतो. संमेलनाध्यक्षपदी विराजमान होणारी व्यक्ती ही त्या त्या काळातील एक अधिकारसंपन्न, व्यासंगशील व्यक्ती गणली जाते. त्या त्या काळातील श्रेष्ठ विचारवंत, कवी, नाटककार, कादंबरीकार, तत्त्वचिंतक, समीक्षक, वैयाकरणी, संशोधक या स्थानांवर आरूढ झालेले दिसतात. हे अध्यक्षपद लाभणे हा आजही साहित्यक्षेत्रातील सर्वोच्च मान मानण्यात येतो. यामुळे या पदाला एक प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. या त्याच्या प्रतिष्ठेला, गौरवाला साजेसे भाषण त्याने करावे, अशी अपेक्षा स्वाभाविकपणेच बाळगली जाते. अध्यक्षीय भाषण हा संमेलनाचा केंद्रबिंदूच. अशा या संमेलनाध्यक्षपदाच्या जबाब-दारीची गंभीर जाणीव सर्वच अध्यक्षीय भाषणांतून व्यक्त झाली आहे. आपल्या विचार-चिंतनाचे सारसर्वस्व अध्यक्षीय भाषणांतून यावे अशी बहुतेक अध्यक्षांची मनोमन इच्छा असते. पण असे असूनही साहित्यविचारदृष्ट्या या भाषणांतून एकंदरीने फारसे काही हाती लागत नाही. यांतील बरीचशी भाषणे त्या त्या काळातील व्यावहारिक समस्यांच्या विचारातच गुरफटून गेलेली दिसतात. तात्त्विक विचारांपेक्षा वृत्तपत्रीय तात्कालिकता त्यात अधिक प्रमाणात डोकावते. या भाषणांना वस्तुनिष्ठ तत्त्वमंथनापेक्षा स्वैर आवडीनिवडींचे, स्थूल आढाव्यांचे स्वरूप प्राप्त झाले आहे. अनेक प्रवृत्तींच्या व प्रकृतींच्या अध्यक्षांनी आपापले विचार सैरभैरपणे मांडल्यामुळे स्वाभाविकपणेच त्यात परस्परविसंगतीही उतरली आहे. मतवैचित्र्याची ही स्वाभाविक परिणती मानली तरी वैचित्र्य प्रकट होताना त्याने एक

अनुक्रमणिका

तात्त्विक उंची गाठावी अशी जी अपेक्षा असते तीही या भाषणांतून क्वचित फलद्रूप होते. गेल्या शतकातील मराठी साहित्याची व संस्कृतीची स्थिती, गती, प्रवृत्ती, प्रेरणा यांच्या-बद्दल आलेख काढण्याच्या दृष्टीने मात्र ही भाषणे उपयुक्त ठरतील.

१९५८ मध्ये मालवण येथे भरलेल्या साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करताना आ. रा. देशपांडे ( कवी अनिल ) यांनी साहित्यसंमेलनात तोपर्यंत झालेल्या अध्यक्षीय भाषणांचे काही रूढ प्रकार पुढीलप्रमाणे निर्देशिलेले आहेत : ( १ ) वाङ्मय-निर्मितीचा वार्षिक आढावा, ( २ ) एखाद्या मौलिक साहित्यसिद्धान्ताचे प्रतिपादन, ( ३ ) राजकीय प्रश्नांची चर्चा, ( ४ ) स्वकार्याचा निर्देश, ( ५ ) स्वमतांचे प्रतिपादन. बहुसंख्य अध्यक्षीय भाषणे या पाच प्रकारांपैकी पहिल्या, तिसऱ्या आणि पाचव्या प्रकारांत अंतर्भूत होतात. अध्यक्षीय भाषणांतून वाङ्मयीन स्थूल आढाव्यांना छेद देण्याचा व अध्यक्षीय भाषण एकसंध ठेवण्याचा उपक्रम डॉ. केतकर यांनी हैदराबाद संमेलनात केला; पण तो त्यांच्यापुरताच मर्यादित राहिला. मराठी संस्कृतीचे विशेष, उच्च शिक्षण आणि मराठी भाषा, भाषाशुद्धी, भाषावार प्रांतरचना, साहित्यातील जुने नवे प्रवाद आणि अश्लीलता यांसारख्या विषयांना या अध्यक्षीय भाषणांतून पुनःपुन्हा स्पर्श झालेला आहे. मराठी संस्कृतीचे चर्वण पुनःपुन्हा होऊनही तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा अपवाद वगळता ते बहुतांशी कंठाळीच राहिले आहे. काही भाषणे तर केवळ साहित्येतर विषयालाच वाहिल्यासारखी वाटतात. उदाहरणार्थ, आचार्य जावडेकर किंवा नाट्याचार्य खाडिलकर यांचे अध्यक्षीय भाषण. साहित्यसंमेलनाच्या या भाषणातून व्यक्तिगत आवडीनिवडीचे प्रतिबिंब वाजवीहून अधिक प्रमाणात पडलेले आहे. लेखण्या मोडण्याच्या आग्रही आदेशापासून तो जो जे वांच्छील ते तो लिहीत राहो'चा अभिप्राय प्रकट करण्यापर्यंत या भाषणांचा पसारा पसरलेला आहे. सावरकर-पटवर्धन यांनी भाषाशुद्धीवर एकांडा भर दिला आहे तर श्री. म. माटे यांनी बहुजनसमाजाच्या चित्रणावर. बहुजनसमाजदर्शनाचा विषय पुढे डॉ. कोलते यांच्याही भाषणांत येतो. त्यांनी बोलीभाषेतील सौंदर्याकडेही लक्ष वेधलेले आहे. मामा वरेरकर साहित्य व राजकारण यावर केवलपणे भर देतात, तर डॉ. केतकर आपले विचार संस्थानी राजकारणाच्या अनुषंगानेच टासून मांडतात.

साहित्यसंमेलनांच्या बावन्न अधिवेशनांपैकी पहिल्या चार-पाच संमेलनाध्यक्षांची भाषणे उपलब्ध नाहीत. पहिले भाषण सविस्तरपणे उपलब्ध आहे, ते मे १९०८ मध्ये पुण्यात भरलेल्या संमेलनाच्या अध्यक्षांचे—भारताचार्य चिं. वि. वैद्य यांचे. वैद्यांच्या या भाषणात महाराष्ट्राच्या सांस्कृतिक घडणीचा ऊहापोह प्रथमतः आलेला दिसतो. तत्कालीन मराठी माणसांची भाषिक अस्मिता जागी करण्याच्या दृष्टीने हा ऊहापोह सुरू झाला असावा. इतिहासाचार्य राजवाडे यांनी वैतागाच्या भरात ' मराठी भाषा मुमूर्षू आहे ' असे केव्हातरी उद्गार काढले. काही संमेलनाध्यक्षांनी याही मुद्याचा परामर्श घेतलेला आहे. मराठी साहित्यातील विविध प्रकारांच्या उणिवांचा निर्देशही काही अध्यक्षीय भाषणांतून येतो; त्यावर

काहींनी व्यावहारिक पातळीवरून उपाययोजनाही सुचविली आहे.

चिंतामणराव वैद्यांनंतर अनुक्रमे कर्नल कीर्तीकर व हरिभाऊ आपटे हे संमेलनाध्यक्ष झाले. एक त्या काळाचा नामवंत आधुनिक कवी तर दुसरा नामवंत कादंबरीकार. दोघांनीही आपापल्या परीने आधुनिक मराठी वाङ्मयाचे समर्थन केले आहे; मुमूर्षुतेचा आणि परभृततेचा आरोप धुडकावून लावला आहे. मराठी साहित्य संमेलनांतून जो साहित्यविचार होई त्यात ललितेतर वाङ्मयाचा अधिक विचार असे. यामुळे ललितवाङ्मयाच्या महतीचे प्रतिपादन हरिभाऊंच्या भाषणात आल्याचे महत्त्व जाणवते. मराठी लेखकांच्या आर्थिक दुरवस्थेकडे कर्नल कीर्तीकरांसारखे कवीही आवर्जून लक्ष वेधतात; त्यावर काही उपाय सुचवितात. मराठी वाङ्मयाभिवृद्धीच्या दृष्टीने इतरही काहींनी विविध असे व्यावहारिक उपाय सुचविलेले आहेत; काहींनी साहित्य-अकादमीचाही या संदर्भात निर्देश केला आहे. आंतरभारती, दुर्मिळ ग्रंथांचे संकलन वा पुनर्मुद्रण, विविध विषयांची माहिती देणारी ग्रंथमाला, चांगल्या ग्रंथांचे अनुवाद, कोशनिर्मिती, व्याकरणाचा पुनर्विचार यांसारखे अध्यक्षीय भाषणांतून आलेले चर्चाविषय आजही कार्यवाहीच्या दृष्टीने दुर्लक्षित राहिले आहेत. कीर्तीकर आणि आगाशे यांच्या भाषणांतून कवितेतील यमक निर्यमकतेविषयी जे विचार प्रकट झाले आहेत, ते आजच्या दृष्टीने महत्त्वाचे राहिलेले नाहीत; पण मराठी नाटकांतून पौराणिक व्यक्तींचे केले जाणारे आधुनिकीकरण कितपत इष्ट आहे हा आगाशे यांनी उपस्थित केलेला प्रश्न आजही महत्त्वाचा ठरणारा आहे.

साहित्यविषयक विचारांच्या दृष्टीने न. चिं. केळकर, श्री. कृ. कोल्हटकर, वा. म. जोशी वि. स. खांडेकर, कुसुमावती देशपांडे, वि. वा. शिरवाडकर, वा. ल. कुलकर्णी, पु. शि रेगे, पु. ल. देशपांडे, आणि दुर्गाबाई भागवत यांची भाषणे विशेष महत्त्वाची आहेत; या सर्वांतून मौलिक चिंतन आले आहे, असे नाही; परंतु ही भाषणे रसिक वाङ्मयविचाराने प्रभावित झाल्याचे निःसंशयपणे जाणवते. केळकरांच्या भाषणातून मांडला गेलेला सविकल्प समाधीचा सिद्धान्त किंवा वामन मल्हारांच्या भाषणातून प्रकट झालेले सत्य, सौजन्य, सौंदर्य यांचे नाते वाङ्मयोपासकांच्या चांगल्या परिचयाचे आहे. त्या मानाने श्रीपाद कृष्णांचे अध्यक्षीय भाषण वाङ्मयविश्लेषणदृष्ट्या मोलाचे असूनही ते तेवढे परिचित नाही. इतर अनेकांप्रमाणेच श्रीपाद कृष्णांनीही आपल्या अध्यक्षीय भाषणात मराठी संस्कृतीचा विचार केला आहे. पण तो विचार सुटा न राहता वाङ्मयानुगामी बनला आहे. मराठी भाषेला गौण स्थान प्राप्त झाल्याची व्यथा इतरांप्रमाणे कोल्हटकरही बोलून दाखवितात, पण येथेच न थांबता त्याची सखोल मीमांसाही ते करतात. परकीय राजवट, राज्यव्यवहारात किंवा उच्च शिक्षणक्रमात मराठीला महत्त्वाचे स्थान नसणे, यासारखी या उपेक्षेची नेह-मीची कारणे तर ते देतातच, पण याबरोबरच या परिस्थितीला आपणही कसे जबाबदार आहोत, हेही स्पष्ट करतात. सोयीसाठी का होईना, पण राष्ट्रीय सभेसारख्या संस्थेने विचार-विनिमयाचे अखिल भारतीय पातळीवरील माध्यम म्हणून इंग्रजीचा स्वीकार केला. बहुतेक

व्यापक औद्योगिक किंवा सामाजिक व्यवहारात इंग्रजीच चालू राहिली. परिणामी मराठी विचारवंतांनाही आपले अव्वल दर्जाचे विचारधन इंग्रजीतच ग्रथित करणे कसे सोयीचे वाटले, ( उदा०—न्या. रानडे यांचा ' मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष ' हा ग्रंथ; भांडारकरांचा दक्षिण हिंदुस्थानचा इतिहास, महादेव मोरेश्वर कुंटे यांचा आर्यसंस्कृतीच्या स्थित्यंतरावरील ग्रंथ, इ. ) आणि परिणामी मराठी ही केवळ दुय्यम दर्जाच्या विचारविनिमयाचीच धनीण कशी ठरली, हेही त्यांनी उकलून दाखविले आहे. कोल्हटकरांचा भाषाशुद्धिविषयक विचारही असाच चौरस आणि भाषेतील शुद्धता आणि सौंदर्य यांचा समन्वय साधणारा आहे. (अशीच भूमिका हरिभाऊ आपटे, शि. म. परांजपे आणि श्री. के. क्षीरसागर यांनीही घेतलेली आहे. ) मराठी समीक्षा आवश्यक तेवढी स्पष्ट किंवा सडेतोड नसल्यामुळे गडकऱ्यासारख्यांच्या शैलीतील गुणांबरोबर दोषांचेही कौतुक कसे झाले, हेही सांगण्यास ते विसरले नाहीत.

विविध अध्यक्षीय भाषणांतून भाषाशुद्धीप्रमाणेच विवाद्य ठरलेले नवसाहित्य आणि अश्लीलता हे विषयही वारंवार चर्चिले जातात. यशवन्त, श्री. के. क्षीरसागर, अनिल, रा. श्री. जोग, घाटे, चापेकर, औंधकर, ग. दि. माडगूळकर प्रभृतींच्या अध्यक्षीय भाषणांतून नवसाहित्यविषयक विचार डोकावतात. यांपैकी वि. द. घाटे आणि पंतप्रतिनिधी औंधकर वगळता, इतर साऱ्यांनी नवसाहित्याला कमी-अधिक प्रमाणात नाकेच मुरडली आहेत. श्री. विठ्ठलराव घाटे यांच्यासारख्या जुन्या खानदानाच्या चहात्याने नवसाहित्याला उचलून धरावे, हे कौतुकास्पद आहेच, पण याहीपेक्षा या बाबतीत कौतुक करावेसे वाटते ते औंधच्या संस्थानाधिपतींचे. औंधकर यांच्या अध्यक्षीय भाषणात इतर बरेच अप्रस्तुत विषय आलेले असले तरी वरील कारणासाठी आणि अश्लीलतेचा बाऊ न करण्याबद्दल त्यांनी दिलेल्या इषाऱ्यासाठी त्यांचे अध्यक्षीय भाषण उल्लेखनीय ठरते. साहित्याबरोबरच मराठी भाषिकांनी चित्र, शिल्प, संगीत इत्यादी विषयांचा व्यासंग वाढवावा, असे जे त्यांनी प्रतिपादिले आहे, तेही संमेलनाध्यक्षीय भाषणपरंपरेत अपवादाने उठून दिसणारे. औंधकरांचे हे भाषण अपेक्षाभंगाचा सुखद धक्का देऊन जाते.

असा सुखद धक्का देणारी अध्यक्षीय भाषणे फारच कमी आढळतात. याच्या उलट स्थिती असलेली भाषणे त्या मानाने बरीच आहेत. ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, ग. त्र्यं. माडखोलकर, प्र. के. अत्रे यांसारख्या एके काळच्या लोकप्रिय लेखकांची भाषणे-खांडेकरांचा काहीसा अपवाद वगळता—त्यांच्या कीर्तीला साजेशी वटलेली नाहीत. माडखोलकर हे बेळगावच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष असल्यामुळे त्यांच्या भाषणात साहित्यापेक्षा सीमाविषयक राजकारणाला प्राधान्य मिळाले आहे, असे एक वेळ म्हणता येईल; भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाच्या पार्श्वभूमीवर काणेकरांना भाषण करावे लागल्यामुळे किंवा प्रियोळकरांना कारवारला कोकणी—मराठीवादाच्या अनुषंगाने भाषण द्यावे लागल्यामुळे विशिष्ट मुद्द्यांनाच त्यांच्या भाषणात स्थान मिळाले आहे, असेही सांगता येईल. परंतु असे

कोणतेही सबळ कारण नसताना प्रा. फडके यांच्यासारख्या कलावादी लेखकाने आपल्या भाषणाचा सारा मोर्चा केवळ वृत्तपत्रीय अभिरुचीकडे का वळवावा हे समजत नाही; आचार्य अत्रे यांचे भाषण विविध विषयांना स्पर्श करते पण फार ठोकळपणे. शि. म. परांजपे यांचे भाषणही त्यांच्या नेहमीच्या कीर्तीला साजेसे नाही. निकडीच्या प्रासंगिक समस्या आणि साहित्यचिंतन यांचा मेळ कुसुमाग्रजांच्या मडगाव येथील भाषणात मात्र आढळतो. कुसुमाग्रजांचे हे भाषण महाराष्ट्र-गोमंतक विलीनीकरण प्रश्नाच्या ऐन धुमश्चक्रीत झाले. परंतु त्यांनी वादविषयाकडे दुर्लक्ष न करताही काही साहित्यविषयक प्रश्नांची चर्चा समतोलपणे आणि साक्षेपी रसिकतेने केलेली दिसते. विशेषतः कलाजीवन-वादाचा त्यांनी घेतलेला परामर्श या दृष्टीने महत्त्वाचा वाटतो. कुसुमावती देशपांडे यांच्या भाषणातही हा साक्षेप अवतरला आहे. विविध सांस्कृतिक समस्यांचा वेध घेत घेत त्यांचे भाषण अभिजात कलाकृतीच्या सौंदर्यरहस्याकडे वळते. कुसुमाग्रजांप्रमाणे कुसुमावतींच्या भाषणातही कला-जीवनवादाचा समतोल साधण्याचा प्रयत्न आहे. हे भाषण तुलनेने अधिक अंतर्मुख करते.

वा. ल. कुलकर्णी आणि पु. ल. देशपांडे यांच्या भाषणातूनही वरीलप्रमाणेच उत्फुल्ल रसिकतेचा आणि अभिज्ञ ऋजुतेचा प्रत्यय येतो. वा. लं. चे भाषण त्यांच्या नेहमीच्या विशिष्ट समीक्षावृत्तीतून स्फुरलेले असून ते अलीकडच्या काळात निर्माण झालेल्या साहित्य-विषयक विविध समस्यांना मर्मज्ञपणे स्पर्श करते. पु. लं.च्या भाषणात मराठी साहित्य आणि संस्कृती यांचे मनमोकळे संकीर्तन-त्यांच्या भाषेत 'प्रवासवर्णन'-आढळते आत्म-चिंतनाचा परिपाक देण्याच्या दृष्टीने पु. शि. रेगे आणि दुर्गा भागवत यांची भाषणे अतिशय वेगळी वाटतात. या दोन्ही महत्त्वाच्या भाषणांकडे या ना त्या कारणाने दुर्लक्षच झाले आहे. दुर्गाबाईंच्या अध्यक्षतेखाली भरलेले कऱ्हाडचे साहित्यसंमेलन खूप गाजले. पण या संमेलनातील अवांतर घटनांमुळे दुर्गाबाईंच्या अध्यक्षीय भाषणातील तात्त्विक भाग दुर्लक्षित राहिला आणि रेगे यांच्या अध्यक्षतेखाली वर्धा येथे भरलेले संमेलन मुळीच न गाजल्यामुळे कदाचित असेल, पण रेगे यांचे भाषणही उपेक्षितच राहिले. रेगे यांचे व्यक्तित्वही गाजा-वाजा टाळणारेच होते; त्यांचे हे भाषण त्यांच्या नेहमीच्या लेखनशैलीप्रमाणे मितस्थपणे खूप काही सुचवीत जाते. या भाषणाचा प्रारंभ आणि शेवट एखाद्या पारंपरिक पोथीप्रमाणे सद्गुरूच्या ओवीबद्ध स्तवनाने झालेला आहे. लंपट ओले वस्त्र होऊन स्त्रीलावण्यातील रिमझिमणारी किंवा किलबिलणारी स्मितरेषा मिष्किलपणे पकडणाऱ्या या कवीचे हे सद्गुरु-स्तवन वाचकाला एक प्रकारचा धक्काच देते. या नवकवीचा हा काही 'स्टंट' तर नाही ना, अशीही शंका येते; पण रेगेंच्या प्रकृतीतील आणि लेखनातील 'अध्यात्म' ज्यांच्या परि-चयाचे आहे; त्यांना असा आणि एवढा धक्का बसणार नाही. रेगे यांचे हे भाषण एकप्रकारे साहित्यातील 'अध्यात्म' नव्याने मांडणारे आहे; रेगे यांनी या भाषणातून चांगल्या साहित्यनिर्मितीचे मर्म सांगताना, या निर्मितीने जीवनाच्या मूळ धारणेला भिडण्याची

आवश्यकता प्रतिपादिली आहे; लेखकाचे संवेदन सर्वस्पर्शी झाल्याशिवाय ही किमया घडत नसल्यामुळे आत्माविष्कारातही आत्मविसर्जनाचा भाग कसा येतो; 'स्व'ला असून नस-ल्याच्या आणि नसून असल्याच्या पातळीवर कसे विहरावे लागते, हे विशद केले आहे. साहित्यनिर्माता आणि आस्वादक या दोघांनाही हे भाषण बरेच काही खाद्य पुरविते. आजच्या साहित्यविचाराला वेगळ्या दिशेने मार्गदर्शन करते.

दुर्गाबाईंच्या भाषणात रेगेंच्या भाषणातील आत्मसंवेद्य गूढता नाही, उलट ते करडे, ठाम आणि रोखठोक वाटते. वस्तुतः साहित्याचा कस आणि सौंदर्य वाढविण्यासाठी लेख-काच्या आत्मनिष्ठेचे कोणत्या द्रवात रूपांतर झाले पाहिजे, याबद्दलची उभयतांची भूमिका तशी मूलतः एकच आहे. लेखकाला आवश्यक असलेल्या तरल तपश्चर्येचा विचार रेगे यांच्या भाषणात येतो, तर दुर्गाबाई लेखकाला आवश्यक असलेल्या उग्रकठोर साधनेची बाजू आपल्यासमोर मांडतात. दुर्गाबाईंच्या भाषणाचा प्रारंभ इतिहासाचार्य राजवाडे यांच्या अभिवादनाने झालेला आहे. रेगे प्रामुख्याने ललितनिर्मितीच्या अनुषंगाने आपले चिंतन विस्तारतात, तर दुर्गाबाईंच्या भाषणात ज्ञानोपासना आणि सौंदर्योपासना या दोहोंचाही विचार सारख्याच प्रमाणात आहे. आजच्या साहित्यातून प्रकट होणाऱ्या निराशा, उद्वेग, एकाकीपणा, शोकसंकुलता इत्यादी घटकांचा मूलात्म वेधही दुर्गाबाईंनी आपल्या भाषणातून घेतलेला आहे. सत्त्वोपासनेचा धीरोदात्त आदेश देणाऱ्या दुर्गाबाईंच्या मूळ तात्त्विक विचारांना विशिष्ट राजकीय वातावरणामुळे एक वेगळीच तेजस्वी धार चढली. त्या धार-दारपणाचा प्रभाव नंतरच्या साहित्यसंमेलनावरही पडलेला आहे. साहित्य आणि राजकारण, लेखक आणि त्याच्या निष्ठा, साहित्यिक आणि समाज यांचे संबंध या अनुषंगांने नव्याने ढवळून निघाले. साहित्यसंमेलनांची यापुढील दिशा कोणती असावी, हा प्रश्नही या निमित्ताने समोर ठाकला आहे. साहित्यसंमेलनाच्या शताब्दीच्या निमित्ताने का होईना, पण या प्रश्नाचा अंतर्मुख होऊन विचार केला गेला पाहिजे. संमेलनाच्या शतकापूर्वीच्या स्थाप-नेच्या वेळी जी उद्दिष्टे होती तीच आजही कायमच आहेत. मात्र परिस्थितीच्या बदलामुळे त्यांच्या परिपूर्तीची दिशाही काही प्रमाणात का होईना, बदलणे आवश्यक झाले आहे.

दीर्घकाळ चालत आलेले संमेलनाचे प्रचलित उत्सवी स्वरूप पुढे तसेच चालू ठेवावे की, कार्यसुकरतेच्या दृष्टीने यात काही बदल करावा, हा प्रश्न अलीकडे पुनःपुन्हा उपस्थित होत राहिला आहे; या प्रश्नाला अनुकूल आणि प्रतिकूल अशी अंगे असल्यामुळे या प्रश्नाची नीट तड अद्यापि लागत नाही. एक गोष्ट मात्र सर्वांनाच निश्चितपणे खटकू लागली आहे ती म्हणजे या संमेलनाचे निष्क्रीय, रंजनात्मक वाढते स्वरूप. त्याचे शंभुमेळ्यात होऊ पाह-णारे रूपांतर. ठिकठिकाणच्या साहित्यप्रेमी व्यक्तींना बहुसंख्येने एकत्र येण्याची दुर्मिळ संधी, या संमेलनाच्या निमित्ताने मिळते, हे मान्य केले तरी त्याचे आजचे अवडंबरात्मक स्वरूप दूर करून त्यात नवा प्राण ओतण्याची निकड डावलता येत नाही. आज ही सारी यंत्रणाच उपचारबद्ध आणि वरीचशी आत्मतुष्ट झाली आहे. संमेलनाचा अध्यक्ष मोठ्या उत्साहाने

निवडला जातो खरा, पण या संमेलनाध्यक्षाची या संमेलनापासून त्या संमेलनापर्यंत नेमकी कार्ये कोणती; त्याचे अधिकार काय याचा कोणी, खुद्द संमेलनाध्यक्षही विचार करीत नाही. संमेलनात त्याच्या अध्यक्षतेखाली काही महत्त्वाचे ठराव मंजूर होतात; पण या केलेल्या ठरावांची अंमलबजावणीची नेमकी तरतूद काहीच नसते. या साऱ्यांचा विधायक पद्धतीने यापुढे विचार व्हावयास पाहिजे.

स्वातंत्र्यपूर्व काळातील संमेलनांची उद्दिष्टे प्रामुख्याने ठिकठिकाणी विखुरलेल्या मराठी भाषिकांना एकत्र आणणे, भाषादृष्ट्या जागृत करणे, या जागृतीच्या द्वारा राज्यकर्त्यांवर दडपण आणणे ही होती. या प्राथमिक किमान उद्दिष्टांच्या पुढचा टप्पा आता विचारात घेतला गेला पाहिजे. आता स्वकीयांचे राज्य आले असले तरी संमेलनाच्या द्वारा राज्यकर्त्यांवर नैतिक वचक ठेवण्याची गरज संपलेली नाही. केवळ वचकच नव्हे तर शासन आणि विविध साहित्यसंस्था, साहित्यसंस्कृतिमंडळे या साऱ्यांच्या साहित्यविषयक उपक्रमात संमेलनाद्वारा एकसूत्रता आणणेही अगत्याचे आहे. प्रादेशिक विद्यापीठांची संमेलनाने केलेली मागणी प्रत्यक्षात येऊन आता दीर्घकाळ लोटला आहे; ही विद्यापीठे मराठी भाषा आणि संस्कृती यांच्या अभ्यासासाठी आज काय करीत आहेत; याची पाहणी करणे; त्या कामाच्या बाबतीत विचार करणे; त्यातील त्रुटी भरून काढणे; निदान तात्त्विक पातळीवरील विचारमंथनाला प्रारंभ करणे; या संमेलनाला शक्य आहे. मराठी भाषा व संस्कृती या संबंधीचे काही ना काही काम विद्यापीठातून चालूच असते. पण त्यात सांप्रदायिकतेचा किंवा चर्वितचर्वणाचा भाग फार असतो; शक्तीचा हा अपव्यय टाळण्याचे काम संमेलनासारख्या प्रातिनिधिक संघटनेला करणे अशक्य नाही. साहित्यसंमेलनाच्या कार्यातही पुष्कळदा पुनरुक्ती आढळते. उदाहरणार्थ, या घटकसंस्थांनी चालविलेली नियतकालिके एकाच प्रकारच्या साहित्यावर ठराविक पद्धतीने भर देतात, त्याच त्या प्रकारचा मजकूर त्यातून येतो. याऐवजी यानिमित्त खर्च होणाऱ्या साधनसामग्रीचा अधिक पद्धतशीरपणे विनियोग करणे शक्य होणार नाही काय ?

आंध्र प्रदेशीय मराठी साहित्य परिषदेने आपल्या मुखपत्रिकेच्या द्वारा उर्दू आणि तेलगू साहित्याचा परिचय करून देण्याचा जो उपक्रम सुरू केलेला आहे, तो या दृष्टीने लक्षणीय वाटतो. असे वेगळे महत्त्वाचे आणि परस्परपूरक विविध उपक्रम घटकसंस्थांना किंवा त्यांच्या शाखांना करता येण्यासारखे आहेत. आंतरभारतीची काहीशी मागे पडलेली चळवळ पुन्हा हाती घेता येईल. टिकठिकाणची साहित्यसाधने संकलित करण्याच्या दृष्टीने छात्रसेना निर्माण करण्याची कल्पना एका पूर्वीच्या साहित्य संमेलनात निघाली होती. संमेलनाला तिचा पाठपुरावा करण्यासारखा आहे; पूर्वीच्या मानाने आता छात्रसंख्याही वाढलेली आहे. खेड्यापाड्यांतून शैक्षणिक संस्था निघालेल्या आहेत. या संस्थांशी या छात्रसेनेद्वारा संपर्क ठेवणे शक्य व्हावे. प्रादेशिक संमेलनांचा उपक्रमालाही आज शैथिल्य आलेले आहे. या संमेलनांद्वारा किंवा स्थानिक शाखा निर्माण करून साहित्यविषयक

अभिसत्ता वाढविण्याचा विचार झाला पाहिजे. साक्षरतेच्या प्रसारामुळे ग्रामीण किंवा दलित स्तरात जो एक नवा लेखकवर्ग जन्माला आलेला आहे, त्याच्याही अनेक समस्या आहेत. या लेखकांना योग्य ते उत्तेजन देणे, त्यांचे गाणे मुके न होता ते संस्कारसुंदर कसे होईल हे पाहणे ही आजची एक महत्त्वाची गरज आहे. गेल्या दहावीस वर्षांत मराठी साहित्याचा चेहरामोहरा खूपच बदललेला आहे. त्यात अनेक अपरिचित प्रवाह येऊ लागलेले आहेत. त्यांचा योग्य उमज सर्वसामान्य वाचकाला पडत नाही; तो गोंधळतो. साहित्यातील या नव-प्रवाहांची दखल नीटपणे कशी घेता येईल हेही साहित्य संमेलनाने पाहिले पाहिजे, कारण या प्रकारच्या संघटनेद्वारेच या बाबतीत काही योजना आखणे शक्य होणार आहे. साहित्याच्या बाबतीत संमेलनाला किंवा कोणालाच आदेशात्मक भूमिका घेता येत नाही; हे अश्लीलता-निर्मूलनाचे जे प्रयत्न साहित्यसंमेलनाने केले त्यावरून सिद्ध झालेलेच आहे. सक्तीपेक्षा येथे स्वेच्छ सहकार्याचीच मात्रा अधिक परिणामकारक ठरणारी, कारण साहित्य-निर्मिती किंवा तिचा आस्वाद यांचा उगम आत्मानंदात आहे.

वरील सारखी कार्ये पार पाडण्यास द्रव्यबलाची आवश्यकता आहेच, पण त्याहीपेक्षा गरज आहे, ती तळमळीच्या कार्यकर्त्यांची. साहित्याविषयीचे किंवा संस्कृतीविषयीचे नितांत निर्मळ प्रेम हेच या कार्याचे प्रमुख आणि खरे भांडवल. प्रत्येक सुसंस्कृत व्यक्तीत कमी अधिक प्रमाणात साहित्यप्रेम असते. ते जागृत आणि संघटित केले पाहिजे. महाराष्ट्रात आजपर्यंत निष्ठावान त्यागी कार्यकर्त्यांच्या बळावर सांस्कृतिक संस्था उभ्या केल्याचे अनेक दाखले आहेत. पूर्वीच्या मानाने आज उपजीविकावाद अधिक बोकाळला आहे, हे नाकबूल करता येत नाही. तथापि याही परिस्थितीत केवळ कलाप्रेमापोटी धडपडणाऱ्या व्यक्ती नाट्य-संगीतासारख्या क्षेत्रांत आज दिसतात. पदरमोड करून चालविली जाणारी काही मराठी नियतकालिकेही हेच दर्शवितात. परंपरा नसलेल्या अनोख्या व्यक्तींना जे थोडेफार साधते ते शंभर वर्षांची परंपरा असलेल्या सुप्रतिष्ठित साहित्यसंस्थेला का साधता येऊ नये ? प्रतिकूल परिस्थितीतही चिकाटीने आणि निष्ठेने कार्य करीत राहण्याची जिद्द या संमेलनाच्या संस्थापकांजवळ होती; त्यांचे स्मरणही या निमित्ताने स्फूर्तिदायक ठरेल.

तसे पाहिल्यास या संमेलनाच्या पहिल्या अधिवेशनाच्या वेळीही परिस्थिती निराशा-जनकच होती. म्हणावा तसा लोकांचा प्रतिसाद नव्हता. कार्यकर्त्यांत काहीशी निराशा पसरलेली होती. अशा वेळी ' संस्था निघून ती लयास गेली तरी तिचा उपयोग आहे, ' असे उद्गार न्या. रानडे यांनी अध्यक्षीय समारोपात काढले होते. सुदैवाने ही संस्था नष्ट तर झाली नाहीच, उलट तिने आज एक शतकाचा प्रवास पूर्ण केला आहे. ही घटनाच अंगभूतपणे, लाख मोलाची आहे.

# १६

## ज्ञानदेवाभ्यासाची एक नवी दिशा

**ग्रंथ-समीक्षक : प्रल्हाद् नरहर जोशी**

ज्ञानेश्वरादी संतांचे व त्यांच्या कार्याचे विलक्षण आकर्षण असलेल्या अभ्यासकांपैकी श्री. वि. त्र्यं. शेटे हे एक मातबर अभ्यासक आहेत. या आकर्षणापोटीच त्यांनी आपल्या आयुष्यात अनेक सार्वजनिक संस्थांचा कारभार सांभाळला व ' ज्ञानेश्वरा 'सारखे त्रैमासिक कित्येक वर्षे समर्थपणाने व साक्षेपाने संपादित केले. याच आकर्षणापोटी त्यांनी संत ज्ञानदेवांच्या चरित्राचे, कार्याचे व तत्त्वज्ञानाचे जे चिंतन केले, ते ' संत ज्ञानदेव : चरित्र, कार्य व तत्त्वज्ञान ' या लक्षणशा ग्रंथात ज्ञानेश्वर भक्तांना उपलब्ध झाले आहे.

ज्ञानेश्वरांच्या सप्तम जन्मशताब्दीच्या निमित्ताने गेल्या चारपाच वर्षांत विपुल प्रमाणात लिहिले गेले; बोलले गेले. परंतु त्यांच्या चरित्रविषयक संशोधनास मात्र फारशी गती मिळालेली नाही. श्री. शेटे यांच्याच प्रेरणेने भा. इ. सं. मंडळातर्फे झालेला एखादा चरित्र-संशोधात्मक परिसंवाद मात्र ' श्रीज्ञानदेव विशेषांका 'च्या रूपाने जिज्ञासूंपुढे उभा आहे. यात श्री. शेटे यांनी ' श्रीज्ञानदेवांच्या चरित्रातील काही समस्यांचा उलगडा ' करण्याचा प्रयत्न केलेला आहे. परंतु त्यांना ही जागा मर्यादित वाटल्यावरून संत ज्ञानदेव: चरित्र व कार्य विस्ताराने सांगण्यासाठी त्यांनी प्रस्तुतचा ग्रंथ सिद्ध केला आहे. ज्ञानदेव–चरित्रातील अनेक गूढ रहस्याच्या घटनांचा उलगडा मनासारखा होईल व नव्याने चरित्र लिहिण्यासाठी काही नवीन सामग्री हाती लागेल अशी परिस्थिती नाही, असे श्री. शेटे नमनातच स्पष्ट करतात. तरी त्यांची जिज्ञासा नवीन व सबळ पुराव्याची प्रतीक्षा करीत संभाव्य तर्कानुसार ज्ञानेश्वरांच्या चरित्राचे व कार्याचे समालोचन करताना दिसते. याचबरोबर सप्तम जन्मशताब्दीच्या निमित्ताने ज्ञानदेवांच्या चरणी आदरांजली वाहाण्याची प्रबळ इच्छा असल्याचेही शेटे भाविकपणाने मान्य करतात. ज्ञानदेवांविषयीचा आदर व भक्तिभाव यांचे दृश्य स्वरूप म्हणजे हे चरित्र होय असे स्वतः लेखकाने म्हटले असले, तरी विचारांना काही नवी दिशा दाखविण्याचे, काही गूढ रहस्ये उलगडण्याचा मार्ग शोधण्याचे कार्य हे चरित्र करीत असल्याचा मात्र प्रत्यय येतो.

शेटे यांनी प्रास्ताविक भागात ज्ञानदेवपूर्वकालीत परिस्थिती धार्मिक व सांस्कृतिक क्षेत्रात कशी होती याचा सुरेख आलेख, राजकीय संदर्भांत काढलेला आहे. हाडाचे विरक्त

असलेले विठ्ठलपंत आपला विचित्र संसार कसा व कोणत्या परिस्थितीत करतात, याचा विचार त्यानंतर शेटे यांनी काहीसा वेगळ्या पद्धतीने केला आहे. या ठिकाणी त्यांचा भर-नामदेवांच्या ' आदि ', ' तीर्थावळि ' व'समाधि' या प्रकरणां'वर नसून तुकाविप्रकृत ज्ञानेश्वर चरित्र व बाळायुवा ज्ञानेश्वरीकृत भक्तितत्त्वामृत या नव्याने ध्यानात आलेल्या साधनांवर आहे. विवाहपूर्व काळात तीर्थयात्रेच्या वेळी आळंदीच्या मुक्कामात व नंतरप्रसंगी विठ्ठल-पंतांचे आईवडील यांची उपस्थिती शेटे यांना या साधनामुळे महत्त्वाची वाटते. विठ्ठल-पंतांना संन्यासदीक्षा देणारे श्रीपादस्वामी तीर्थयात्रा करीत करीत दक्षिणेस आळंदीस आले, तेव्हा त्यांच्याबरोबर चैतन्याश्रम म्हणजे विठ्ठलपंतही होते हे शेटे यांना स्वाभाविक वाटते. संसारी विठ्ठलपंतांच्या मुलांच्या नावांचा आध्यात्मिक शोध घेणे सोपे आहे, पण तेथे शेटे या नावाचा ऐतिहासिक संदर्भ देतात तो महत्त्वाचा आहे. ' अलौकिक दिव्य जीवनाचा साक्षात्कार ' या प्रकरणात पैठण येथील चमत्कारांचा खुलासा करताना शेटे यांना 'अज्ञेय अशी भिन्न मानसिक सृष्टी ' असल्याने मान्य करावे लागते. जगातील सर्वच कोडी बुद्धीला सुटणारी नाहीत असे त्यांना वाटते. ऐतिहासिक चिकित्सा व ही अशी अलौकिक सृष्टी यांत भल्या भल्या संशोधकांना चक्रावल्यासारखे होते. शेटे येथे फक्त आपल्या आंतर्मनाचा व त्याच्या सामर्थ्याच्या सर्वच कक्षांचा शोध अद्यापही लागलेला नाही, असे म्हणून आपली मर्यादा प्रांजळपणाने कबूल करतात. पण त्यामुळे पुढल्याच पानावर आपण या घटनांचा अर्थ रूपकांच्या साह्याने लावला पाहिजे हा त्यांचा आग्रह लटका ठरतो.

ऐतिहासिक शोधबुद्धी व भक्तिभावाची श्रद्धा अशा कात्रीत लेखक सापडल्याची अनेक ठिकाणे या ग्रंथात दिसतील. ' ज्ञानदेवांच्या काळात लोक वैभवाच्या शिखरावर आरूढ झाले होते ' ( पृ. ३८ ), हे त्यांचे विधान तपासून पाहावयास हवे. वैभवाच्या शिखरावर असलेले हे लोक कोणते ? त्यांची संख्या किती ? ' अशा वैभवात व सुखात लोळणाऱ्या जीवांना अध्यात्माची ओढ सहजच लागते ' हे शेटे यांचे विधानही मर्यादित अर्थानेच मानावयास हवे. ज्ञानेश्वर–नामदेवांनी तीर्थयात्रा कोणत्या हेतूने केल्या ? केवळ संतसहवास हे तर आकर्षण मोठेच; पण मोक्षसुखाचा लाभ होतो, म्हणून ज्ञानदेवांनी तीर्थयात्रा केली ही कल्पना शेटे यांना हृद्य वाटते ( पृष्ठ ४६ ), पण या हृद्यतेच्या पोटी यात्रेच्या निमित्ताने जगाचा उद्धार; या एका उदात्त कार्याचे शेटे यांना विस्मरण झाले की काय, असे मनात येऊन जाते.

' संजीवन समाधी ' या ज्ञानदेवांच्या अकाली वाटणाऱ्या समाधीचे काही वेगळे स्पष्टीकरण शेटे देतात. ग्रंथनिर्मितीनंतर ज्ञानदेवांना परतत्त्व जाणून घेण्यासाठी शब्दज्ञान अपुरे वाटू लागले. मौनाची माळ अंतरात जपावी असे त्यांना वाटू लागले. अशी मौन–साधना अखंड करण्यासाठी ज्ञानेश्वरांनी संजीवन समाधी घेतली, असा शेटे यांचा निष्कर्ष आहे. ज्ञानदेव मोक्ष मार्गाची वाटचाल करीत आहेत, एकान्तात अखंड साधना करीत आहेत; हा शेटे यांच्या विचाराचा धागा सर्वांनाच पटेल असा नाही. ' केवळ श्रवणातच मोक्ष असे

आयता, ' असे सांगणारे ज्ञानदेव स्वतःसाठी मोक्ष साधण्याचा वेगळा मार्ग आचरतील का ? ' मोक्ष तळहातावर देईन, ' ' मोक्षाची सोडी–बांधी करीन, ' ' सर्व संसार मोक्षासारखा सुखकर होईल, ' रोकडाचि लाहिजे । न मागता मोक्षु, ' अशी प्रतिज्ञा करणारे ज्ञानदेव अखंड मौन पाळून मोक्षसाधनेत राहातील ' असे अनेक प्रश्न शेटे यांच्या मनात अधिक विचारांती गुंजारव करीत राहातील.

शेटे यांचा हा ग्रंथ वाचताना जसा काही ठिकाणी नवा प्रकाश दिसतो तसे काही ठिकाणी थांबून विचार करावा असेही वाटू लागते, हेच त्यांच्या चिंतनाचे सामर्थ्य म्हणावे लागेल. ' ज्ञानदेवांचे ग्रंथवैभव ' हे या ग्रंथातील एक चांगले प्रकरण असून शेटे यांनी ज्ञानदेवांच्या ग्रंथांचा कल्पिलेला अनुक्रम सर्वांना मान्य होण्यासारखाच आहे. ज्ञानदेवांचे कार्य व व्यक्तिमत्त्व यांचे वर्णन करताना शेटे यांची सर्व सामर्थ्ये ध्यानात येतात. महापुरुषाचे व्यक्तिमत्त्व, असामान्य गुणांचा समुच्चय, सामाजिक जाणीव, सृष्टिसौंदर्याचा वेध इत्यादींच्या संदर्भात शेटे यांनी ज्ञानदेवांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाचे यथार्थ दर्शन घेण्याचा प्रयत्न केला आहे. ज्ञानेश्वर चरित्रातील अनेक रहस्यांचा उलगडा समाधानकारकपणे होणे अतिशय अवघड आहे. पण या भावंडांनी विशिष्ट ठिकाणीच समाधी का घेतली, याचा शेटे यांनी लाविलेला अर्थ विचारांना चालना देणारा नक्की आहे. त्यांनी इतरत्र विस्ताराने सांगितलेला हा विषय या चरित्रग्रंथात का मांडला नाही ?

ज्ञानदेवांच्या चरित्राचा व कार्याचा साक्षेपी शोध घेताना शेटे यांनी खूपच परिश्रम घेतले आहेत; चिंतन केले आहे. ग्रंथाच्या नावात ' तत्त्वज्ञान ' हा शब्द असताना फक्त पाचसहाच पानांत हा महत्त्वाचा विषय शेटे यांनी आवरता का घेतला, हे समजत नाही. ग्रंथातील मुद्रणाचे दोष लेखकाने वा प्रकाशकाने जाणत्या मुद्रितशोधकाकडून दूर करणे अगत्याचे होते. औचित्य, सौजन्य, प्रांजलपणा या गुणांचा आविष्कार लेखकाच्या मनोवृत्तीत आहे त्याचे दर्शन ग्रंथात दिसते. पण या गुणांना विसंगत पडेल अशी अनौचित्यपूर्ण भाषा प्रकाशक आपल्या निवेदनात का वापरतात ? अशा काही किरकोळ उणिवा ध्यानात येत असल्या तरी एक प्रसन्न व विचारप्रवर्तक चरित्र वाचल्याचे समाधान येथे मिळते, हेही तितकेच खरे आहे. आपला ग्रंथलेखनाचा पहिलाच प्रयत्न आहे असे शेटे विनयाने म्हणतात. परंतु पहिल्याच प्रयत्नावरून असे वाटते की, यांनी आपल्या सार्वजनिक आयुष्यातील धावपळीतही जे चिंतन केले त्याला शब्दरूप त्यांनी जरूर द्यावे. वैयक्तिक सुखासाठी मौन अपरिहार्य आहे असे शेटे मानीत असले तरी समष्टीरूपाने नटलेल्या परमेश्वराची पूजा शद्ब फुलांनीच करायची असते हे शेटे यांनाही मान्य असावे !

**संत ज्ञानदेव : चरित्र, कार्य व तत्त्वज्ञान**

लेखक : वि. त्र्यं. शेटे, ज्ञानेश्वर विद्यापीठ प्रकाशन,
देवाची आळंदी, जिल्हा पुणे, पृष्ठे क्राऊन १५६,
**मूल्य दहा रुपये.**

अनुक्रमणिका

# प्रा. रा. श्री. जोग स्मारक-समिती, पुणे.

प्रा. जोग स्मारक समितीच्या वतीने साहित्य–समीक्षेच्या क्षेत्रातील सर्वोत्तम मराठी ग्रंथाला जे किमान दोन हजार रुपयांचे पारितोषिक प्रतिवर्षी दिले जाईल, त्यासंबंधी पुढील मार्गदर्शक तत्त्वे स्वीकारलेली आहेत:

( १ ) साहित्य-समीक्षा म्हणजे काव्यनाटकादी कोणत्याही प्रकारच्या ललित वाङ्मयाची समीक्षा होय. पारितोषिकार्ह ग्रंथात विशिष्ट साहित्याची समीक्षा चालेल किंवा साहित्य-समीक्षेचा तात्त्विक विचारही चालेल.

( २ ) एखाद्या वर्षी उत्तम समीक्षाग्रंथ न आढळल्यास त्या वर्षी पारितोषिक दिले जाऊ नये.

( ३ ) १ जानेवारी ते ३१ डिसेंबर अशी वर्षमर्यादा पारितोषिकासाठी असावी; आणि वर्ष संपल्यावर लगतच्या २१ फेब्रुवारीला, म्हणजे प्रा. जोगांच्या स्मृतिदिनाला, पारितोषिक घोषित केले जावे.

( ४ ) पारितोषिक वार्षिक असले तरी पारितोषिकासाठी ग्रंथांची निवड करताना दर वेळी आधीच्या दोन वर्षांतील ग्रंथांचा विचार व्हावा.

( ५ ) ग्रंथ प्रकाशित नसला तरी चालेल. मात्र अप्रकाशित ग्रंथ मुद्रणप्रतीच्या स्वरूपात समितीकडे आलेला असावा.

( ६ ) वर्षारंभी वृत्तपत्रांतून–किंवा नियतकालिकांतून–आवाहन करून समितीने पारितोषिकाकडे ग्रंथकारांचे लक्ष वेधावे आणि ग्रंथाची माहिती त्यांच्याकडून मागवावी. समितीकडे पारितोषिकासाठी अर्ज करण्याचे किंवा प्रकाशित ग्रंथ पाठविण्याचे बंधन ग्रंथकारांवर नसावे. मात्र अप्रकाशित ग्रंथांच्या बाबतीत विशिष्ट मुदतीमध्ये ग्रंथांची हस्तलिखित वा टंकलिखित प्रत समितीला सादर करण्याची जबाबदारी ग्रंथकारांवर टाकली जावी.

( ७ ) पारितोषिकार्ह ग्रंथ निवडण्यासाठी कार्यकारी मंडळाने तीन परीक्षकांचे एक स्वतंत्र परीक्षक मंडळ वर्षाच्या सुरुवातीस नियुक्त करावे आणि त्या मंडळाने बहुमताने दिलेला निर्णय ग्राह्य मानावा. या मंडळावर कोणाही व्यक्तीला दोनपेक्षा अधिक वेळा नियुक्त करू नये.

( ८ ) या मंडळातील तीनही सदस्य प्रारंभीची दोन वर्षे कायम राहावेत. तिसऱ्या वर्षापासून एकेक सदस्य प्रतिवर्षी गळावा आणि त्याच्या जागी एक नवा सदस्य कार्यकारी मंडळाने नियुक्त करावा.

( ९ ) प्रत्येक परीक्षकाने आपणांकडे कार्यवाहांकडून आलेले व अन्य मार्गांनी स्वतः मिळविलेले सर्व प्रकाशित व अप्रकाशित ग्रंथ वाचावे आणि तीनही परीक्षकांनी मिळून सर्वोत्तम ग्रंथ कोणता याविषयी सविस्तर, सकारण व तौलनिक असा लेखी अभिप्राय संस्थेकडे द्यावा. परीक्षकांचा हा अभिप्राय वृत्तपत्रांतून किंवा नियतकालिकांतून प्रकाशित होईल अशी व्यवस्था कार्यवाहांनी करावी.

अनुक्रमणिका

(१०) परीक्षणासाठी प्रत्येक परीक्षकाला प्रतिवर्षी किमान तीनशे रुपये मानधन देण्यात यावे.

(११) कार्यकारी मंडळाच्या कोणत्याही सदस्याला परीक्षक-मंडळावर काम करता येणार नाही, असे बंधन असावे.

(१२) परीक्षक मंडळापैकी एका परीक्षकाने मंडळाचे निमंत्रक म्हणून काम पाहावे. पहिली तीन वर्षे निमंत्रक कोण, ते कार्यकारी मंडळाने ठरवून द्यावे आणि चौथ्या वर्षापासून ज्याने लागोपाठ दोन किंवा अधिक वर्षे काम केले असेल अशा परीक्षकाकडे निमंत्रकाचे काम जावे.

**पत्रव्यवहाराचा पत्ता :** श्री. स. कृ. पाध्ये, कार्यवाह, 'प्रा. रा. श्री. जोग स्मारक-समिती,' द्वारा : व्हीनस प्रकाशन, 'तपश्चर्या', ३८१ क, शनिवार पेठ, पुणे, ३०.

## विष्णु सखाराम खांडेकर यांचे ललित वाङ्मय

**कादंबरी :** हृदयाची हाक । कांचनमृग । उल्का । दोन ध्रुव । हिरवा चाफा । दोन मने । रिकामा देव्हारा । सुखाचा शोध । पहिले प्रेम । जळलेला मोहोर । पांढरे ढग । क्रौंचवध । अश्रू । ययाती । अमृतवेल.

**लघुकथा–संग्रह :** नवमल्लिका । दत्तक आणि इतर गोष्टी । जीवनकला । ऊन-पाऊस । दवबिंदू । विद्युत्प्रकाश । नवचंद्रिका । अबोली । सूर्यकमळे । पूजन । समाधी-वरील फुले । पहिली लाट । फुले आणि दगड । घरट्याबाहेर । नवा प्रातःकाळ । कल्चर्ड मोती । पहिल्या वहिल्या । स्त्री आणि पुरुष । अश्रू आणि हास्य । हस्ताचा पाऊस । पाकळ्या । सांजवात । प्रीतीचा शोध । प्रसाद । मुरली । उःशाप । ढगा-आडचं चांदणं.

**रूपककथा–संग्रह :** कलिका । मृगजळातल्या कळ्या । सोनेरी सावल्या । सुवर्णकण ( अनुवादित ) । वेचलेली फुले ( अनुवादित ) । वनदेवता.

**लघुनिबंध–संग्रह :** वायुलहरी । चांदण्यात । सायंकाळ । अविनाश । मंदाकिनी । कल्पकता । मंजिऱ्या । तिसरा प्रहर । मंजघार । झिमझिम.

**नाटक :** रंकाचे राज्य.

**संकीर्ण :** तुरुंगातील पत्रे – भाग १ ते ३ ( अर्न्स्ट टोलरच्या निवडक पत्रांचे भाषांतर )

**चित्रपटकथा :** छाया । ज्वाला । देवता । सुखाचा शोध । अमृत । लग्न पहावं करून । सरकारी पाहुणे । संगम । तुझाच । धर्मपत्नी ( तामीळ ) । माझं बाळ । बडी माँ ( हिंदी ) । सुभद्रा ( हिंदी ) । दानापानी ( हिंदी ) । अंतरीचा दिवा । विश्वामित्र । सोनेरी सावली । माणसाला पंख असतात.

अनुक्रमणिका

# १७

# गोमंतकीय साहित्याचा परिचय

वा. ल. मंजूळ

गोमंतकातील साहित्य व साहित्यिक यांचा परिचय करून देणारे दोन ग्रंथ (१) गोमंतकीय मराठी साहित्याचे शिल्पकार, खंड एक (लेखक श्री. बा. द. सातोस्कर) व (२) गोमंत शारदा (लेखक श्री. रामदास प्रभू) अलीकडेच उपलब्ध झाले आहेत. ' साहित्याचे शिल्पकार ' या तीनशे पानांच्या प्रथम खंडात चारशे वर्षांच्या कालावधीचा (१५२६-१९३०) आढावा घेण्यात आला आहे. गोव्यातील साहित्यिकांच्याविषयी शक्य ती माहिती देणाऱ्या एकुलत्या एक संदर्भ ग्रंथाचे स्वरूप या पुस्तकास आले आहे. एवढे महत्त्व त्यास असूनही छपाई व प्रसिद्धी यासाठी हा ग्रंथ दहा वर्षे पडून राहिला होता. निर्दिष्ट कालातील प्रातिनिधिक नव्हे, पण निवडक व्यक्तींचा परिचय उपलब्ध त्रोटक साधनांच्या द्वारे करून देण्याचा प्रयत्न यामध्ये केला आहे. गोमंतकीय कवि-लेखकांना महाराष्ट्रात प्रेमाचे स्थान आहे. मराठीच्या क्षेत्रात त्यांना चांगलीच मागणी आहे. आणि लोकप्रियताही आहे. यापुढे त्या प्रदेशातील साहित्यिकांविषयी लिहिणाऱ्यांना हा ग्रंथ आधारभूत ठरेल या हेतूने ग्रंथरचना केली आहे. रसिकाग्रणी कै. दयानंदजी बांदोडकर यांची प्रेरणा त्यामागे आहेच.

या ग्रंथात बऱ्याच गोमंतकीय साहित्यिकांचा परिचय होतो. पण एकूण गोमंतकीय साहित्याचा परिचय होत नाही. एवढे मात्र खरे! कारण या कालखंडात समाविष्ट केलेल्या व्यक्ती, गोमंतकीय साहित्यात पुढील पिढीस वारसा देणाऱ्याच केवळ आहेत. आणि त्यांच्याबद्दलही व्यक्तिपरिचयात्मक टिपणेच अधिकपणे यात आहेत. साहित्याचे मूल्यमापन करण्याचा लेखकाचा विचार नाही व तसे त्यांनी आरंभीच सांगून टाकले आहे.

फादर स्टीफन्सचे ' ख्रिस्तपुराण ' हा गोमंतकातील पहिला मराठी ग्रंथ अशी सर्व सामान्यांची आजवरची धारणा आहे पण कृष्णदास शामा तथा सामराजाचे ' कृष्णचरित्र-कथा ' हे एकोणीस अध्यायी काव्य ज्ञात मराठी पहिला ग्रंथ म्हणून लेखकाने दाखवून दिला आहे. सामराजाच्या परिचयाने ग्रंथाची सुरुवात झाली आहे.

महाराष्ट्रात प्रतिभेचे मेरुमणी संत ज्ञानेश्वर हे होत. तसेच त्यांचे गुरू अद्वितीय निवृत्ति-

नाथ हे होत. त्यांच्या लौकिकाचा फायदा घेऊन त्यांच्या नावाने रचना करणारे कोणी निवृत्ती–ज्ञानदेव गोव्यातही झाले. त्यात ह्या ज्ञानदेवांनी वसिष्ठयोग व द्रोणपर्व लिहिले. निवृत्तिदेवांनी गीतेवर टीका लिहिली आहे. या दोघांचा काहीसा त्रोटक असा परिचय लेखकाने करून दिला आहे. तो सविस्तर हवा होता. विष्णुदास नामा हा गोमंतकाचा कवी आहे हे हितगुज विख्यात संशोधक डॉ. पिसुर्लेकर यांनी स्वतःच्या मृत्यूपूर्वी चार दिवस आधी रुग्ण शय्येवर असताना आवर्जून सांगितल्याचे लिहिले आहे. ख्रिस्त पुराणांची गरज सांगून त्या पार्श्वभूमीवर फादर थॉमस स्टीफन्सच्या पुराणाचा अधिक परिचय करून दिला आहे. नायक स्वामीच्या साहित्याचे गोमंतकातील स्थान व सोहिरोबानाथ आंबिये यांची लोकप्रियता वाचताना विलक्षण जाणवते. ' घनश्याम सुंदरा ' ही अमरभूपाळी शाहीर होनाजीबाळाची आहे, याबद्दल सर्व रसिकांत एकमत होते. पण होनाजीबाळा यांच्या आधी गोव्यात होऊन गेलेल्या दुपाठी विठ्ठल केरीकरांच्या मूळच्या भूपाळीचा थोडाफार बदल करून केलेला आविष्कार म्हणजे होनाजीची भूपाळी हे येथे समजल्यावर विस्मय वाटतो, धक्का बसतो. आधारासाठी दोन्ही कवींचा काल व त्यांच्या भूपाळ्या समोर मांडल्या आहेत. होनाजीवरील प्रेमामुळे महाराष्ट्राने हे कटु सत्य अद्याप स्वीकारलेले नाही हे लेखकाने दाखवून दिले आहे. डुकले बंधू, भाऊ दाजी, धर्मानंद कोसांबी, वामनराव वर्दे तथा शणै गोयबाब, डॉ. पांडुरंग पिसुर्लेकर, प्रा. अ. का. प्रियोळकर, पु. मं. लाड इत्यादी पन्नास नामवंत साहित्यिकांचा परिचय या संग्रहात करून दिलेला आहे. परिशिष्टात मागाहून मिळालेली माहिती जोडली आहे. आरंभीचे साहित्यिक लेखकाने कालानुक्रमाने तर पुढील काही लेखनाच्या कालानुसार घेतले आहेत.

संदर्भ–ग्रंथांची दुर्लभता असूनही, प्रयासपूर्वक अभ्यास करून, काही व्यक्तींच्या आठवणींतून सामग्री मिळवून शक्य तेवढी टासून माहिती पुरविण्याचा लेखकाचा प्रयत्न आहे. काही ठिकाणी दंतकथा व आख्यायिका यांचा आधार घेतला आहे. ( हे मात्र अनावश्यक वाटते. ) साहित्यिकाचा परिचय त्यांच्या व्यक्तिमाहात्म्यापेक्षा ग्रंथमीमांसेने अधिक होतो, हे अवधान क्वचित स्थळी निसटलेले आहे. पं. धर्मानंद कोसांबी यांच्यासारखे संशोधक ललित साहित्यिकांच्या यादीत कसे आले, आश्चर्य वाटते. तरीपण एकंदरीत गोमंतकीय लेखक–कवी समजावून घेताना श्री. सातोस्करांच्या ग्रंथाचे साहाय्य घेणे अत्यावश्यक ठरणार आहे.

' गोमंत–शारदा ' या आपल्या ग्रंथात श्री. रामदास प्रभू यांनी पावणे दोनशे पानांच्या मर्यादेत गोमंतकातील मराठी कविता ( १५२६ ते १९६५ या कालखंडातील ) विवेचिली आहे व तिची संहिता दिली आहे. गोमंतक साहित्य सेवक मंडळाचे प्रकाशन, कवी बा. भ. बोरकरांची छोटीशी प्रस्तावना व स्वतः लेखकाने या कालखंडातील कवितेचा घेतलेला त्रोटक आढावा ह्या महत्त्वाच्या गोष्टी ग्रंथ हाती घेताच लक्षात येतात.

लेखकाने सोईसाठी या मोठ्या कालखंडाचे तीन भाग केले आहेत. इ. स. १५२६ ते

१८८५, इ. स. १८८५ ते १९२० व इ. स. १९२० ते १९६५ असे त्याचे स्वरूप आहे. या तीन कालखंडांतून हे गोमंतकीय सारस्वताचे लेणे विभागले गेले आहे. हे तीन कालखंड केवळ सोईसाठी पाडलेले विभाग नसून गोमंतकीय काव्याचा हा क्रमशः होत गेलेला विकासच कालखंडानुसार मांडला आहे. आरंभीची कविता धार्मिक व कथात्मक स्वरूपात व संत–पंतांच्या ओवीबद्ध–आख्यान काव्यात होती. दुसऱ्या कालखंडाची कविता देशहितपर व सामाजिक विषयांच्या स्वरूपात होती. तिसऱ्या कालखंडाची कविता १९२० नंतर अधिक आत्माविष्काराच्या स्वरूपात पुढे आली. कवितेच्या आशयाचा क्रमशः जसा विकास होत गेला, तसाच मात्रावृत्ते, छंद, इत्यादी आविष्कार-स्वरूपातही विकास–बदल झाला. १९३० ला मडगाव येथे मराठी साहित्य संमेलन भरले होते, त्या वेळी गोव्यातील साहित्य निर्मितीला बहर आला होता, असे लेखकांनी म्हटले आहे. या संग्रहातील तीन कालखंडांतून एकूण बेचाळीस कवींची काव्ये दिली आहेत. पण कवींचे काव्यकर्तृत्व जाणून घेण्यास ती फारच अपुरी वाटतात.

गोमंतकीय काव्याचे समीक्षण करताना टीकाकारांकडून आजवर बराच अन्याय झाला आहे. बाहेरच्या समीक्षकांना येथील परंपरा माहीत नाही व जाणून घेण्याचा प्रयत्नही त्यांनी केला नाही, असा आरोप लेखकाने केला आहे. गोमंतकीय काव्याचे समीक्षण करताना येथील परंपरा, परकीय राजवटीचे परिणाम व वेगळ्या पण समृद्ध निसर्गाचे सान्निध्य या सर्वांची जाण ठेवून परीक्षण व्हावे अशी अपेक्षा लेखकाने व्यक्त केली आहे.

पहिल्या कालखंडात कृष्णदास शामा (सामराज), फादर स्टीफन्स, रघुनाथ, सोहिरोबानाथ आंबिये, विठ्ठल केरीकर, कृष्ण जगन्नाथ बांदकर, गोकुळाबाई तळावलीकर, सीताबाई कुडईकर प्रभृति वीसजणांचा समावेश आहे.

दुसऱ्या विभागात रा. पां. वैद्य, पणशीकर, नायक करंडे, भांडार, भि. मु. देशपांडे आदी आठ जणांचा समावेश आहे. तिसऱ्यामध्ये मात्र य. सू. सरदेसाई, वि. का. प्रियोळकर, वि. स. सुखठणकर, पु. मं. लाड, बा. भ. बोरकर, दा. अ. कारे, र. वि. पंडित, शंकर रामाणी, गजानन रायकर इत्यादी चौदा कवींचा समावेश आहे.

वेच्यांच्या संग्रहांचा, त्यांतील काव्याचा आस्वाद घेणे सुखावह होते. कारण त्यामध्ये पानापानाला बदलती रुची असते. पण त्या संग्रहाचा समीक्षात्मक अभ्यास करणे अपुऱ्या सामग्रीमुळे सहज सुलभ होत नाही. तथापि कविवर्य बोरकरांनी म्हटल्याप्रमाणे याहून अधिक चोखंदळ व सुश्लिष्ट काव्यसंग्रह पुढे येत राहतील अशी अपेक्षा करण्यास हरकत नाही; व ती अपेक्षा रामदास प्रभू फलद्रूप करतील असे वाटते.

## १८

# मराठी कादंबरी आणि उपेक्षितांचे जीवनचित्रण

लक्ष्मण रामदास नसिराबादकर

साहित्य आणि जीवन यांच्या संबंधातील अन्योन्यता हा बहुतांशी सर्वसामान्य विचार म्हणावयास हरकत नाही. ज्या समाजात साहित्यिक अथवा कलावंत राहतो, त्या समाजाचे, संस्कृतीचे, त्या समाजातील विचारप्रवाहाचे आणि प्रवृत्तींचे संस्कार त्यांच्या मनावर घडत असतात. माणूस हा साहित्याचा प्रधान आणि चिरंतन असा विषय आहे. जीवनाच्या विविध प्रसंगांतून आणि अनुभवांतून त्याच्या अंतरंगाचे दर्शन घडविणे हे ललित वाङ्मयाचे प्रमुख ध्येय आहे. विविध व्यक्ती, त्यांच्या प्रवृत्ती, त्यांचे वागणे, बोलणे, जगणे, त्यांच्या विविध उक्ती आणि कृती, विकृती आणि विसंगती यांमधून तो व्यक्तिमानसाची संगती लावून दाखवीत असतो. त्यामधून आपल्याला गवसलेला जीवनाचा अर्थ तो सांगतो. कोणताही कलावंत हा आपल्या युगाचा प्रतिनिधी असतो. आपल्या भोवतालच्या समाजातील विविध वर्ग, त्यातील व्यक्तींचे प्रेम, विवाह, संघर्ष यांचे चित्र त्याच्या कलाकृतीचा विषय बनणे स्वाभाविक आहे. इतकेच नव्हे, तर मानवी जीवनातील सामाजिक संबंध कसे असावेत, याविषयीची जाणीवही तो करून देत असतो.[१]

आमच्या वाङ्मयनिर्मितीकारांनी केवळ अलिप्तपणा न स्वीकारता भोवतालच्या समाजात जे काही घडते, जे नवे विचारप्रवाह जन्माला येतात, विविध स्थित्यंतरामुळे समाजात जे नवे रूप प्रत्ययास येते त्याचे चित्रण करावयास हवे, अशी अपेक्षा आजवर अनेक टीकाकारांनी व्यक्त केलेली आढळते.[२] काही साहित्य संमेलनांच्या अध्यक्षपदांवरूनही ही अपेक्षा व्यक्त झाली आहे.[३,४,५,६] बदलत्या समाजरचनेतून उदयाला आलेल्या नव्या वाचकवर्गातही ही अपेक्षा दिसून येते.

### ' उपेक्षित '

आजच्या समाजात श्रीमंत, उच्चभ्रू, पांढरपेशे, दरिद्री, सुशिक्षित, अशिक्षित, नागर–ग्रामीण, स्पृश्य–अस्पृश्य अशा अनेकविध वर्गांचा आणि जातींचा मेळावा आढळतो. यांतील श्रीमंत, उच्चभ्रूंचा वर्ग म्हणजे मूठभर लोकांचा वर्ग. हा वर्ग स्वतःला इतरांपेक्षा

नेहमीच वेगळा मानत आला आहे. समाजातील इतरांच्या संपर्कापासून दूर राहिला आहे. मध्यमवर्गीय पांढरपेशेही आपल्या तथाकथित विशिष्ट संस्कृतीला जपत आलेले दिसतात. खरे उच्चभ्रू आणि पांढरपेशा हा तसा फार थोड्या लोकांचा वर्ग. उरलेला समाज फार मोठा आहे. त्यात अस्पृश्य, आदिवासी, भटक्या जमाती, गरीब शेतमजूर, कामगार, झोपडपट्टीवाले, वारांगना, गुन्हेगार, कुष्ठरोगी, अपंग अशी लाखो माणसे आहेत. विशेष हे की हा समाज उपरोक्त उच्चभ्रू, पांढरपेशा यांच्याकडून नेहमीच उपेक्षिला गेला आहे. जातिव्यवस्थेने अस्पृश्यांना हीन लेखले. आर्थिक दृष्टिकोणातून मजूर आणि कामगार निम्नस्तरीय मानले गेले. नागरजीवनात आदिवासींना आजही स्थान नाही. भटक्या जमातीची सोय जेथे सरकारकडूनच अजून लागायची आहे तेथे समाजात त्यांचे काय स्थान असणार ? वारांगनांच्या आणि गुन्हेगारांच्या बाबतीत आजही आमची भूमिका तिरस्काराचीच आढळते. कुष्ठरोगाविषयीची घृणा नेणत्या तर सोडाच, पण जाणत्यांच्याही ठिकाणी नाही, असे म्हणता येणे कठीण आहे. जगाच्या पाठीवर कुष्ठरोग्यांची सर्वाधिक संख्या आशिया आणि यूरोप या दोन खंडांत असून त्यांपैकी निम्मे कुष्ठरोगी एकट्या भारतात आहेत. यंत्रयुगाने निर्माण केलेली बेकारी ही तर राष्ट्रापुढील आजची मोठी समस्या आहे. यंत्रयुगाचा आणखी एक अपरिहार्य परिणाम म्हणजे झोपडपट्ट्यांची वाढती वस्ती. या झोपडपट्ट्यांनी प्रत्येक शहरात हीन आणि गलिच्छ अशी नवी संस्कृती आणून पोचविली आहे. हे चित्र पाहून एकदा पं. नेहरू उद्वेगाने म्हणाले होते, ' बस्ती जला दो ! ' या सर्व झोपडपट्ट्या जाळायच्या म्हटल्या तर एक चतुर्थांश हिंदुस्थानाला आग लावावी लागेल अशी स्थिती आहे. अस्पृश्य, आदिवासी, कामगार, गरीब शेतमजूर, भटक्या जमाती, झोपडपट्टीवाले, वारांगना, कुष्ठरोगी, अपंग ही सारी माणसेच आहेत; आणि अशी खंडीभर माणसे असलेला हा खरा आणि मोठा समाज आहे. पण दुर्दैवाने तो जातीयता, नागर-अनागर, शिक्षण, संस्कृती, प्रतिष्ठा यांच्या विकृत कल्पनांमुळे, या ना त्या निमित्ताने उच्चभ्रू आणि पांढरपेशे यांच्याकडूनच उपेक्षिला गेला आहे.

## हे जीवनही साहित्यविषय बनावे

या सर्वांची नोंद वाङ्मयात अगदी काटेकोरपणाने झालीच पाहिजे, असा आग्रह नाही. ते शक्यही नाही. पण उच्चभ्रू-पांढरपेशांप्रमाणेच या माणसांच्याही जीवनात संघर्ष आहेत. त्यांच्याही मनात संतापाचे कढ आहेत. त्यांचे जीवन म्हणजे कष्ट, अज्ञान, दारिद्र्य, वासना, मुर्दाडपणा, बीभत्सता, कल्मशपणा अशा अनेक सर्गांचे महाकाव्य आहे. जगणे हीच मुळी त्यांची समस्या आहे. मग प्रतिष्ठित जिण्याची गोष्ट दूरच. अशा आंदोलनात त्यांच्या मनात केवढा आगडोंब उसळत असेल ! मन हलवणारे, त्याचा कोपरान् कोपरा उजळून टाकणारे केवढे तरी नाट्य त्यात आहे. ते टिपले जावे. साहित्यिकाने आपल्या अनुभूतीच्या कक्षा रुंदावून या नव्या जीवनाला सामोरे जावे. आजवर दुर्लक्षित झालेले, या ना त्या कारणाने

अव्हेरले गेलेले हे जीवन आणि ही माणसे साहित्यविषय बनावीत अशी अपेक्षा करणे चुकीचे ठरू नये.

समाजातील या उपेक्षितांचे जीवनदर्शन मराठी साहित्यात कितपत घडले आहे? त्यांच्या समस्यांची, व्यथांची कितपत दखल साहित्यिकांकडून घेतली गेली आहे? ही दखल घेण्यामागील भूमिका कोणती? केवळ टूम म्हणून? नावीन्याची ओढ म्हणून? उपेक्षित जीवनाशी समरसता साधली गेली म्हणून? राहवले नाही म्हणून? आपली दुःखे आता आपणच मांडली पाहिजेत ही पोटतिडीक म्हणून? आणि ही दखल घेताना कलाकृतीचे कलापण कितपत अबाधित राहिले आहे? कोणकोणत्या वाङ्मयप्रकारांनी ही दखल घेतली? हा अभ्यास करताना असे कितीतरी प्रश्न समोर येतात. या सर्वच प्रश्नांचा विचार येथे शक्य नाही. म्हणून ' मराठी कादंबरी आणि उपेक्षितांचे जीवनचित्रण ' एवढ्यापुरतेच हे विवेचन मर्यादित करणे सोयीचे. तेही १९५० पर्यंतच्या कादंबरीचे.

## कादंबरीत सामाजिक जाणिवांचे दर्शन अपरिहार्य

साहित्यिकाच्या कलेचा विषय अखिल, अथांग मानवी जीवन हा असतो. भोवतालच्या घडामोडीत चिरंतनाचे दर्शन जेथे घडते, तेथे कलावंताची कलादृष्टी स्थिर होऊ शकते. माणसाच्या विविध उक्ती, कृती, व्यवहार, त्याची विविध नाती आणि जाती, वर्ण आणि वर्ग यांचे परस्परसंबंध आणि संघर्ष, त्यांची सुखदुःखे, प्रेम आणि तिरस्कार, स्वागत आणि विरोध, त्याच्या इच्छा-आकांक्षा, त्याची स्वप्ने आणि स्वप्नभंग या सर्वांतून निर्माण होणारी त्याची भावनिक आंदोलने, त्यांच्या समाजजीवनात घडणाऱ्या क्रिया आणि प्रतिक्रिया या सर्वांच्या अवलोकनातून आणि अनुभवातून कादंबरीकाराची दृष्टी घडत जाते. जीवनाच्या मंथनातून तद्विषयक सत्ये शोधण्याचा त्याचा प्रयत्न असतो. जीवनाविषयी ओढ, मानवाविषयी सहानुभूती आणि समाजस्थितीचे अवलोकन व अनुभव यांतून त्याची कलाकृती आकार घेते. वास्तव जीवनाचे प्रातिनिधिक दर्शन घडविणे ही कादंबरीविषयीची मोठी अपेक्षा आहे. कादंबरी हे 'Serious imitation of reality' आहे. जाणकार कलावंत व्यक्तीपासून समष्टीपर्यंतच्या स्थूल आणि सूक्ष्म अशा सर्व जाणिवांचे रेखाटन आपल्या कलाकृतीतून करत असतो.

विविध काळांतील आणि युगांतील संस्कृती ज्या मूल्यांना जन्म देते व वाढविते, त्यांचे कला हे वाहन असते. यासाठी कादंबरीकार असो अथवा कथाकार असो, त्याच्या ठिकाणी व्यापक सहानुभूती असावी लागते. ती सहानुभूती अंतरंगात राखून जीवनातील विविध क्षेत्रांत तो संचार करतो. माणूस-मग तो कोणत्याही काळातील, समाजातील, वर्गातील, स्तरातील, आर्थिक-सांस्कृतिक स्थितीतील असो-साहित्याचा प्रधान विषय असतो. व्यापक सहानुभूतीच्या आधारे अशा मानवी मनातील द्वंद्व, जीवनातील नाट्य कादंबरीकार साकार करू शकतो. अशा जीवनदर्शनाने जेव्हा त्याची प्रतिभा भारावली जाते, तेव्हा जिवंत

कलाकृती जन्म घेते. यासाठी लोकजीवनाशी कादंबरीकाराची समरसता आवश्यक आहे. कुसुमावती देशपांडे म्हणतात, 'कथालेखकाला जीवनातील विविधतेची चाड बाळगावी लागते. त्याला अनेकांशी समरस व्हावे लागते. थोरांच्या उदारतेबरोबर क्षुद्रांची हीनता समजावून घ्यावी लागते. समचित्तपणे सुंदराचा व असुंदराचा स्वीकार करावा लागतो. प्रत्येकाच्या जीवनाविषयी त्याला समज व सहृदयता बाळगावी लागते. तेव्हाच कादंबरीचा पसारा निर्माण करता येतो, अनेकांच्या जीवनाचे धागे जुळविता येतात व तितक्याच हळुवारपणे पण निश्चितपणे सोडविता येतात. ही गुंतागुंत जर सहानुभूतिशून्यपणे निर्माण केली गेली तर तिची केवळ रहस्यकथा होते. करमणुकी कला होते; उच्चतम कला होत नाही. जी मानवी जीवनाचा दिलासा, विसावा व स्फूर्तिस्थान होणे शक्य आहे, ती कथनात्मक कला असीम मानवतेशिवाय निर्माण होत नाही. निर्मळ मानवतेच्या पोटीच विशाल व उच्च कलेचा जन्म होतो.'[७]

कादंबरीत (कथा व नाटक यांतही) येणाऱ्या व्यक्तींच्या उक्तींतून, कृतींतून आपणांस प्रतीत झालेले मानवी मन आणि जीवन यांचा अर्थ कादंबरीकार सांगत जातो. समाजजीवनाविषयीची आपली धारणा, मते, विचार, जीवनविषयक दृष्टिकोण, त्या त्या समाजातील व्यक्तींच्या, वर्णांच्या, वर्गांच्या समस्या आणि दुःखे तो व्यक्तिजीवनाच्याद्वारे उभी करतो. व्यक्तिचित्रणाच्याद्वारा समस्यांची दारुणता अधिक प्रभावी होत असते. कादंबरीचे हे सामर्थ्य लक्षात घेऊनच बहुधा कोल्हटकरांनी, " 'पण लक्ष्यांत कोण घेतो! यासारखी पुस्तके लिहून आपणांस लोकमताचा ओघ सुधारणेस अनुकूल करून घेता' येईल " असे प्रतिपादन केले असावे. जगातील श्रेष्ठ कादंबऱ्यांचे अवलोकन केल्यानंतर असे दिसून येते की, तत्कालीन समाजातील अनेकविध घटना, प्रसंग आणि व्यक्ती यांच्यामधून कादंबरीकारांना जीवनविषयक जाणिवांचा जो साक्षात्कार झाला, त्याचे प्रत्ययकारी आणि प्रभावी चित्रण त्यांनी आपल्या कादंबऱ्यांतून केले आहे. प्रभावी आणि जिवंत व्यक्तिचित्रणामुळे त्या त्या कलाकृतींना रसिकहृदयात चिरंतनाचे स्थान मिळाले. 'यामा' (अलेक्झांडर क्यूप्रिन), 'मदर' (मॅक्झिम गॉर्की), 'अंकल टॉम्स केबिन' (मिसेस हॅरियट स्टो), 'दोज् हू वॉक अलोन्' (डॉ. बर्जेस), 'गोदान' (प्रेमचंद), 'मौत का सामना' (कृष्णचंद्र), 'पण लक्ष्यांत कोण घेतो!' (हरिभाऊ आपटे), 'बळी' (विभावरी शिरूरकर) या कादंबऱ्यांतून वरील विधानाची सत्यता पटावयास हरकत नाही.

विशिष्ट समाज, समाजस्थिती, सामाजिक प्रश्न आणि दुःखे यांना अभिव्यक्त करण्याच्या हेतूने जेव्हा कादंबरीकार लिहू लागतो, तेव्हा त्याच्या कादंबरीला आपोआपच सामाजिकता लाभते. अशा कादंबरीतील व्यक्ती या केवळ व्यक्ती राहत नाहीत, तर त्या त्या समाजाच्या प्रतिनिधी बनतात. अशा व्यक्ती व त्यांचे स्वभाव यांच्या द्वारा कादंबरीकार या सामाजिक समस्या मांडतो. मानवी स्वभावाच्या डोहातून, तेथील पाण्याचे आणि

भोवतालच्या मातीचे रंग, रूप, धर्म घेऊन ही अभिव्यक्ती होत असते. त्यामुळेच ती प्रत्ययकारी होत जाते. कादंबरी कोणत्याही काळातील, कुठल्याही विषयावर लिहिलेली असली, तरी अखेर ते मानवी स्वभावाचे चित्र असते. कालांतराने त्या समस्या संपतील, त्यांचे ताजेपण जाईल. पण त्या व्यक्ती आणि त्यांची दुःखे यांचे भावनात्मक दर्शन मात्र तसेच, पूर्वीइतकेच रसरशीत, उत्कट राहील. ते असे राहण्यातच त्या कलाकृतीचे यश दडलेले आहे.

## उपेक्षितांचे जीवनचित्रण

मराठी कादंबरीच्या प्रारंभकालात उपेक्षितांपैकी एकोणिसाव्या शतकातील मराठी स्त्रीचेच चित्रण प्रामुख्याने झाले. 'यमुनापर्यटन' (बाबा पदमनजी), 'नारायणराव आणि गोदावरी' (न. शं. रहाळकर), 'पण लक्ष्यांत कोण घेतो!' (हरिभाऊ आपटे) यांसारख्या कादंबऱ्यांतून कुमारी, सधवा आणि विधवा अशा तीनही अवस्थांतील स्त्रियांची दुःखे अभिव्यक्त झाली आहेत. विधवाविवाहाचा पुरस्कार (यमुनापर्यटन), वास्तववादी दृष्टीने सामान्यांचे जीवनदर्शन (नारायणराव आणि गोदावरी) आणि स्त्रीविषयक कळवळा (पण लक्ष्यांत कोण घेतो!) अशा त्रिविध भूमिका या लेखनामागे असल्या तरी शेवटी स्त्रीविषयक कळवळ्याच अधिक प्रभावी ठरला आहे. हरिभाऊंची यमू ही रूढीच्या चक्रात पिळून निघालेल्या तत्कालीन स्त्रीचे मूर्तिमंत प्रतीक बनली. या कालखंडात आणि यानंतरही (पुढे स्त्रीविषयक प्रश्न बदलले) स्त्रीच्या व्यथांचे रेखाटलेले इतके प्रत्ययकारी चित्र आढळत नाही. वरेरकरांची 'विधवाकुमारी' मात्र 'पण लक्ष्यांत कोण घेतो!'ची बरीचशी आठवण करून देते. शेतकरी, असाक्षर ग्रामीण जनता आणि दलित अस्पृश्य यांच्या प्रश्नांना पांढरपेशांपैकी ज्यांनी महत्त्व आणले त्यात म. गांधींपूर्वी हरिभाऊ आपटे हे प्रमुख '[९] असले तरी त्यांच्या वाङ्मयात अस्पृश्यांचे चित्र कुठे आले नाही. "रा. आपट्यांनी स्त्रियांच्या दुःखाची कहाणी जशी सांगितली आहे, तशी मागासलेल्या जातींच्या दुःखाची सांगितल्यास ती मिसेस स्टोच्या 'टॉम काकाची कोटडी' या कादंबरीच्या खालोखाल क्रांतिकारक होईल "[१०] अशी खात्री कोल्हटकरांसारख्या टीकाकाराला वाटत असताही, हे घडले नाही एवढे मात्र खरे. केशवसुतांसारख्या संवेदनाक्षम आणि सामाजिक सुधारणेची व्यापक जाणीव असलेल्या कवीने 'अंत्यजाच्या मुलाचा प्रश्न' (इ. स. १८८८) कवितेतून मांडला असला तरी, कादंबरीकारांच्या नजरेसमोर हा विषय, विसाव्या शतकाची दोन दशके उलटून गेली तरी, आला नाही ही वस्तुस्थिती आहे.

मराठीत अस्पृश्यताविषयक कादंबरी लिहावयास १९२५ साल उजाडावे लागले. कोल्हटकरांनी 'श्यामसुंदर'च्या द्वारा आपले पुरोगामित्व सिद्ध केले. बहुजनसमाज हा जातिभेदनिरसनाचा पहिला टप्पा मानून, नंतर श्याम या आपल्या नायकाकरवी त्यांनी अस्पृश्यतानिवारण करविले आहे. तत्त्वचर्चा आणि सभेतील वादांच्या द्वारे अस्पृश्यता-

निवारणाचे प्रतिपादन येथे घडले आहे. समकालीन जीवनाच्या साक्षीही घेतल्या आहेत. पण रहस्यात्मकता आणि अवास्तवता यांमुळे मूळ समस्या परिणामकारकपणे उभी राहिली नाही. तरीही मराठी कादंबरीत अस्पृश्यांचा प्रश्न प्रथम मांडण्याचे श्रेय कोल्हटकरांचे.

यानंतर ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, ग. त्र्यं. माडखोलकर, रामतनय, चिंद्रकर, र. वा. दिघे, साने गुरुजी यांनीही हा विषय हाताळला. फडके अस्पृश्यांचा प्रश्न हाताळीत असले तरी त्यांच्या लेखणीचा तो प्रधान धर्म नाही. अस्पृश्य, श्रमजीवी आणि गरीब जनतेविषयीचा कळवळा खांडेकरांच्या व्यक्तिमत्त्वात ओतप्रोत आहे. त्यापोटी आपल्या एका कादंबरीतील ('दोन मने') नायकच त्यांनी अस्पृश्य रंगविला, पण प्रभावी व्यक्ति-चित्रणाभावी तीमधील समस्या प्रत्ययकारी होऊ शकली नाही. व्यक्तिचित्रणाच्या जिवंत-पणामुळे अस्पृश्यांच्या समस्येने काहीसे मूळ धरले आहे ते 'चंदनवाडी'त. अस्पृश्यांची कैफियत येथे माडखोलकर अभिमन्यूच्या तोंडून वदवतात. उपेक्षितांविषयीच्या सहानुभूती-पोटी झालेले हे चित्रण उल्लेखनीय ठरले आहे. अस्पृश्यांच्या व्यथा मांडण्यासाठी र. वा. दिघे ('कार्तिकी') यांनी प्रेमकथेचा आधार घेतला आहे. अस्पृश्यांविषयीची त्यांची सहानुभूती अनेक प्रसंगांतून जाणवत असली तरी दिघे यांचा अतिरिक्त आदर्शाकडे असणारा कल कादंबरीच्या परिणामकारकतेला बाधला आहे. तत्त्वचर्चा आणि वाद यांचीही त्यात भर आहेच. मानवतेच्या कळवळ्यातून बालमनाला आवाहन करण्याची भूमिकाच प्रधान राहिल्याने साने गुरुजींच्या कादंबऱ्याही या प्रश्नाला यशस्वीपणे हात घालू शकल्या नाहीत.

उपरोक्त सर्व लेखकांच्या सहानुभूतीविषयी शंका असण्याचे कारण नाही. परंतु दलित-जीवनाशी, त्यांच्या व्यथांशी पूर्णतया समरसता न साधल्याने त्यांच्या कादंबऱ्यांत तत्त्वचर्चा, वाद, आवेशपूर्ण भाषणे, अतिरिक्त आदर्शाचे चित्रण यांचे प्राबल्य राहिले. प्रत्यक्ष अनुभूती आणि सहानुभूती यांतील अंतर या लेखनातून मात्र जाणवत राहते. अस्पृश्यांच्या साक्षात जीवनानुभूतीचा आविष्कार घडला तो आण्णाभाऊ साठे यांच्या 'फकिरा'च्या रूपाने. भूतकाळातली ही कथा केवळ त्या काळापुरती आणि फकिरा नामक एका व्यक्तीपुरती मर्यादित राहत नाही. वर्तमानात साऱ्या समाजाने उपेक्षिलेल्या जमातीची, सर्वांना अंतर्मुख करणारी कथा असे व्यापक रूप तिला लाभते. पण अण्णाभाऊनंतर हा बंडाचा झेंडा खांद्यावर घेणारा कादंबरीकार दृष्टिपथात नाही. केशव मेश्राम, हिं. गो. वनसोडे, सुखराम हिरवाळे आदी दलित लेखकांचे कादंबरीलेखन आकार घेत आहे.

सांस्कृतिक दृष्ट्या उपेक्षित राहिलेल्या आदिवासींच्या जीवनात संघर्षाचे पर्व जसजसे उदयाला येऊ लागले तसतसे त्यांचे जीवन शब्दबद्ध करण्याचा प्रयत्न मराठीत होऊ लागला. यांतील बरेचसे कादंबरीकार प्रथम कार्यकर्ते आहेत हे लक्षात घेतले म्हणजे त्यांच्या लेखन-स्वरूपाची संगती लागते. शंकरराव भिसे ('जंगलातील छाया'), श्रीराम अत्तरदे ('सावलीच्या उन्हात') वि. वा. हडप ('गोदाराणी'), प. त्रिं. सहस्रबुद्धे ('पहिली सलामी'), वा. ब. कर्णिक ('वाडगीण'), ना. रा. शेंडे ('तांबडा दगड'), दुर्गा

भागवत ('महानदीच्या तीरावर'), गो. नी. दांडेकर ('जैत रे जैत'), र. वा. दिघे ('सराई') या कादंबरीकारांनी आदिवासींचे जीवन चित्रित करण्याचा प्रयत्न केला असून दुर्गा भागवत व गो. नी. दांडेकर यांचा अपवाद वगळता बहुतेकांच्या कादंबऱ्या म्हणजे वस्तुनिष्ठपणे मांडलेल्या आदिवासींच्या कैफियती आहेत. त्या समाजाची समस्या, त्यातील व्यक्तींच्या द्वारे अस्वस्थ करून सोडण्याइतपत मांडण्याचा प्रयत्न मात्र 'दाडगीण' या एकाच कादंबरीने केला.

कामगारांची समस्या मराठी कादंबरीत प्रथम मांडली ती ना. वि. कुलकर्णी ('मजूर') यांनी. भि. गो. भिडे ('गिरणी कामगारांचा अपूर्व विजय अर्थात परिवर्तन') यांनी त्यांच्या पावलावर पाऊल ठेवले. भडक घटना, कृत्रिम कथानक, ठरीव व्यक्तिचित्रे यांमुळे कामगार जीवनाबद्दल कळकळ असूनही या कादंबऱ्या कलात्मकतेच्या पातळीवर येऊ शकल्या नाहीत. कामगारचर्चा करणाऱ्या त्या नवलकथा बनल्या. कामगारविषयक कादंबऱ्यांत जीव ओतला तो वरेरकरांनी (धावता धोटा). कामगारांची गाऱ्हाणी आणि त्याचे प्रातिनिधित्व पात्रांच्या द्वारे येथे परिणामकारक झाले. इतर कादंबऱ्यांपेक्षा हा प्रयत्न उल्लेखनीय असला तरी वास्तवाच्या पार्श्वभूमीवरील अवास्तवाचे साम्राज्य आणि एकूण कादंबरीला लाभलेले प्रचारबहुळ वळण तिला कलात्मकतेपासून दूरच ठेवते. फडके–खांडेकरांनी कामगार जीवनाविषयी लेखन केले असले तरी त्यात प्रत्यय-कारित्व कुठेच आढळत नाही. समाजजीवनाचा संपन्न अनुभव आणि व्यापक सहानुभूती असूनही खांडेकरांच्या मांडणीला कलात्मकता क्वचितच लाभते आणि फडक्यांजवळ कलात्मकता असली तरी उपरोक्त अनुभवाची वानवाच आहे. या दोन्ही लेखकांनी मराठी कादंबरीला नवे दालन उघडून दिले असले तरी वर निर्देशिलेल्या विरोधाभासामुळे कामगार जीवनचित्रणाच्या दृष्टीने त्यांच्याकडून निराशाच पदरी पडते.

मराठीतील कादंबरीकारांचे अस्पृश्यांकडे जितके लक्ष गेले तितके मजुरांकडे गेले नाही. त्या तुलनेने शेतकऱ्यांचे जीवन बरेचसे रंगविले जाऊन पुढे हा प्रवाह प्रादेशिकतेकडे वळला. 'शेतकऱ्यांच्या जीवनात जे काव्य होतं तसं काव्य गिरणगावातल्या कामगारांच्या जीवनात आढळण्यासारखं नव्हतं' अशी याची कारणमीमांसा ना. सी. फडके यांनी केली आहे.[11] गरीब शेतमजूर आणि हातावर पोट भरणारे श्रमजीवी यांचे जीवन म. भा. भोसले ('समरांगण'), अण्णाभाऊ साठे ('माकडीचा माळ'), व्यंकटेश माडगूळकर ('बनगरवाडी'), उद्धव शेळके ('धग'), मनोहर तल्हार ('माणूस'), महादेव मोरे ('एकोणिसावी जात') यांनी रेखाटले असून ते कलात्मक आणि प्रभावी झाले आहे. 'धग' मधील कौतिक आणि 'माणूस' मधील शंकर या सामान्यांतील असामान्य व्यक्तिरेखांसोबत त्यांचे सारे जीवनच आपल्याला सामोरे येते. 'बनगरवाडी' तून एका विशिष्ट प्रदेशातील मानवसमूहाचे मन उलगडले जाते. लोकजीवनाशी समरसता आणि जीवनातील प्रक्षुब्ध अनुभव यांतून या लेखकांच्या कलाकृती जन्म पावल्या आहेत.

मराठी कादंबरीतील अनुभवाच्या कक्षा रुंदावत असल्या आणि समस्यादर्शनाचा विस्तार होत असला तरी आजवर झोपडपट्टीतील माणसे आणि त्यांचे जीवन दुर्लक्षितच राहिले होते. जयवंत दळवी ( 'चक्र' ), मधू मंगेश कर्णिक ( 'माहीमची खाडी' ), भाऊ पाध्ये ( 'वासूनाका' ), शंकरराव खरात ( 'हातभट्टी' ), प्र. व. शेणई ( 'वावर' ) आदी लेखकांनी सांस्कृतिक दृष्ट्या अत्यंत हीनतर, बकाल, जेथे कठोर वास्तव, दारिद्र्य, वासना यांच्या वणव्यात उच्च, उदात्त जीवनमूल्ये डोळ्यांदेखत भस्मसात होत आहेत अशा, 'अकराव्या दिशे'चे दर्शन आपल्या कादंबऱ्यांतून घडविले. यंत्रयुगीन जीवनात बेघर, बेचिराग आणि बेमुलाहिजा झालेल्या मानवाचे हे दर्शन, साहित्यविषयाला मर्यादा असू शकत नाही, याची जणू ग्वाहीच देते.

वारांगनाजीवन ( वेश्या, गणिका, भावीण, मुरळी, नर्तकी इ. ) हा मात्र बऱ्याच कादंबरीकारांच्या सहानुभूतिपूर्ण लेखनाचा विषय दिसून येतो. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांपासून वेश्याजीवनविषयक चिंतन मराठी कादंबरीत घडू लागले. केतकरांचा पिंड समाजशास्त्रज्ञाचा असल्यामुळे त्यांच्याकडून कलात्मक जीवनचित्रणाची अपेक्षा करता येत नाही. वेश्याजीवनविषयक कादंबरीने मात्र समाजशास्त्रीय रुक्ष चर्चेपासून काव्यात्म, उत्कट भावदर्शनापर्यंतची विविध रूपे पाहिली आहेत. भा. वि. वरेरकर ( 'कुलदैवत' ), ना. सी. फडके ( 'स्वप्नांचे सेतू' ), पु. य. देशपांडे ( 'बंधनाच्या पलीकडे' ), वि. स. खांडेकर ( 'दोन ध्रुव', 'दोन मने' ), साने गुरुजी ( 'रामाचा शेला' ), वा. भ. बोरकर ( 'भावीण' ), चंद्रकांत काकोडकर ( 'गोमंतका जागा हो' ). अण्णाभाऊ साठे ( 'चित्रा', 'वैजयंता', 'चिखलांतील कमळ' ), जयवंत दळवी ( 'महानंदा' ), मधू मंगेश कर्णिक ( 'देवकी' ), बाबुराव बागूल ( 'सूड' ) अशा अनेक कादंबरीकारांनी हा विषय हाताळला आहे. वेश्याजीवनाविषयीची सहानुभूती आणि त्यामधील कारुण्य हाच बहुतेकांच्या चित्रणाचा गाभा म्हणता येईल. काव्यात्म भावदर्शनामुळे 'भावीण,' 'महानंदा' आणि 'देवकी' या उल्लेखनीय ठरल्या तर प्रक्षुब्ध जीवनानुभवामुळे 'सूड'ने जनमानसात आपले स्थान आगळे राखले. या सर्वच कलाकृती शोकान्ताकडे वळल्या आहेत.

गुन्हेगारांची कहाणी मात्र विभावरी शिरूरकर ( 'बळी' ) आणि अण्णाभाऊ साठे ( 'फकिरा', 'वारणेचा वाघ', 'माकडीचा माळ' ) या दोघांनीच वाचकांच्या अंतरंगापर्यंत नेऊन भिडविली. गुन्हेगार जीवनाचे अत्यंत जवळून, आत्मीयतेने घेतलेले दर्शन आणि प्रत्यक्षानुभव अशा दोघांच्या लेखनामागील प्रेरणा वेगळ्या असल्या तरी दोघांनी त्यांतून मानवी मनाला भिडण्याचा प्रयत्न केल्यामुळे या कादंबऱ्यांतील समस्यांना फार मोठे प्रत्ययकारित्व प्राप्त झाले आहे. 'फकिरा' हे उत्कट जीवनदर्शन आहे, तर 'बळी' हे प्रभावी जीवनभाष्य आहे. कुष्ठरोगी आणि अपंगांची दुःखे मांडून मराठी कादंबरीने आपण माणसाच्या शोधात असल्याची जाणीव पुनश्च करून दिली आहे. प्रत्येक क्षणी उघडया

डोळ्यांनी आपले मरण पाहणाऱ्या, तर कधी मृत्यूच्या सीमेवरून परतल्यानंतर मृत्यूपेक्षाही दाहक असे उपेक्षेचे दुःख भोगणाऱ्या या माणसांच्या अंतरंगाचा शोध वित्रलकर ( ' शुभा ' ) आणि उद्धव शेळके ( ' अगतिका ' ) यांनी नेटका घेतला आहे. गो. नी. दांडेकरांसारखा लेखक ( ' आनंदवनभुवन ' ) महारोग्यांच्या अपार जीवननिष्ठेचा आणि कर्तृत्वाचा विषय रेखाटण्याची भूमिका ठेवतो. एका पंगू मुलाचे असामान्य थोरपण स्पष्ट करून मधू मंगेश कर्णिकांनी ( ' सूर्यफूल ' ) जीवनावरील विश्वास वाढविण्यास केवढीतरी मदत केली आहे.

उपेक्षितांचे जीवन शब्दबद्ध करणाऱ्या या कादंबऱ्यांच्या समालोचनातून असे दिसून येते की, बहुतेक कादंबऱ्यांतून उपेक्षित जीवनाविषयीची चर्चा, वाद आणि वस्तुनिष्ठ स्वरूपाची निवेदने आढळतात. कुठे पोच देण्याचा प्रयत्न आहे, कुठे भूतदयावाद आहे, तर काही ठिकाणी प्रकट बोध, अतिरिक्त आदर्शाचे दर्शन घडविण्याचा प्रयत्न आहे. प्रचीतीचे बोलणे थोडेच. उपेक्षितांशी समरस होऊन त्यांच्या अंतरंगाची चाहूल घ्यावी, त्यांच्या प्रक्षुब्ध भावनांच्या डोंगात होरपळून निघावे, त्यासाठी स्वतःला हरवून बसावे असे फार थोडे घडले आहे. आदेशयुक्त निवेदने, प्रकट बोध, अतिरिक्त आदर्श यांचे कपडे घालून अनेकांनी आपले नायक कादंबऱ्यांतून फिरवले. त्यामुळे कादंबऱ्यांच्या या गजबजलेल्या विश्वात उपेक्षितांतील माणसाचा शोध फार थोडाच लागला. ' पण लक्ष्यांत कोण घेतो ! ' ' वळी ', ' भावीण ', ' देवकी ', ' फकिरा ', ' बाडगीण ', ' शुभा ', ' बनगरवाडी ', ' धग ', ' माणूस ', ' सूड ', ' महानंदा ' ' चक्र ', ' सूर्यफूल ', अशा काही कादंबऱ्यांतून हा शोध मिळू शकतो.

ज्या कादंबरीकारांनी उपेक्षित जीवनाशी समरसता प्राप्त करून घेतली आणि जे या समाजात जन्माला आले, त्यांच्या लेखनात अनुभूतीची प्रांजलता आणि उत्कटता जाणवते. पण अशीही उदाहरणे थोडीच. ( ' वळी ', ' फकिरा ', ' सूड ', ' बाडगीण ', ' धग. ' ) दलित लेखक आता लिहू लागल्यामुळे या चित्रणाचे रंग गडद बनत आहेत. त्या समाजातच जन्माला येणे ही अनुभूतीच्या आणि जीवनदर्शनाच्या दृष्टीने एक पूरक गोष्ट म्हणून मान्य केली तरी त्या निकषांचे काटेकोर पालन अवश्य आहे. ' पण लक्ष्यांत कोण घेतो ! ', ' बनगरवाडी ', ' चक्र ', ' देवकी ' या कादंबऱ्यांचे लेखक त्या जीवनाशी प्राप्त झालेल्या अंतरंगाच्या समरसतेमुळेच उत्कृष्ट कलाकृती निर्माण करू शकले. जीवनाच्या ओढीतून, माणसाबद्दलच्या प्रेमातून नवी मळवाट शोधण्याचा असा प्रयत्न थोडाच होतो. ' कळवळ्याविण प्रीती ' नसते, हे त्यातून स्पष्ट व्हावे. जातपात, धर्म, वर्ण, गोत्र, व्यवसाय, प्रतिष्ठा यांच्या भिंती ओलांडून माणसावर प्रेम करणारी अपार करुणा आणि जीवनावरील असीम श्रद्धा लेखकाच्या मनात वास करावी लागते. ललित वाङ्मय हा अशा वृत्तीने माणसाचा आणि जीवनाचा अखंडपणे चाललेला शोध असावा लागतो.

## मराठी कादंबरी आणि उपेक्षितांचे जीवन चित्रण

**संदर्भ :**


(१) Masson Cooley : The New Book of Knowledge, Vol. 13, Page 349.
(२) श्री. कृ. कोल्हटकर : कोल्हटकर लेखसंग्रह, पृ. ६३८
(३) ह. ना. आपटे : मराठी साहित्य संमेलन, अध्यक्षीय भाषणे, खंड पहिला, पृ. ३१ (अकोला, १९१२)
(४) वा. म. जोशी : मराठी साहित्य संमेलन, अध्यक्षीय भाषणे, खंड पहिला, पृ. २३४ (मडगाव, १९३०)
(५) प्र. के. अत्रे : मराठी साहित्य संमेलन, अध्यक्षीय भाषणे, खंड पहिला, पृ. ५२७ (नासिक, १९४२)
(६) वि. स. खांडेकर : अभिषेक, पृ. ७४
(७) कुसुमावती देशपांडे : मराठी कादंबरी : पहिले शतक, भाग पहिला, प्रस्तावना, पृ. १२
(८) श्री कृ. कोल्हटकर : कोल्हटकर लेखसंग्रह, पृ. ५९
(९) वि. वा. आंबेकर : हरिभाऊ : काल आणि कर्तृत्व, पृ. ५५
(१०) श्री. कृ. कोल्हटकर : कोल्हटकर लेखसंग्रह, पृ. ६३८
(११) ना. सी. फडके : मराठी कादंबरीची वाटचाल, पृ. ४३


### कविता म्हणजे भाषेतली भाषा

भाषेतली साधने निवडकपणे, सूक्ष्मपणे वापरून कवितेचे निवेदन सिद्ध होत असते. कविता ही भाषेबाहेरची भाषा नसून भाषेतली भाषा असते. फक्त तिला सर्वसामान्य व्यवहाराचा संदर्भ नसून व्यक्तिविशिष्ट व्यवहाराचा संदर्भ असतो. सर्व-सामान्य व्यवहाराचीच साधने निराळ्या संदर्भात, निराळ्या पातळीवर वापरून कवी कविता निर्माण करतो. आणि समजा, कवितेत व्यावहारिक भाषेची मोडतोड झाली तर ? तशी सूक्ष्म मोडतोड तर सर्रास होत असतेच; पण काही कवी डोळ्यांत भरेल अशी ठळक मोडतोडसुद्धा करतात. पण या मोडतोडीलाही मूळ भाषेच्या संदर्भातच अर्थ येतो.

–दिलीप पुरुषोत्तम चित्रे

# १९

# मराठी शब्दांतील वर्णानुक्रमरचना

मो. रा. वाळंबे

मराठीतील शब्दांचा वर्णानुक्रम कोणत्या पद्धतीने ठेवावा याबाबत महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या गेल्या दोन अंकांतून दोन टिपणे प्रसिद्ध झाली आहेत. डॉ. अशोक केळकर यांची ' मराठी देवनागरी वर्णक्रमी ' (म. सा. पत्रिका अंक २०२) व श्री. शरद केशव साठे यांची ' वर्णक्रमी : एक पुनर्विचार ' (म. सा. पत्रिका अंक २०३) अशी ती दोन टिपणे होती. डॉ. केळकर यांनी वर्णक्रमीच्या विविध पद्धती देऊन त्यांतील कोणती ग्राह्य व कोणती अग्राह्य यांचे सोदाहरण विवेचन केले आहे. श्री. साठे यांनी डॉ. केळकरांच्या प्रतिपादनाशी आपण कोणत्या बाबतीत सहमत आहो व आपले दुमत कोठे आहे याचे विवेचन केले आहे. वर्णमालेतील ' ळ, क्ष, ज्ञ, ' या तीन वर्णांना ' ह ' नंतर क्रमाने शेवटी स्थान द्यावे, या बाबतीत दोघांचे एकमत आहे. मात्र अं, अॅ, ऑ व अनुनासिके यांच्या स्थानांबद्दल त्यांच्यात इतके दुमत आहे की डॉ. केळकरांनी ज्या पद्धती ग्राह्य म्हणून मानल्या त्या श्री. साठे यांच्या मते अग्राह्य ठरतात. या दोघांच्या मते ग्राह्य वर्णक्रमी कोणती हे थोडक्यात समजून घेण्यासाठी आपण ' क ' या वर्णातील खालील शब्द घेऊ :

| (डॉ. केळकर) | (श्री. साठे) | (ग्राह्य) |
|---|---|---|
| कऊल | कऊल | कंऊल |
| कंटाळा | कच | कच |
| कःपदार्थ | कॅटलॉग | कंटाळा |
| कच | कंटाळा | कःपदार्थ |
| कांडण | कःपदार्थ | कॅटलॉग |
| काडा | काडा | काडा |
| केंद्राळ | कॉलरा | कांडण |
| केधवा | कांडण | कॉलरा |
| कॅटलॉग | केधवा | केधवा |
| कोंदट | केंद्राळ | केंद्राळ |
| कोनाडा | कोनाडा | कोनाडा |
| कॉलरा | कोंदट | कोंदट |
| कौंच | कौंच | कौंच |

अनुक्रमणिका

या दोन वर्णक्रमींकडे वरवर पाहणाऱ्याला एक प्रमुख फरक दिसून येतो तो हा की डॉ. केळकर यांच्या वर्णक्रमीमध्ये अनुस्वारयुक्त वर्ण हे सामान्यतः त्या त्या निरनुस्वार वर्णांच्या आधी आले आहेत. जसे, कं...क...कां...का...कें...के. पण श्री. साठे यांच्या वर्णक्रमीमध्ये निरनुस्वार वर्ण प्रारंभी आले असून ते ते सानुस्वार वर्ण त्यानंतर आले आहेत. जसे, क–कं–का–कां–के–कें. डॉ. केळकर हे ' ॲ ' चे स्थान ए-नंतर व ' ऑ 'चे स्थान ओ-नंतर मानतात. जसे, ए–ॲ–ऐ–ओ–ऑ–औ. श्री. साठे यांच्या वर्णक्रमीमध्ये ' ॲ ' चे स्थान अ-नंतर व ' ऑ ' चे स्थान आ-नंतर आहे. जसे, अ–ॲ–आ–ऑ. दोघांनीही विसर्गाला अनुस्वारानंतर लगेच स्थान दिले आहे. अनुस्वाराच्या बाबतीत असा फरक का पडतो हे प्रथम पाहू. डॉ. केळकरांनी स्वीकारलेली वर्णमाला अशी आहे :

प्रथम अ ते औ पर्यंतचे स्वर, त्यानंतर अनुस्वार ( ं ) व विसर्ग ( : ), त्यानंतर क ते ज्ञ पर्यंतची व्यंजने क्रमाने. डॉ. केळकरांनी ( ं ) व ( : ) या दोन चिन्हांना ' औ ' व ' क् ' यांच्यामधले स्वतंत्र वर्णाप्रमाणे स्थान दिले आहे. अनुस्वार व विसर्ग हे स्वरही नाहीत व ती व्यंजनेही नाहीत. यांचा उच्चार होण्यापूर्वी कोणत्यातरी स्वराचे प्रथम साहाय्य घ्यावे लागते. त्यांना ' स्वरादी ' असे म्हणतात. श्री. साठे यांच्या मताप्रमाणे ते स्वरानुवर्ती आहेत. अनुस्वार हा औ नंतरच येत नसून तो प्रत्येक स्वरावर येऊ शकतो. जसे, अं, आं, इं, उं, एं, ओं, औं. तीच गोष्ट विसर्गाची. म्हणून ं व : यांना औ नंतरचे व ' क् ' पूर्वीचे स्थान देणे योग्य नाही. अनुस्वार हा स्वरानंतरच येतो. म्हणून अनुस्वारयुक्त वर्ण निरनुस्वार वर्णानंतरच घेणे युक्त होय. व्यंजने व जोडाक्षरे यांच्याही बाबतीत हीच पद्धती अनुसरावयास हवी. जसे, अ–अं–अः–क–कं–क:–क्र–क्रं–क्रः

**ॲ व ऑ यांच्या बाबतीत**— डॉ. केळकर हे याकडे ध्वनिशास्त्राच्या दृष्टीने पाहतात. त्यांच्या मते " ॲ आणि ऑ ह्या अनुक्रमे ए आणि ओच्याच अधिक विवृत (जबडा अधिक वासून उच्चारलेल्या) आवृत्त्या आहेत." उच्चाराच्या दृष्टीने ते ठीक आहे. श्री. साठे हे या वर्णाकडे स्वरूपाच्या दृष्टीने पाहतात. या दोन अक्षरांचे वळण ए आणि ओ पेक्षा अ व आ यांना जवळचे आहे. ॲ चा उच्चार ' ए ' या वर्णावर अर्धचंद्र देऊन न दाखविता ' अ ' या वर्णावर अर्धचंद्र देऊन आपण दाखवितो. लेखनाच्या दृष्टीने ॲ व ऑ यांना अनुक्रमे अ व आ यांच्यानंतरचे स्थान देणेच योग्य ठरेल. जसे, अ–ॲ–आ–ऑ. हे सानुस्वार असतील तर त्यांचा क्रम, अ–ॲ–ॲं–आ–ऑ–ऑं असा राहील. आता हे ॲ चे स्थान अ नंतरचे आहे व ऑचे स्थान आ नंतरचे आहे हे ठरल्यानंतर वर्ण सानुस्वार आले तर त्यांचा क्रम पुढीलप्रमाणे राहील : अ–अं–अः–ॲ–ॲं–आ–आं–ऑ–ऑं–इ–इं वगैरे. म्हणजेच ' कच–कॅटाला–कःपदार्थ–कॅटलॉग–काढा–कांडण–कॉलरा ' असा वरील शब्दांचा वर्णानुक्रम राहील.

श्री. साठे यांनी ' ॲ ' ला अ-नंतरचे व ' ऑ ' ला आ-नंतरचे स्थान दिले असले तरी

अनुस्वार व विसर्गयुक्त अक्षरे ही ॲ व ऑ नंतर घेतली आहेत. जसे, र–रॅ–रं–रः–रा–रॉ–रां–राः. हे मात्र बरोबर नाही. इंग्रजी भाषेच्या संपर्कामुळे ॲ व ऑ हे दोन उच्चारदर्शक स्वतंत्र वर्ण आपण घेतले आहेत. अनुस्वार व विसर्ग हे स्वतंत्र वर्ण आपण मानत नाही. म्हणून क–कं–कः–कॅ–कँ–का–कां–कॉ–काँ असाच क्रम ठेवणे योग्य होईल. या पद्धतीस अनुसरून प्रारंभी दिलेल्या ' क ' वर्णातील शब्दांचा वर्णानुक्रम कसा असावयास हवा हे ' ग्राह्य ' या तिसऱ्या स्तंभात दर्शविले आहे. तिकडे मी वाचकांचे लक्ष वेधू इच्छितो.

आता शब्दांचा वर्णक्रम लावताना डॉ. केळकरांच्या पद्धतीत सानुस्वार वर्ण त्या त्या निरनुस्वार वर्णांच्या अगोदर का येतात व इतर दोन पद्धतींत सानुस्वार वर्ण हे निरनुस्वार वर्णांच्या नंतर का येतात हेही समजावून घेणे आवश्यक आहे. म्हणजे कोणत्या पद्धतीत दोष आहे हे अजमावता येईल. वर्णानुक्रम लावताना आपण एकेक अक्षर वर्णमालेत क्रमाने घेत जातो. शब्दांचे पहिले अक्षर सारखे असेल तर दुसरे अक्षर घेऊन अनुक्रम ठरवितो. पहिली दोन अक्षरे सारखी असल्यास तिसरे अक्षर पाहून वर्णमालेतील क्रमाप्रमाणे त्यांना स्थान देतो. म्हणजे शब्दांचा वर्णानुक्रम लावताना त्यांतील प्रत्येक अक्षर हे एक एकक ( unit ) मानून क्रमाने त्यांचा विचार करून वर्णक्रमी ठरवितो. पण डॉ. केळकर हे दिलेल्या शब्दांतील सर्व अक्षरांची वर्णरचना प्रथम करून घेऊन मग वर्णक्रमी ठरवितात. उदाहरणादाखल आपण वरील यादीतील ' कोनाडा ' व ' कोंदट ' हे दोन शब्द घेऊ. त्यांची वर्णरचना पुढीलप्रमाणे होईल :

कोनाडा = क् + ओ + न् + आ + ड् + आ.

कोंदट = क् + ओ + ं + द् + अ + ट् + अ.

सामान्यतः वर्णानुक्रम ठरविताना आपण या शब्दांतील प्रथम पहिली अक्षरे घेतो. पहिल्यात ' को ' आहे तर दुसऱ्यात ' कों ' आहे. म्हणजे ' कों ' मध्ये ' को ' पेक्षा एक अनुस्वार अधिक आहे. म्हणून ' को ' प्रथम व ' कों ' मागाहून असे ठरवून आपण ' कोनाडा ' हा शब्द अगोदर व ' कोंदट ' हा शब्द त्यानंतर ठेवतो. सानुस्वार अक्षर हे निरनुस्वार अक्षरानंतर क्रमाने येणे उचित. पण डॉ. केळकर प्रथम शब्दातील सर्व अक्षरांची संपूर्ण वर्णरचना वर दिल्याप्रमाणे करतात. यात प्रारंभी क् + ओ हे दोन वर्ण सारखे आहेत मग तिसऱ्या वर्णाकडे ते वळतात. ते वर्ण म्हणजे ' न् ' व ं यांची ते तुलना करतात. त्यांच्या मते अनुस्वाराचे स्थान औ या स्वरानंतर व क् या व्यंजनापूर्वी आहे. म्हणजे येथे ं हा त्यांच्या मते ' न् ' च्या अगोदरचा वर्ण म्हणून क् + ओ + ं ( कों ) या अक्षराला ते प्रथम स्थान देतात. यात एक मोठी चूक होते ती अशी की ' कों ' व ' को ' या दोन पहिल्या अक्षरांची तुलना न करता कों बरोबर क + ओ + न् असे तीन वर्ण घेऊन म्हणजे दुसऱ्या अक्षरातील ' न् ' हा वर्ण घेऊन ते प्रथम स्थान ठरवितात. एकेक अक्षर स्वतंत्र एकक ( unit ) न मानल्यामुळे दुसऱ्या अक्षरातील व्यंजन व पहिल्यातील

अनुस्वार यांची तुलना केल्यामुळे अनुस्वारयुक्त वर्णाला ते प्रथम स्थान देतात. मात्र 'कऊल' व 'कंटाळा' या शब्दांत (क् + अ + ऊ) व (क् + अ + ं) यांची तुलना करून 'ऊ' ला अनुस्वारापूर्वीचे स्थान दिल्यामुळे त्यांच्या मते 'कऊल' हा शब्द अगोदर येतो. म्हणजे पहिल्या शब्दातील दोन अक्षरे व दुसऱ्या शब्दातील कं हे एकच अक्षर घेऊन वर्णानुक्रम ठरविला जातो. त्यापेक्षा दोन्ही शब्दांतील पहिली अक्षरे घ्यावी. त्यातील 'क' व 'कं' यांत क अगोदर व कं नंतर; कारण कं मध्ये एक अनुस्वार जास्तीचा आहे. म्हणून त्याचे स्थान नंतरचे. म्हणून संपूर्ण शब्दाची वर्णरचना करून वर्णानुक्रम ठरविण्यापेक्षा एकेक अक्षर क्रमाने घेऊन वर्णरचना करणे हेच श्रेयस्कर, सुलभ व सोईचे ठरते. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास वर्णमालेचा क्रम पुढीलप्रमाणे मानावा :

(१) अ अॅ आ ऑ इ ई उ ऊ ऋ ऌ ए ऐ ओ औ हे स्वर व क् ख्...... पासून ह् ळ् क्ष् ज्ञ्, पर्यंतची व्यंजने.

(२) अनुस्वारयुक्त अक्षर हे निरनुस्वार अक्षराच्या नंतर येईल.

(३) प्रथम स्वर, त्यानंतर स्वरयुक्त व्यंजन त्याच्या बाराखडीप्रमाणे, त्यानंतर जोडाक्षराचा विचार वरील क्रमाप्रमाणे करावा.

(४) प्रत्येक अक्षर स्वतंत्र एकक (unit) मानून वर्णक्रम ठरवावा.

वर्णानुक्रमरचनेचा हा मानदंड लक्षात ठेवून मराठीतील शब्दांची वर्णक्रमी ठरविल्यास ती पुष्कळशी सुलभ वाटेल असा मला विश्वास वाटतो. याच संदर्भात प्रारंभी 'ग्राह्य' या स्तंभात दिलेल्या 'क' वर्णातील शब्दांचा लावलेला वर्णानुक्रम पडताळून पाहावा.

अखंड शब्दाच्या वर्णानुक्रमरचनेचा आपण येथवर विचार केला. पण कित्येक वेळा शब्दसमूह किंवा सामासिक शब्द यांचा वर्णक्रम लावायचा असल्यास ही एकच पद्धत उपयोगी पडत नाही. वर्णानुक्रमरचनेच्या दोन पद्धती आहेत. ज्यात प्रत्येक अक्षर स्वतंत्र समजून वर्णक्रम ठरवायचा असतो, त्यास 'वर्णनिष्ठ अनुक्रम' म्हणतात. श्री. साठे त्याला 'वर्णानुसारी वर्णक्रमी' म्हणतात. या प्रकारात दोन शब्दांतील अंतर विचारात न घेता वर्णांच्या अनुक्रमाप्रमाणे रचना करत जावयाचे असते. पण ग्रंथांच्या याद्या, व्यक्तींची नावे, ज्ञानकोशातील विषयनोंदी यांच्या बाबतीत त्यांतील प्रत्येक शब्दाला स्वतंत्र प्राधान्य देऊन वर्णानुक्रम लावलेला असतो. या पद्धतीत दोन शब्दांत ठेवलेले अंतर किंवा संयोगीचिन्ह विचारात घेतले जाते. यातील एक शब्द स्वतंत्र मानून तो शब्द संपला की वर्णक्रम तेवढ्यापुरता संपतो व पुढल्या शब्दाचा वर्णानुक्रम नव्याने करावयाचा असतो. या प्रकारात दोन शब्दांतील अंतर हे निरर्थक न मानता तेथे वर्णानुक्रमभंग झाला असे मानतात. केवळ शब्दकोश असेल तर वर्णनिष्ठ अनुक्रम ठेवणे सोईचे ठरते; पण सूचिकोशात किंवा ज्ञानकोशात शब्दनिष्ठ अनुक्रम अनुसरणे योग्य ठरते.

# १०

# ' शोधविज्ञानकोशा 'चा शुभारंभ

## समीक्षक : डॉ. हे. वि. इनामदार

डॉ. दुर्गादास काशिनाथ संत हे कोल्हापूरच्या गोखले महाविद्यालयातून मराठीचे विभाग-प्रमुख म्हणून नुकतेच सेवानिवृत्त झाले. ' मराठी स्त्री ', ' साहित्य संमेलने ', ' कलानीति-वाद '. ' संशोधन : पद्धती, प्रक्रिया, अंतरंग ' आणि ' वाङ्मयीन विद्वत्ता ' या आपल्या ग्रंथसेवेमुळे अभ्यासकांना ते व्यासंगी समीक्षक म्हणून परिचित आहेत. महाविद्यालयीन व विद्यापीठीय अध्यापकाचा, तसेच संशोधन–मार्गदर्शनाचा त्यांना दीर्घकालचा अनुभव आहे.

सेवानिवृत्तीनंतर डॉ. संतांनी एक उपयुक्त प्रकल्प हाती घेतला आहे. ' शोधविज्ञान-कोश ' या कोशग्रंथाचा संकल्प त्यांनी सोडला आहे. या प्रकल्पाची व्याप्ती विशद करणारी एक परिचय–पुस्तिकाही त्यांनी प्रसिद्ध केली आहे. ' संशोधनविषयक कार्य व शोधसमान कृती यांच्याशी संबद्ध अशा सर्वसाधारण संज्ञा, संकल्पना, प्रक्रिया, पद्धती, तत्त्वमीमांसा आणि संदर्भ ' या विषयीचा हा कोश तयार होणार आहे.

यापुढे उच्च शिक्षणाचा तोंडवळा बदलत आहे. शिक्षण हे संशोधनानुगामी होऊ लागले आहे. एम. ए. नंतर एम. फिल. व एम. लिट. यांसारख्या पदव्यांचे अभ्यासक्रम तयार होत आहेत. संशोधनपद्धतीची प्रत्यक्ष कल्पना देण्यासाठी काही पदविका अभ्यासक्रमही काही ठिकाणी विचाराधीन आहेत. याचा अर्थ संशोधनशास्त्र किंवा शोधविज्ञान ही महत्त्वाची अभिक्रिया म्हणून मान्यता पावत आहे.

शोधप्रकल्प, सर्वेक्षण, पाहण्या, अभ्यास इत्यादी उपक्रमांना उपयुक्त व्हावा, या दृष्टीने डॉ. संतांनी या कोशाची आखणी केली आहे. या संकल्पित कोशग्रंथाची त्यांना अभिप्रेत असलेली वैशिष्ट्ये अशी :

१. शोधपद्धतिशास्त्राशी संबद्ध विषय : ( उदा०–पदटीपा, दस्तऐवजीकरण, संदर्भ टीपा इ० ), त्याचे मार्ग ( उदा० – कोष्टके, तक्ते, नकाशे इ० ), त्याच्या पद्धती ( संदर्भसाधनिका, परिशिष्टे, सूची इ० )

२. शोधनप्रक्रियासंबंधित अभिक्रिया : ( टिप्पणी, रूपरेषा, साधनसामग्री, अभ्युपगम, तपासणी, माहितीचे संकलन व उपयोजन इत्यादी.

अनुक्रमणिका

## संमेलनशताब्दी :

मराठी साहित्यसंमेलनाच्या स्थापनेला ११ मे १९७८ रोजी शंभर वर्षे पूर्ण झाली. या निमित्ताने दि. ११ मे रोजी, बालगंधर्व रंगमंदिराच्या कलादालनात चित्रकार श्री. म. वि. सोवनी यांच्या 'इये मराठीचिये नगरी' या प्रदर्शनाचे उद्घाटन विख्यात साहित्यिक श्री. गो. नी. दांडेकर यांच्या हस्ते करण्यात आले. महाराष्ट्रगीत, अध्यक्ष प्रा. गं. वा. सरदार यांचे प्रास्ताविक, प्रदर्शन-उद्घाटन, श्री. सोवनी यांचा सत्कार, श्री. दांडेकर यांचे भाषण, आभारप्रदर्शन आणि वंदेमातरम् असे कार्यक्रम होऊन हा हृद्य समारंभ संपला. शताब्दी-समारंभातील दुसरा कार्यक्रम २१ मे रोजी टिळक स्मारक मंदिराच्या चर्चा-सभागृहात झाला. या दिवशी दोन परिसंवाद झाले. सकाळी 'स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी समीक्षा' या विषयावरील परिसंवादाचा उपन्यास श्री. प्रभाकर पाध्ये यांनी केला. त्यानंतर प्रा. स. शि भावे, प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. भालचंद्र फडके, डॉ. स. गं. मालशे, प्रा. कृ. ब. निकुंब, डॉ. आनंद यादव व श्री. सुधीर बेडेकर यांनी मराठी समीक्षेच्या विविधांगांबद्दल आपापले विचार व्यक्त केले. दुपारी 'साहित्य, समाज आणि शासन' या विषयावरील परिसंवादाचा उपन्यास तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी केला. प्रा. म ना. अदवंत, डॉ. वि. रा. करंदीकर, डॉ. निर्मलकुमार फडकुले, श्री. स. मा. गर्गे प्रभृतींनी चर्चेत भाग घेऊन सहकार्य केले. दोन्ही परिसंवाद-प्रसंगी डॉ. गं. वा. सरदार हे अध्यक्ष होते. प्रास्ताविक व स्वागत, परिषदेचे कार्याध्यक्ष-श्री. श्री. ज. जोशी यांनी केले. प्रा. न. म. जोशी व डॉ. हेमंत इनामदार यांनी आभार-प्रदर्शन केल्यावर शताब्दी समारंभाची सांगता झाली.

## कवितावाचन :

दि. १९ मे १९७८ रोजी प्रा. यशवंत मनोहर, श्री. नारायण सुर्वे, श्री. बाबूराव बागूल आणि श्री. वामन निंबाळकर या कवींनी आपल्या निवडक कवितांचे परिषदेत वाचन केले. कवितांची ही बैठक जोषपूर्ण आणि बहारदार झाली.

## कन्नड साहित्य संमेलन :

कन्नड साहित्य संमेलनाचे सुवर्ण महोत्सवी अधिवेशन दिल्ली येथे एप्रिलच्या शेवटच्या आठवड्यात भरले होते. परिषदेतर्फे या अधिवेशनाला प्रा. अ. रा. तोरो (वारणानगर) उपस्थित होते. कवी अनिल यांचा संमेलनात सत्कार झाला. त्या वेळी प्रा. तोरो यांनी अनिल यांच्या कवितांचे कन्नडमधून वाचन केले. तसेच चर्चा, परिसंवाद इ० कार्यक्रमातही त्यांनी भाग घेतला. आंतरभारतीच्या एका परिसंवादात 'कन्नड-मराठी संबंध' या विषयावर डॉ. पंडित आवळीकर यांचे इंग्रजीतून भाषण झाले.

कार्यवाह

महाराष्ट्र-साहित्य-परिषद

एप्रिल १९७७ ते
३१ मार्च १९७८
या वर्षाचे

उत्पन्न खर्च पत्रक
ताळेबंद व अर्थसंकल्प

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहि

शेड्यूल

दिनांक १ एप्रिल १९७७ ते दिनांक ३१ मार्च १९

| १९७६-७७ रु. पै. | खर्च | रु. पै. | १९७७-७८ रु. पै. |
|---|---|---|---|
| | **मालमत्तेसंबंधी :** | | |
| | भुईभाडे. | १५-०० | |
| | इमारत दुरुस्ती. | १,२१६-४७ | |
| | विमा. | १२०-०० | |
| २,२३१-८५ | फर्निचर, वस्तू खरेदी व दुरुस्ती ... | ४९१-५० | |
| | **व्यवस्थापन :** | | १,८४२- |
| | पगार व प्रॉव्हिडंट फंड. | १०,३१५-९३ | |
| | छपाई, टायपिंग, स्टेशनरी. | २,२९९-८७ | |
| | टपाल व दूरध्वनी. | २,५३५-१५ | |
| | कार्यकारी मंडळ सभा. | १,५७१-८० | |
| | प्रवास व प्रचार. | ५१९-४० | |
| २०,९७०-८० | वीज. ... | १,२४८-२५ | |
| ४५०-०० | **हिशेबतपासनीस फी :** | | १८,४९०- |
| | १९७७-७८ | | ३५०- |
| | **किरकोळ खर्च :** | | |
| | आतिथ्य. | ४६२-४५ | |
| | विश्वस्त खाते. | ७-२० | |
| १,००९-४३ | इतर. ... | ४३२-८१ | ९०२- |
| | **घसारा :** | | |
| | इमारत २॥ टक्के. | १,७२४-७९ | |
| | फर्निचर १० टक्के. | १,१८०-९० | |
| ८,७६१-४४ | ग्रंथालय १० टक्के. ... | ४,२४४-४० | ७,१५०- |
| ३३,४२३-५२ | बेरीज पुढील पानावर ओढली. | रु. | २८,७३५- |

परिषद, पुणे—४११०३०

नियम (१) प्रमाणे

या वर्षाचे उत्पन्न-खर्च पत्रक.

| १९७६-७७ रु. पै. | उत्पन्न | | रु. पै. | १९७७-७८ रु. पै. |
| --- | --- | --- | --- | --- |
| | **व्याज :** | | | |
| | सेव्हिंग्ज खात्यावरील. | ... | १,४३१-०३ | |
| ११,४३४-९५ | ठेवींवरील | ... | ७,५९३-६८ | ९,०२४-७१ |
| २१६-७४ | **डिव्हिडंड.** | | | २१३-१२ |
| ७,८१०-५० | **देणग्या** | | | ९,९२५-२० |
| | **अनुदाने :** | | | |
| | शासकीय. | | ५,८२५-०० | |
| | ग्रंथालय. | | १,८००-०० | |
| | म. सा. पत्रिका. (साहित्य-संस्कृति मंडळ) | | ८,०००-०० | |
| | वाङ्मयेतिहास (साहित्य-संस्कृति-मंडळ) | | ५,०००-०० | |
| १६,४८०-०० | पुणे महानगरपालिका. | ... | १,०००-०० | २१,६२५-०० |
| | **इतर उत्पन्न :** | | | |
| | साधारण सभासद वर्गणी | | १४,२०१-०० | |
| | संलग्न संस्था वर्गणी. | | १६५-०० | |
| | पत्रिका वर्गणी व जाहिरात | | ३,२५६-५० | |
| २३,७२७-८० | परीक्षा फी. | | २,४३४-५० | २०,०५७-०० |
| ५०-०० | **न्या. रानडे पारितोषिक.** ... | | ... | --- |
| ५९,७१९-९९ | **बेरीज पुढील पानावर ओढली** | | रु. | ६०,८४५-०३ |

८

शेडयूल VII

दिनांक ३१ मार्च १९७८

| १९७६–७७ रु. पै. | निधी व देणी | रु. पै. | रु. पै. |
| --- | --- | --- | --- |
| | **विश्वस्त निधी :** | | |
| | मागील ताळेबंदावरून. | | ९०,०९५-४ |
| | १९७७–७८ मधील आजीव | | |
| ९०,०९५-४५ | सदस्य वर्गणी. | | १७,१३६-० |
| | **इतर राखीव निधी :** | | १,०७,२३१-४ |
| | १ ) इमारत. | | ८९,६४४-९ |
| | २ ) ग्रंथालय. | | २३,५७३-१ |
| | ३ ) हीरक महोत्सव प्रकाशने | | |
| | मागील ताळेबंदावरून | २८,९२२-०४ | |
| | १९७७–७८ मधील विक्री | ३५०–५० | |
| | दि. ३१–३–७८रोजीचा साठा. | ४,२००–९५ | ३३,४७३-४ |
| | ४ ) वाङ्मयेतिहास योजना | | |
| | मागील ताळेबंदावरून | १,२०,१३४–१३ | |
| | १९७७–७८ मधील विक्री | ७,५१३–३५ | |
| | दि. ३१–३–७८ रोजीचा | | |
| | साठा. | ८,३३१–९५ | |
| | **वजा :** | १,३५,९७९–४३ | |
| | दि. १–४–७७ रोजीचा साठा. | १५,८४५–३० | १,२०,१३४-१ |
| २,९९,९१६–८६ | ५) प्रकाशन निधी | ... | ३३,०९१-२ |
| | **कर्जे :** | | २,९९,९१६-८ |
| | तारणावरील वा तारण न | | |
| ००-०० | दिलेली. | | |
| २,९०,०१२-३१ | बेरीज पुढील पानावर ओढली. | | रु. ४,०७,१४८-३ |

परिषद, पुणे—३०.

नियम (१) प्रमाणे

च्या ताळेबंद.

| १९७६–७७ रु. पै. | जिंदगी व येणी | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|---|
| | **स्थिर जिंदगी :** | | |
| | मागील ताळेबंदावरून इमारत | | १,०२,२५४–७० |
| | **वजा–घसारा –** | | |
| | मागील वर्षापर्यंतचा | ३३,२६३–२३ | |
| १६८,९९१–४७ | चालू वर्षाचा. | १,७२४–७९ | ३४,९८८–०२ |
| | **गुंतवणुका :** | | ६७,२६६–६८ |
| | **१) रोखे दर्शनी किंमतीचे –** | | |
| | ३ टक्के कन्व्ह. लोन १९४६ चे | ५,३००–०० | |
| | ३ टक्के कन्व्ह. लोन १९४६ चे | २,७००–०० | ८,०००–०० |
| | **२) शेअर्स –** | | |
| | सें. प्रॉव्हिन्सेस रेल्वेज (१००×२३) | २,३००–०० | |
| | म. स्टेट को–ऑप. बँक | १,२५०–०० | ३,५५०–०० |
| ११,५५०–०० | (५०×२५) | | ११,५५०–०० |
| | **फर्निचर व डेड-स्टॉक :** | | |
| | मागील ताळेबंदावरून | ३८,४४४–२१ | |
| | + १९७७–७८ ची खरेदी | १,८४५–३६ | ४०,२८९–५७ |
| | **वजा–घसारा :** | | |
| | मागील वर्षापर्यंतचा | २८,४८०–४८ | |
| ९,९६३–७३ | + चालू वर्षाचा | १,१८०–९० | – २९,६६१–३८ |
| | **ग्रंथालय :** | | १०,६२८–१९ |
| | मागील ताळेबंदावरून | ५१,६७०–३० | |
| | + १९७७–७८ ची खरेदी. | १,६६७–५५ | ५३,३३७–८५ |
| | **वजा–घसारा :** | | |
| | मागील वर्षापर्यंतचा | १०,८९३–८२ | |
| ४०,७७६–४८ | + चालू वर्षाचा. | ४,२४४–४० | १५,१३८–२२ |
| | **शिल्लक साठा :** | | ३८,१९९–६३ |
| | प्रकाशने | | ८,०४२–५७ |
| | वाङ्मयेतिहास प्रकाशने | | ८,३३१–९५ |
| | हीरक महोत्सव प्रकाशने | | ४,२००–९५ |
| २९,४६९–९९ | | | २०,५७५–४७ |
| १,६०,७५१–६७ | बेरीज पुढील पानावर ओढली | रु. | १,४८,२१९–९७ |

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल VII

दिनांक ३१ मार्च १९७८

| १९७६–७७ रु. पै. | निधी व देणी | रु. पै. | १९७७–७८ रु. पै. |
|---|---|---|---|
| ३,९०,०१२–३१ | मागील पानाची बेरीज पुढे ओढली | | ४,०७,१४८–३२ |
| | **देणी :** | | |
| | (१) कै. जांभेकर पारितोषिक. | १,०८०–०० | |
| | (२) कै. विश्वनाथ-पार्वती गोखले पारितोषिक. | ५,९३६–०० | |
| | (३) कै. ह. ना. आपटे पारितोषिक | १,०००–०० | |
| | (४) कै. अंतुकाका भिडे पारितोषिक. | ५००–०० | |
| | ५) कै. अ. स. व ह. स. गोखले पारितोषिक | २,०००–०० | |
| | (६) कै. शि. म. परांजपे पारितोषिक | ३,५००–०० | |
| | ७) सांगली शाखा पारितोषिक. | ४००–०० | |
| | ८) ग्रंथालय अनामत | ९,७०१–०० | |
| | ९) इतर देणी. | ७,९८६–०० | |
| २१,७९५–६० | १०) हिशेब तपासनीस. | ३५०–०० | ३२,४५३–०० |
| | **प्रॉव्हिडंट फंड :** | | |
| | मागील ताळेबंदावरून. | १०,२१९–७७ | |
| १०,२१९–७७ | +१९७७–७८ ची जमा. | १,२२०–५८ | ११,४४०–३५ |
| ४,२२,०२७–६८ | एकूण... रु. | | ४,५१,०४१–६७ |

आमच्या आजच्या तारखेच्या रिपोर्टानुसार.

पाटणकर अँड असोशिएट्स / चार्टर्ड अकौंटट्सकरिता,

पुणे,
दिनांक : १२ मे १९७८.

(एन्. सी. भळगट)
भागीदार

अनुक्रमणिका






## परिषद, पुणे—४११०३०

नियम ( १ ) प्रमाणे

## चा ताळेबंद ( पुढे चालू )

| १९७६–७७ रु. पै. | जिंदगी व येणी | रु. पै. | १९७७–७८ रु. पै. |
|---|---|---|---|
| १,६०,७५१-६७ | मागील पानाची बेरीज पुढे ओढली | | १,४८,२१९–९७ |
| | **वाङ्मयेतिहास योजना :** | | |
| | मागील वर्षाअखेरचा खर्च. ... | ६४,२११–१० | |
| ६४,२११–१० | १९७७–७८ चा खर्च. ... | ३,१२५–६५ | ६७,३३६–७५ |
| २६०–०० | **वीज बोर्ड अनामत.** ... | ... | २६०–०० |
| २४६–०० | **आयकर वसुली.** ... | | २४६–०० |
| २,१९९–५७ | **इतर येणी.** ... | | १,४४६–८७ |
| — | **महामंडळ कार्यालय खर्च येणे.** | | ५३७–१० |
| | **अखेर शिलका :** | | |
| | रोख. | १९३–२३ | |
| | बँक ऑफ महाराष्ट्र ( सेव्हिंग्ज ) | ८,०८४–९० | |
| | —,,— ( ठेवी ) | २२,४००–०० | |
| | गोखले बंधू पारितोषिक ( ठेव ) | २,०००–०० | |
| | शि. म. परांजपे ,, ( ठेव ) | ३,५००–०० | |
| | ग्रंथालय अनामत ( ठेव ) | १,००८–०० | |
| | स्टेट बँक विश्वस्त ( सेव्हिंग्ज ) | ७,८६१–२९ | |
| | स्टेट बँक ( ठेव ) | १५,८००–०० | |
| | स्टेट बँक ( ठेव ) | ५४,२००–०० | |
| | बँक ऑफ बडोदा ( ठेव ) | १२,०००–०० | |
| | बँक ऑफ बडोदा ( सेव्हिंग्ज ) | ३,७७५–४३ | |
| | बँक ऑफ बडोदा ( करंट ) | ६८४–९२ | |
| | प्रॉव्हिडंट फंड ( ठेव ) | ४,८००–०० | |
| | प्रॉव्हिडंट फंड ( सेव्हिंग्ज ) | ६,६४०–३५ | १,४२,९४०–१२ |
| १,१३,१४६–१९ | | | |
| | **तूट :** | | |
| | मागील ताळेबंदावरून. ... | ८१,२१३–१५ | |
| ८१,२१३–१५ | १९७७–७८ ची तूट. ... | ८,८४१–७१ | ९०,०५४–८६ |
| ४,२२,०२७–६८ | | एकूण.........रु. | ४,७१,०४१–६७ |

( १ ) वि. ग. कानिटकर
( २ ) राजा महाजन
( ३ ) म. श्री. दीक्षित, कार्यवाह

मो. रा. वाळंबे
कोषाध्यक्ष

( १ ) लक्ष्मणशास्त्री जोशी
( २ ) वि. त्र्यं. शेटे
विश्वस्त

अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य

## अर्थसंकल्प

**जमा**

| खाते | संकल्प ७७–७८ | प्रत्यक्ष ७७–७८ | संकल्प ७८–७९ |
|---|---|---|---|
| | रु. | रु. पैसे | रु. |
| व्याज व डिव्हिडंड | ८,५०० | ९,२३७–८३ | १०,००० |
| देणग्या | ७,००० | ९,९२५–२० | ८,००० |
| शासकीय अनुदान | ६,००० | ५,८२५–०० | ५,००० |
| महानगरपालिका अनुदान | ५०० | १,०००–०० | ५०० |
| साहित्य-संस्कृति-मंडळ (पत्रिका अनुदान) | ८,००० | ८,०००–०० | ८,००० |
| साहित्य-संस्कृति-मंडळ (वाङ्मयेतिहास अनुदान) | — | ५,०००–०० | — |
| ग्रंथालय अनुदान | २,५०० | १,८००–०० | २,००० |
| साधारण सभासद वर्गणी | १०,००० | १४,२०१–०० | ११,००० |
| संलग्न संस्था वर्गणी | २०० | १६५–०० | १५० |
| पत्रिका वर्गणी व जाहिरात | ५,००० | ३,२५६–५० | ४,००० |
| परीक्षा | २,००० | २,४३४–५० | २,००० |
| किरकोळ | २५० | — | ३०० |
| प्रकाशन विक्री | — | — | १,००० |
| न्या. रानडे पारितोषिक | ५० | — | ५० |
| पुणे नगर वाचन मंदिराकडून | २,००० | — | २,००० |
| विश्वस्तांकडून ठेवीवरील उत्पन्न | ५,००० | — | १२,००० |
| तूट | १३,३०० | ८,८४१–७१ | १२,२०० |
| एकूण बेरीज रुपये | ७०,३०० | ६९,६८६–७४ | ७८,२०० |

परिषद्—पुणे ४११०३०

१९७८—७९

खर्च

| खाते | संकल्प ७७–७८ | प्रत्यक्ष ७७–७८ | संकल्प ७८–७९ |
|---|---|---|---|
| | रु. | रु. पैसे | रु. |
| कर व भुईभाडे ... | ४०० | १५–०० | ५०० |
| इमारत दुरुस्ती व विमा ... | १,००० | १,३३६–४७ | ४,००० |
| फर्निचर व नवीन वस्तू .. | २,००० | ४९१–५० | २,००० |
| पगार व प्रॉ. फंड ... | ११,००० | १०,३१५–९३ | ११,००० |
| छपाई, टायपिंग व स्टेशनरी. ... | २,००० | २,२९९–८७ | २,५०० |
| टपाल व दूरध्वनी ... | २,००० | २,५३५–१५ | ३,००० |
| कार्यकारी मंडळ ... | १,८०० | १,५७१–८० | १,६०० |
| निवडणूक ... | १,००० | | ४,००० |
| प्रवास व प्रचार ... ... | १,००० | ५१९–४० | १,००० |
| वीज ... ... | १,००० | १,२४८–२५ | १,५०० |
| हिशोब तपासनीस ... ... | ३५० | ३५०–०० | ३५० |
| आतिथ्य ... ... | ७०० | ४६२–४५ | ६०० |
| विश्वस्त व्यवहार ... ... | १०० | ७–२० | १०० |
| किरकोळ ... ... | ५०० | ४३२–८१ | ५०० |
| घसारा ... ... | ८,००० | ७,१५०–०९ | ७,२०० |
| साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम ... | ४,५०० | ५,३२२–७० | ५,००० |
| महामंडळ खर्च ... ... | ६०० | ७१–७० | ३०० |
| शाखासभा हिस्सा ... ... | १,२०० | २,४३२–८८ | २'००० |
| परीक्षा ... ... | २,००० | १,९१६–०५ | २,००० |
| पत्रिका ... ... | २०,००० | २३,७५४–६१ | २०,००० |
| ग्रंथालय ... ... | ४,००० | ४,८८५–८५ | ५,००० |
| संशोधन ... ... | १,००० | १,७२९–५० | ३,००० |
| न्या. रानडे पारितोषिक ... ... | ५० | — | ५० |
| प्रकाशने ... ... | ३,१०० | ३१२–३५ | ५०० |
| पारितोषिके ... ... | — | ५०० | ५०० |
| एकूण बेरीज रुपये | ७०,३०० | ६९,६८६–७४ | ७८,२०० |

मो. रा. वाळंबे
कोषाध्यक्ष

वि. ग. कानिटकर
राजा महाजन
म. श्री. दीक्षित
कार्यवाह

( मागे पाहा )

अनुक्रमणिका

## जादा तरतुदींचा खुलासा--

**जमा बाजू :** ( १ ) विश्वस्तांकडून १९७७-७८ साली रु. ५,०००-०० खर्चासाठी येणे होते. ते पैसे खर्चास घेतले नाहीत. १९७८-७९ साली एकूण रु. १२,०००-०० घ्यावे लागतील. कारण परिषदेच्या इमारतींची डागडुजी व रंगसफेती ही कामे यंदा करावयाची आहेत. याकरिता इमारत दुरुस्तीसाठी रु. ४,०००-०० खर्चाच्या बाजूस दाखविले आहेत. याशिवाय १९७८-७९ मध्ये निवडणुका असल्याने हा खर्च सुमारे रु. ४,०००-०० होईल. मागील निवडणुकीचा खर्च यापेक्षा खूपच अधिक होता. खर्च कमी होण्याच्या दृष्टीने उपाय निराळ्या ठरावाने सर्वसाधारण सभेपुढे येईल. इमारत दुरुस्ती व निवडणूक या दोन्ही सदरांचा खर्च सुमारे रु. ८,०००-०० हा यंदा जादा असल्याने, १९७८-७९ चा अर्थसंकल्प हा १९७७-७८ च्या अर्थसंकल्पापेक्षा सुमारे रु. ८,०००-०० ने जास्त आहे.

( २ ) यापुढे प्रतिवर्षी विश्वस्तांकडून खर्चासाठी येणाऱ्या रकमेतून रु. १,५००-०० कमी घेतल्यास तीन वर्षांनी विश्वस्तांकडून निवडणुकीसाठी रु. ४,५००-०० घ्यावेत.

( ३ ) अर्थसंकल्पात रु. १२,२००-०० तूट दाखवली आहे. या तुटीचे दोन भाग आहेत. घसारा तूट आणि वास्तविक तूट.

| | |
|---|---|
| १९७८-७९ घसारा तूट | रु. ७,२००-०० |
| वास्तविक तूट. | रु. ५,०००-०० |
| एकूण ... | रु. १२,२००-०० |

साधारण सभासद वर्गणी व देणग्या या अर्थसंकल्पात दाखविलेल्या रकमांपेक्षा सुमारे ४,०००।- रुपयांनी अधिक असतील व वास्तविक तूट हजाराच्याच आतबाहेर राहील असा विश्वास वाटतो.

### घसारा तपशील
### ( १९४७ ते १९७८ )

| | इमारत | फर्निचर | ग्रंथालय | एकूण |
|---|---|---|---|---|
| १९४७ ते ७७ | ३३२६३-२३ | २८४८०-४८ | १०८९३-८२ | ७२६३७-५३ |
| १९७७-७८ | १७२४-७९ | ११८०-९० | ४२४४-४० | ७१५०-०९ |
| एकूण | ३४९८८-०२ | २९६६१-३८ | १५१३८-२२ | ७९७८७-६२ |

# महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे ३०

## १९७७-७८ चे कार्यवृत्त

---

परिषदेच्या सांप्रतच्या कार्यकारी मंडळाच्या दुसऱ्या वर्षातील कार्याचे वृत्त सादर करीत आहोत :

### सभासदसंख्या

| वर्ग | वर्षारंभी | वर्षअखेर |
| --- | --- | --- |
| उपकर्ते | ३ | २ |
| आश्रयदाते | ८ | ७ |
| सहायक | २२ | २१ |
| हितचिंतक | २३ | २२ |
| आजीव | ८०८ | ८८४ |
| वार्षिक ( साधारण ) | १२९० | १७७४ |
| एकूण | २१५४ | २७१० |

निधन पावलेल्या व कमी झालेल्या सभासदांची घट वजा करून वर्षअखेरची ही संख्या दर्शविली आहे. ७७–७८ या वर्षी प्रत्यक्षात आजीव ९० आणि वार्षिक ७१५ असे एकूण ८०५ सभासद नवीन झाले. आजीव सभासदांच्या वर्गणीची रक्कम रु. १७१३६–०० गतवर्षाप्रमाणेच विश्वस्तांकडील स्थिरनिधीत गुंतविली आहे. त्यामुळे संस्थेच्या उत्पन्नात व्याजरूपाने दरवर्षी सुमारे रु. ३५०० ची भर पडेल. शाखा-सभांनी ( विशेषतः सातारा, आणि सोलापूर ) चांगले सहकार्य दिल्यामुळे वार्षिक सभासदसंख्येत लक्षणीय भर पडल्याचे दिसून येईल. थकीदार सभासद सुमारे ३५० असूनदेखील यंदा वर्गणी जमा होण्याचा उच्चांक गाठला गेला. स्थानिक पदाधिकाऱ्यांच्या विशेष प्रयत्नांमुळे गेल्या दोन वर्षात १८० नवीन आजीव सभासद परिषदेला लाभले, हामुद्धा संस्थेच्या इतिहासात एक उच्चांक आहे.

### साहित्यपत्रिका

वृत्तवर्षात डॉ. हेमंत विष्णू इनामदार यांच्या संपादकत्वाने 'पत्रिके'चे जून, सप्टेंबर व जानेवारी महिन्यांत तीन अंक प्रकाशित झाले. पैकी पहिला २००–२०१

या सहामाही जोडअंक सुमारे १८० पृष्ठांचा होता. पुढले दोन प्रत्येकी सुमारे ९० पृष्ठांचे होते. 'पत्रिके'चा खर्च अर्थसंकल्पानुसार करण्याचा यंदा यत्न केला. परंतु सभासदसंख्येत अपेक्षेपेक्षा वाढ झाल्यामुळे खर्च वाढला. वार्षिक १० रु. वर्गणीत सुमारे ८०–९० पृष्ठांचे चार अंक पाठविणे आर्थिक दृष्ट्या न परवडणारी गोष्ट होत चालली आहे. तथापि परिषद आणि सभासद यांना जोडणारे एक उपयुक्त माध्यम म्हणून संस्था हे त्रैमासिक आजवर चालवीत आलेली आहे.

## कै. वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालय

ग्रंथालयात वर्षारंभी १७७८२ ग्रंथसंख्या होती. यामध्ये नवीन खरेदी, अभिप्रायार्थ आणि भेटीदाखल आलेल्या ५८७ ग्रंथांची भर पडून आता एकूण संख्या १८३६९ अशी आहे.

प्रा. गं. बा. सरदार, श्रीमती ज्योत्स्ना भोळे, डॉ. भीमराव कुलकर्णी आणि श्री. गो. कृ. पटवर्धन यांनी आपल्या संग्रहीचे काही ग्रंथ आणि नियतकालिकांचे बांधीव अंक ग्रंथालयास भेट दिले. परिषद याबद्दल त्यांची ऋणी आहे. वीस रुपये अनामत ठेवून सभासदांना ललित स्वरूपाची पुस्तके घरी वाचण्यासाठी देण्यात येतात. प्रस्तुत योजना ग्रंथालय-संचालकांच्या अनुमतीने गतवर्षापासून कार्यवाहीत आणली गेली. आजमितीस सुमारे २५० सभासद या योजनेचा लाभ घेत आहेत. याशिवाय ग्रंथालयात सकाळ-संध्याकाळ बसून वाचणाऱ्यांची संख्या दररोज सरासरी २५ असते. विद्यार्थी आणि अभ्यासक यांना शक्य तितके सहकार्य ग्रंथालयाकडून दिले जाते.

## संशोधन कार्य

संशोधन-समितीतर्फे 'भाषा व साहित्य : संशोधन पद्धती' हा ग्रंथ डॉ. वसंत स. जोशी यांनी संपादित केला आहे. मराठी भाषा आणि साहित्य या क्षेत्रात कार्य करणाऱ्या सुमारे तीस तज्ज्ञ लेखकांचे निबंध या ग्रंथात समाविष्ट केलेले आहेत. अभ्यासक, संशोधक आणि जिज्ञासू अशा सर्वांना हा ग्रंथ नित्य उपयोगी पडेल. ग्रंथाची पृष्ठे डेमी सुमारे पाचशे राहतील व तो लवकरच प्रकाशित होईल.

## वाङ्मयेतिहास योजना

खंड २ चे (इ. स. १२५०–१६८०) संपादनकार्य गेली दोनतीन वर्षे डॉ. स. गं. मालशे करीत होते. या खंडातील सर्व विषयांवरील लेख हाती आले असून त्यांची टंकलिखित मुद्रणप्रत आता तयार होत आली आहे. प्रस्तुत खंड साहित्य-संस्कृती मंडळाच्या साहाय्याने १९७८ अखेर प्रकाशित होईल. खंड १ चे संपादन एक वर्षापूर्वी डॉ. हेमंत इनामदार यांच्यावर सोपविण्यात आले. १९७८ अखेर या खंडाचा सर्व मजकूर हाती येईल. प्रत्यक्षात तो १९७९ मध्ये प्रकाशित करता येईल. खंड ६

चा ( १९२१ ते १९७५ ) आराखडा, संपादन आणि लेखकांची निवड या तिन्ही बाबतीत नव्याने योजना आखली जात आहे.

## स्मृतिदिन

परिषदेतर्फे प्रतिवर्षी काही स्मृतिदिन पाळले जातात. पूर्वप्रथेनुसार पुढील कार्यक्रम यंदा झाले : १० एप्रिलला ज्ञानकोशकार कै. श्री. व्यं. केतकर यांच्या स्मारकास सकाळी पुष्पांजली वाहण्यात आली व सायंकाळी परिषदेच्या सभागृहात प्रा. गंगाधर पानतावणे यांचे ' मराठीतील उपेक्षित वृत्तपत्रसृष्टी ' या विषयावर भाषण झाले. दलितांच्या दुर्लक्षित अशा वृत्तपत्रीय कामगिरीची व्याख्यात्यांनी चांगली माहिती करून दिली. श्री. ल. ना. गोखले यांनी अध्यक्ष या नात्याने उचित समारोप केला. कमला नेहरू उद्यानातील कै. केतकर स्मारकाभोवतीची जागा उद्यान-अधीक्षक श्री. गोडसे यांनी मोठ्या हौसेने फरसबंद व आकर्षक केली याबद्दल संस्था त्यांची ऋणी आहे.

परिषदेच्या वास्तूची जागा ज्यांच्या कृपेमुळे लाभली त्यांचा, म्हणजे कै. बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांचा स्मृतिदिन संस्था कृतज्ञतापूर्वक पाळते. यंदा या दिवशी प्रा. लीला अर्जुनवाडकर व्याख्यात्या म्हणून लाभल्या होत्या. डॉ. हेमंत इनामदार यांच्या अध्यक्षतेखाली ' संस्कृत साहित्यातील अपौरुषेय सृष्टी 'चे त्यांनी श्रोत्यांना रुचिरदर्शन घडविले.

कै. माधव जूलियन यांचा स्मृतिदिन २९ नोव्हेंबरला साजरा करण्यात आला. याप्रसंगी डॉ. म. वि. गोखले यांचे भाषाशुद्धीच्या संदर्भात ' पटवर्धन आणि सावरकर ' या विषयावर अभ्यासपूर्ण भाषण झाले. अध्यक्षस्थानी प्रा. स. शि. भावे होते.

## नवे उपक्रम

( अ ) काही जुन्या मौलिक ग्रंथांचा परिचय आजच्या वाचकांस करून देण्याच्या हेतूने ' शारदीय व्याख्यानमाला ' गतवर्षीपासून सुरू करण्यात आली. मालेचे यंदाचे दुसरे वर्ष होते. आक्टोबर ७७ मध्ये मालेत सात व्याख्याने गुंफिली गेली. दिनांक, व्याख्याता, विषय, अध्यक्ष या क्रमाने ती येणेप्रमाणे :

| | | | |
|---|---|---|---|
| दि. १३ | डॉ. शं. गो. तुळपुळे, | ' महाराष्ट्र सारस्वत, ' | डॉ. वि. रा. करंदीकर. |
| दि. १५ | डॉ. भालचंद्र फडके, | ' माझे रामायण, ' | प्रा. गो. म. कुलकर्णी |
| दि. १६ | प्रा. बाळकृष्ण कवठेकर, | ' कीचकवध, ' | प्रा. म. ना. अदवंत. |
| दि. १७ | प्रा. भालचा केळकर, | ' म्युनिसिपालटी, ' | डॉ. प्र. रा. भुपटकर. |
| दि. १८ | डॉ. गो. मा. पवार, | ' सुदाम्याचे पोहे, ' | डॉ. म. वि. गोखले. |
| दि. १९ | डॉ. हरिभाऊ तोडमल, | ' कमला-काव्य , ' | डॉ. अनुराधा पोतदार. |
| दि. २० | डॉ. द. ता. भोसले, | ' पाणकळा, ' | डॉ. आनंद यादव. |

दि. २१ ऑक्टोबर रोजी सकाळी श्री. सरस्वतीपूजन आणि ग्रंथपूजन प्राचार्य वेणी यांच्या हस्ते होऊन मालेची सांगता झाली.

अनुक्रमणिका

( आ ) नवीन दर्जेदार पुस्तकांकडे वाचकांचे लक्ष वेधावे या हेतूने ' अभिप्राय ' ही एक नवीन चर्चामाला यंदा सुरू करण्यात आली. मालेचे उद्‌घाटन २७ ऑक्टोबरला प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते झाले. त्याप्रसंगी प्रा. स. शि. भावे यांनी श्री. भालचंद्र नेमाडे यांच्या ' कोसला ', ' बिढार ' व ' जरीला ' या तीन कादंबऱ्यांची आलोचना केली. दि. १३ फेब्रुवारी व १३ मार्च रोजी डॉ. भालचंद्र फडके आणि प्रा. राम बापट यांनी ' कॅलिडोस्कोप ' ( अच्युत बर्वे ) आणि ' सिंहासन ' ( अरुण साधू ) या दोन कादंबऱ्यांचा परामर्श घेतला. दरमहा एका नवीन ग्रंथावर चर्चा व्हावी अशी ही योजना आहे. ती कार्यवाहीत आणण्याच्या कामी डॉ. वि. भा. देशपांडे आणि श्री. गजानन क्षीरसागर यांचे परिषदेला उत्कृष्ट सहकार्य लाभत आहे चर्चाप्रसंगी ' मराठी ' ग्रंथ प्रकाशक परिषदे 'तर्फे रसिक साहित्य संस्था ' नव पुस्तकांचे एक प्रदर्शनही भरवीत असते.

( इ ) गुजराती, सिंधी आणि महाराष्ट्रीयेतर लोकांसाठी मराठी या भाषांचे वर्ग चालविण्याचा उपक्रम या वर्षी प्रथमच सुरू करण्यात आला. प्रस्तुत भाषाशिक्षण वर्गाचे उद्‌घाटन २३ जुलैला कै. ग. दि. माडगूळकर यांच्या अध्यक्षतेखाली श्री. अतुर संगतानी यांच्या हस्ते झाले. वर्ग चारपाच महिने चालू होते. उपस्थिती २५–३० होती. जानेवारी ७८ मध्ये परीक्षांना बारा उमेदवार बसले व ते सर्वजण उत्तीर्ण झाले. प्रा. न. म. जोशी, श्री. कमल जोगळेकर ( सिंधी ), श्रीमती लीला गोळे व श्रीमती वर्षा कुलकर्णी ( गुजराती ), श्री. मो. रा. वाळंबे, डॉ. दत्ता वाळवेकर, डॉ. सुहास मेहेंदळे, श्री. कुलकर्णी यांनी ( मराठी ) वर्गांना मार्गदर्शन केले.

## साहित्य संमेलन

मराठी साहित्य महामंडळाच्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे ५२ वे अधिवेशन पुणे येथे दि. १८, १९ व २० नोव्हेंबर रोजी श्री. पु. भा. भावे यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. ' पुणे नगर वाचन मंदिर ' ही संमेलनाची निमंत्रक-संस्था परिषदेच्या कार्यक्षेत्रात असल्यामुळे, महामंडळाची घटकसंस्था या नात्याने परिषदेला संमेलनकार्याची बरीच जबाबदारी पार पाडावी लागली.

संमेलनाध्यक्षांच्या निवडणुकीपूर्वी, जुलैच्या तिसऱ्या आठवड्यात, अध्यक्षपदासाठी उभ्या असलेल्या तिघा सन्माननीयांची भाषणे परिषदेने आयोजित केली होती. दि. २७ व २८ जुलैला प्रा. गंगाधर गाडगीळ आणि श्री. पु. भा. भावे यांची अनुक्रमे ' हरिभाऊंची सदाशिव पेठ ' आणि ' माझ्या साहित्यविषयक कल्पना ' या विषयांवर राज्यशिक्षणशास्त्र संस्थेच्या सभागृहात भाषणे झाली. तिसरे श्री. प्रभाकर पाध्ये यांचे भाषण काही अडचणीमुळे होऊ शकले नाही. त्यामुळे २९ रोजी ' साहित्य संमेलनाचे स्वरूप ' या विषयावर एक परिसंवाद आयोजित केला होता. श्री. वि. ग. कानिटकर

परिसंवादाचे नियंत्रक होते. श्री. रंगा मराठे, प्रा. न. म. जोशी, श्री. ह. मो. मराठे, डॉ. म. वि. गोखले आणि प्रा. शरद वाव यांनी या प्रसंगी आपले विचार मोकळे-पणाने मांडले.

संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. पु. भा. भावे यांचा १३ ऑगस्टला प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेखाली प्रकट सत्कार करण्यात आला. श्री. बबनराव नावडीकर यांच्या महाराष्ट्र गीतगायनाने समारंभास आरंभ झाला. नंतर प्रा. द. मा. मिरासदार, श्री. व्यंकटेश माडगूळकर, श्रीमती आशा काळे, कु. अरुणा ढेरे, कु. अनघा कुलकर्णी, प्रा. न. म. जोशी, आणि नाटककार श्री. विद्याधर गोखले यांची श्री. भावे यांच्यासंबंधी जिव्हाळ्याची भाषणे झाली. विविधसंस्था, प्रा. ना. सी. फडके, श्री. गो. नी. दांडेकर, आणि इतर काही व्यक्ती यांच्यामार्फत अध्यक्षांना हार अर्पण करण्यात आल्यावर त्यांचे उत्तरादाखल कृतज्ञतेचे भाषण झाले आणि भरगच्च गर्दीत हा कार्यक्रम संपला.

नोव्हेंबरच्या तिसऱ्या आठवड्यात गरवारे महाविद्यालयाच्या आवारातील ' म. फुले मंडपा 'त संमेलन साजरे झाले. त्याचा वृत्तान्त बहुतेक वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाला आहे व पुणे नगर वाचन मंदिरातर्फे तपशीलवार प्रसिद्ध होणार आहे. परिषदेने साहित्य-विषयक कार्यक्रम आणि स्मरणिका ( ' पुण्याई ' ) संपादन ही दोन कामे स्वीकारलेली होती. ' पुण्याई 'चे संपादन डॉ. हेमंत इनामदार आणि प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी केले व सर्वश्री. श्री. ज. जोशी, मो. रा. वाळंबे, वि. ग. कानिटकर आणि म. श्री. दीक्षित यांनी संपादकांना साहाय्य केले. स्वागताध्यक्ष श्री. ग. ल. ठोकळ, परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. श्री. ज. जोशी, डॉ. हेमंत इनामदार, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. सरोजिनी बाबर, डॉ. वि. रा. करंदीकर, श्री. श्री. पु. गोखले, डॉ. म. वि. गोखले, श्री. वि. स. वाळिंबे, प्रा. गो. म. कुलकर्णी, सौ. शैलजा राजे, सौ. शांता निसळ, श्री. म. श्री दीक्षित ( निमंत्रक ) इत्यादींच्या सल्लामसलतीने संमेलनातील कार्यक्रम आखण्यात आले होते. संमेलनाच्या शेवटच्या दिवशी खुल्या अधिवेशन प्रसंगी दलित पँथर, युक्रांद इत्यादींच्या निदर्शनामुळे भरगच्च कार्यक्रमांकडे दुर्लक्ष झाले याचा परिषदेला इतर सर्वांप्रमाणे खेद झाला.

## व्याख्यानादी कार्यक्रम

४ एप्रिलला प्राचार्य राम शेवाळकर ( वणी ) यांचे ' प्रभू रामचंद्र : आक्षेप व निरसन ' या विषयावर प्रा. अरविंद मंगरूळकर यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान झाले.

२० ऑगस्टला झालेल्या डॉ. चंद्रशेखर बर्वे यांच्या व्याख्यानाचा विषय ' तेंडुल-करांची वादग्रस्त नाटके' हा होता. प्रा. स. शि. भावे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या

या व्याख्यानात श्री. वर्वे यांनी तेंडुलकर यांची नाट्यवैशिष्ट्ये साधार व सूक्ष्मपणे उलगडून दाखविली.

वाईचे श्री. सर्जेराव काळे ( सायकलप्रवासी ) यांनी आपल्या भारतभ्रमणातील काही रोमांचकारी अनुभव २७ ऑगस्ट रोजी कथन केले.

श्री. यशवंत कानिटकर ( रॅचेस्टर—अमेरिका ) हे जुलै महिन्यात भारतात आले होते. पुणे येथील मुक्कामात जिल्हा पत्रकार संघाच्या सहकार्याने परिषदेने त्यांच्या व्याख्यानाचा कार्यक्रम आयोजित केला होता. या प्रसंगी श्री. कानिटकर यांनी आणी-बाणीच्या काळात अमेरिकेतील भारतीयांनी विचारस्वातंत्र्याबाबत जी चळवळ केली तिची साद्यंत हकिगत खुमासदार शैलीत कथन केली. श्री. बा. रं. सुंठणकर हे या वेळी अध्यक्ष होते.

## भेटीगाठी, सत्कार इत्यादी

सुप्रसिद्ध कथालेखिका श्रीमती वसुंधरा पटवर्धन आणि ज्येष्ठ कथाकादंबरीकार श्री. दत्त रघुनाथ कवठेकर यांनी नुकतीच अनुक्रमे साठी व पंचाहत्तरावी ओलांडली. या निमित्ताने दोघांच्या मुलाखतींचा व सत्काराचा हृद्य कार्यक्रम अनुक्रमे दि. १४ जून व १८ सप्टेंबर रोजी करण्यात आला. नाशिकचे विनोदी कथाकार डॉ. अ. वा. वर्टी यांनी ६६ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल परिचितांच्या उपस्थितीत त्यांचाही सत्कार करण्यात आला. श्री. ना. ग. तथा नानासाहेब गोरे हे मराठीतील एक शैलीकार लेखक आणि परिषदेचे पूर्वाध्यक्ष. भारताचे राजदूत म्हणून इंग्लंडमध्ये त्यांची नियुक्ती झाल्यामुळे परिषदेला साहजिकच आनंद झाला. हा आनंद व्यक्तविण्या-साठी काही निमंत्रितांसमवेत १२ सप्टेंबरला श्री. नानासाहेब यांच्याशी गप्पागोष्टी करण्यात आल्या आणि त्यांचा हार्दिक सत्कार करण्यात आला. कोकणीचे खंदे लेखक श्री. रवींद्र केळेकर यांना आपली भूमिका मांडण्यासाठी ७ डिसेंबरला परिषदेने आमंत्रित केले होते. श्रीपाद जोशी यांच्या अध्यक्षतेखाली श्री. रवींद्र केळेकर यांचे सुश्राव्य व उद्बोधक व्याख्यान झाले.

वृत्तवर्षात परिषदेला भेटी देऊन कार्यकर्त्यांसमवेत ज्यांनी गप्पागोष्टी केल्या अशा व्यक्तींत पुणे जिल्हाधिकारी श्री. दिनेश अफझुलपूरकर, शिक्षण संचालक प्रा. वि. वि. चिपळूणकर, भागलपूर विद्यापीठाचे डॉ. हरिमोहन मिश्री, विक्रम विद्यापीठाचे डॉ. राममूर्ती त्रिपाठी, सिंधी लेखक व दिग्दर्शक श्री गोविंद मल्ही आणि बेळगावचे उद्योग-पती श्री. या. म. गोगटे यांचा समावेश होता. या सर्वांचा परिषदेतर्फे सत्कार करण्यात आला.

भारताचे पंतप्रधान श्री. मोरारजीभाई देसाई हे २७ डिसेंबर रोजी, पुण्यात आले असता, दुपारी परिषदेत येऊन त्यांनी काही लेखक, पत्रकार व विचारवंत यांच्या

समेत अर्धा तास मोकळेपणाने चर्चा केली. प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. दे. द. वाडेकर, कुलगुरू देवदत्त दाभोळकर, डॉ. मा. प. मंगुडकर, श्री. ग. वा. बेहेरे, श्री. श्रीपाद जोशी, डॉ. भालचंद्र फडके, डॉ. भीमराव कुलकर्णी, डॉ. आनंद यादव इत्यादींनी विचारलेल्या प्रश्नांना श्री. देसाई यांनी मराठीत उत्तरे दिली. परिषदेतर्फे त्यांचा सत्कार करण्यात आला व काही प्रकाशने भेट म्हणून देण्यात आली. नामदार श्री. मोहन धारिया व मुख्यमंत्री श्री. वसंतरावदादा पाटील हे याप्रसंगी उपस्थित होते.

महाराष्ट्र शासनाकडून यंदा पुण्यातील ज्या लेखकांना ग्रंथपारितोषिके मिळाली, त्यांचा व त्यांच्या प्रकाशकांचा २९ जून रोजी परिषदेने श्री. ग. ल. ठोकळ यांच्या अध्यक्षतेखाली प्रकट सत्कार केला. अशा प्रकारचा सत्कार-सोहळा हा प्रथमच झाला. श्रीमती सरोजिनी शारंगपाणी, श्री. सतीश आळेकर, श्री. श्री. ग. माजगावकर, श्री. वा. ल. नलावडे, श्री. ह. मो. मराठे आणि प्रा. वसंत मिरासदार यांची भाषणे झाली.

२८ ऑगस्टला पुण्यातील प्रशालांचे मुख्याध्यापक आणि मराठीचे अध्यापक यांचा एक मेळावा परिषदेतर्फे भरविण्यात आला होता. प्रा. अशोक कामत, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. हेमंत इनामदार, प्रा. न. म. जोशी, श्री. मो. रा. वाळंबे, श्री. सु. द. तांबे प्रभृतींनी या मेळाव्यात विशेष भाग घेतला.

## श्रद्धांजली

परिषदेचे अध्यक्ष व संमेलनाचे पूर्वाध्यक्ष कविवर्य ग. दि. माडगूळकर यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी ३१ डिसेंबरला सभा भरली होती. प्रा. द. मा. मिरासदार यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या या सभेला सर्वश्री राजा मंगळवेढेकर, शंकर पाटील, भीमराव कुलकर्णी, मधुकर कुलकर्णी, शिवाजी सावंत, ग. ल. ठोकळ, ग. वा. बेहेरे, विद्याधर पुंडलिक व सौ. संजीवनी मराठे यांनी भाषणे करून आणि डॉ. वाळवेकर यांनी एक गीत गाऊन कै. माडगूळकर यांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहिली.

कविवर्य प्रा. पु. शि. रेगे यांचे निधन ही वृत्तवर्षातील दुसरी शोककारी घटना. कै. रेगे यांना दि. १ मार्च रोजीच्या सभेत श्रद्धांजली वाहण्यात आली. या वेळी अध्यक्ष श्री. प्रभाकर पाध्ये, प्रा. अदवंत, प्रा. सौ. लीला अर्जुनवाडकर आणि प्रा. मंगरूळकर यांची भाषणे झाली व शेवटी सभेने कै. रेगे यांना श्रद्धांजली वाहिली.

## ग्रंथपारितोषिके

परिषदेकडे काही साहित्यप्रेमी व्यक्तींनी ठेवलेल्या रकमेवरील व्याजातून दरवर्षी पारितोषिके दिली जातात. यंदा पुढील पारितोषिके देण्यात आली : ( १ ) कवी कै. ह. स. गोखले यांच्या स्मरणार्थ शंभर रुपये 'अरुण कोलटकरच्या कविता'–अरुण कोलटकर. ( २ ) रत्नाकर मासिकाचे संचालक कै. अ. स. गोखले यांच्या स्मरणार्थ शंभर रुपये 'सार्थ श्रीज्ञानेश्वरी' या संपादित ग्रंथाचे प्रकाशक श्रीविद्या प्रकाशनचे

श्री. मधुकाका कुलकर्णी यांना. (३) कै. विश्वनाथ-पार्वती गोखले यांच्या स्मरणार्थ ललितेतर ग्रंथास दीडशे रुपये 'वाङ्मयीन आकलन' प्रा. रा. ग. जाधव यांना. (४) कै. गिरिजा गंगाधर जांभेकर यांच्या स्मरणार्थ संपादित ग्रंथास दीडशे रुपये 'बाळक्रीडा' (मुरारीमल्लविरचित) चे संपादक डॉ. रा. चिं. ढेरे आणि श्री. मो. मा. वाळिंबे यांना. (५) कै. शि. म. परांजपे यांच्या स्मरणार्थ अडीचशे रुपये उत्कृष्ट गद्यग्रंथास 'चक्रपाणी'–श्री. रा. चिं. ढेरे यांना हे पारितोषिक प्रत्यक्षतः एक ऑगस्ट रोजी देण्यात येईल. श्री. नी. स. तथा बाळासाहेब गोखले यांनी प्रस्तुत पारितोषिकासाठी तीन हजार रुपयांची देणगी परिषदेला दिली असून, केसरी मराठा संस्थेने आणखी पाचशे रुपयांची भर या देणगीत घातली आहे.

पारितोषिकांची शिफारस करण्यासाठी डॉ. स. गं. मालशे, डॉ. मु. श्री. कानडे, डॉ. व. स. जोशी, प्रा. रमेश तेंडूलकर, प्रा. गोविंद जोशी, प्रा. सौ. ललिता कुंभोजकर, श्री. य. गो. तथा दादा जोशी आणि चित्रकार श्री. अनंत सालकर यांचे बहुमोल सहकार्य मिळाले. परिषद या सर्वांची ऋणी आहे.

## साभार भेटी

त्रैमासिके : मराठी संशोधनपत्रिका, भारतीय इतिहास आणि संस्कृति, व अस्मितादर्श. द्वैमासिके : समाजप्रबोधनपत्रिका, युगवाणी, उन्नति, पंचधारा.

मासिके : आनंद, आलोचना, इये मराठीचिये नगरी, उद्यम, एकता, किर्लोस्कर, किशोर, कुमार, क्रीडाखबर, प्रतिष्ठान, प्रसाद, बळीराजा, मधुकंस, मनोरा, माय-मराठी, माहेर, मेनका, नवभारत, नामदेवहितवर्धक, नवनीत, रोहिणी, राजस, ललित, वाचनालय, विशाखा, सन्मति, संपदा, सात्विकसमर्थ, स्वस्तिश्री, स्पॅन, ज्ञानोदय, आरोग्यदीप, व श्री दीपलक्ष्मी.

पाक्षिके : समाजपत्रिका, सोविएत देश, लोकराज्य, व रुद्रवाणी.

साप्ताहिके : गोफण, दीनबंधू, विवेक, माणूस, मार्मिक, साधना, प्रतोद, प्रबोध-चंद्रिका, प्रेरणा, व मराठवाडा

दैनिके : सकाळ, संध्या, विशाल सह्याद्री, तरुणभारत (नागपूर) व गोमंतक.

## शाखासभा

अहमदनगर, सोलापूर, सांगली, कोल्हापूर, सातारा आणि धुळे या ठिकाणी परिषदेच्या शाखांचे कार्य समाधानकारक रीत्या चालू आहे. सातारा व सोलापूर येथील शाखेच्या कार्यकर्त्यांनी सभासदवाढीचा यंदा पद्धतशीर यत्न केला. परिषदेचे पदाधिकारी श्री. श्री. ज. जोशी, कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित आणि कोषाध्यक्ष श्री. मो. रा. वाळंबे व श्री. न. म. जोशी यांनी सोलापूर, सांगली, कोल्हापूर आणि अहमदनगर या शाखांना भेटी देऊन सभासदांशी संपर्क साधला आणि प्रचारकार्य केले. शाखांच्या कार्यातील

अडचणीही समजून घेतल्या. अध्यक्ष प्रा. गं. बा. सरदार यांनी अहमदनगरला सभासदांच्या मेळाव्यास मार्गदर्शन केले. शाखांकडून या वर्षी झालेल्या कार्याचे ठळक वृत्त येणेप्रमाणे— १. धुळे : (कार्याध्यक्ष प्रा. कुसुमाकर शिंपी) – राजवाडे संशोधन मंडळाच्या सभागृहात प्रा. म. ना. अदवंत ( तांबे यांची प्रेमकविता ), प्रा. गं. बा. सरदार ( साहित्य व सामाजिक जाणिवा ), श्री. गो. नी. दांडेकर ( वाघुरा कादंबरी ), प्रा. ल. के. कुळकर्णी ( गीतरामायण ), डॉ. मा. प. मंगुडकर ( एक चिंतन ) यांची व्याख्याने, श्री. ल. गो. भागवत यांच्या हस्ते काव्यशाखेची स्थापना, स्थानिक पत्रकार प्रा. डॉ. यु. व. शहा यांचा प्राचार्य श्री. सदाशिव माळी यांच्या हस्ते सत्कार, कवी अनिल आणि प्रा. कृ. ब. निकुंब यांचे अभिनंदन इत्यादी. २. सांगली : (कार्यवाह श्री. श्रीनिवास शिंदगी)- कवी सुधांशु यांच्या षष्ठ्यब्दपूर्तीनिमित्त पं. महादेवशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार, कवी पुरुषोत्तम जतकर कृत 'ॐकार लहरी' गीतकाव्याचे श्री. मधुकर दिवाकर यांचे श्री. बापूसाहेब चाफळकर यांच्या अध्यक्षतेखाली गीतगायन. ३. अहमदनगर : ( अध्यक्ष श्री. द. बा. डावरे )—राज्य नाट्यपरीक्षक मंडळाचे श्री. वसंत शांताराम देसाई, डॉ. यू. म. पठाण, श्रीमती शांता शेळके, श्रीमती ज्योत्स्ना त्रिभुवन, श्री. अशोकजी परांजपे यांच्यासमवेत सभासदांचा मेळावा व गप्पागोष्टी, आंतक नाटकाचे लेखक श्री. सासणे व दिग्दर्शक श्री. भोंजाळ यांचा सत्कार, कै. चिं. त्र्यं. खानोलकर यांचा प्रथम स्मृतिदिन व 'संज्ञा' अनियतकालिकाचे प्रकाशन, प्रा. सौ. मेधा काळे यांच्या 'कोणार्क ते कन्याकुमारी' या प्रवासवृत्तात्मक पुस्तकाचे प्रकाशन. ४. सातारा :( कार्यवाह श्री. वि. दि. वाघ )-शाखा-कार्यास नव्याने चालना, विद्यार्थिवर्गासाठी समूहगीत स्पर्धा, नाट्यछटास्पर्धा, व्याख्यानमाला इत्यादी कामे. ५. सोलापूर : ( कार्याध्यक्ष श्री. दत्ता हलसगीकर )-डॉ. ग. श्री. खैर यांचे गीतेसंबंधी प्रवचन, कथाकथन ( श्रीमती शांता बुद्धिसागर, सौ. सुनंदा भिडे, श्री. व्यंकटेश कामतकर, व मनोहर देवगे ), काव्यवाचन ( सौ. विजया जहागिरदार ), प्रकाशन समारंभ ( डॉ. वि. म. कुलकर्णी, कवी राजीव आणि श्री. र. पां. देशपांडे यांच्या कविता-संग्रहाचे ), गीतगायन ( ग. दि. मां. चा कविता ), डॉ. यू. म. पठाण यांच्याशी गप्पागोष्टी इत्यादी. ६. कोल्हापूर– दि. १९ फेब्रुवारी रोजी सायंकाळी साहित्य परिषदेचे कोषाध्यक्ष श्री. मो. रा. वाळंबे आणि कार्यवाह श्री. म. श्री. दीक्षित यांच्यासमवेत शाखेचे कार्यकर्ते श्री. मा. ग. पातकर, श्री. अशोक भोइटे, प्रा. सौ. मधुमालती कोटीभास्कर प्रभृतींनी प्रचार कार्याबाबत मनमोकळी बोलणी केली. सायंकाळी ६॥ वाजता करवीर नगर मंदिरात श्री. वाळंबे यांच्या अध्यक्षतेखाली स्थानिक कवींचे कविसंमेलन झाले. याप्रसंगी नवोदित कवींना उद्देशून श्री. वाळंबे यांनी मार्गदर्शनपर भाषण केले.

शाखासभांना यंदा परिषदेच्या पदाधिकाऱ्यांनी प्रथमच भेटी दिल्या, तेथील मेळाव्या-तून प्रचार कार्य केले व अडीअडचणी समजावून घेतल्या. शाखांचे कार्य जोमाने चाल-विण्यासाठी केंद्रीय कार्यालयाकडून आर्थिक व इतर बाबतींत अधिक सहकार्य मिळणे

अनुक्रमणिका

आवश्यक आहे असे दिसून आले. परिषद आगामी वर्षात या दृष्टीने अवश्य विचार करील.

**वस्तुभेटी**

श्री. वि. ग. कानिटकर यांनी परिषदेला एक मोठे घड्याळ व श्री. ग. रं. भिडे (कोल्हापूर) यांनी ज्ञानकोशकार कै. केतकर यांचे तैलचित्र भेट म्हणून दिले. परिषद या उभयतांचे फार आभारी आहे.

**आर्थिक स्थिती**

गतवर्षाप्रमाणे यंदाही परिषदेची आर्थिक स्थिती सुधारल्याचे हिशेबपत्रकांवरून दिसून येईल. १९७७–७८ चा अर्थसंकल्प १३,३०० रुपयांनी तुटीचा होता. रु. ८००० घसाऱ्यासाठी व प्रत्यक्ष तूट रु. ५,३०० असा तिचा तपशील होता. यंदा प्रत्यक्षात तूट रु. १३,३०० या ऐवजी रु. ८८४१–७१ एवढीच आलेली आहे. या रकमेत घसाऱ्याचे रु. ७१५०–०९ आहेत. म्हणजेच प्रत्यक्षात तूट रु. १६९१–६२ एवढीच आली आहे. ही वार्षिक तूट येऊनही संस्थेच्या स्थिर निधीत व राखीव निधीत लक्षणीय भर पडली आहे. विश्वस्तांकडील स्थिर निधीत गेल्या दोन वर्षात रु. ३३,५७४ या रकमेची भर टाकण्यात आली आहे. गतवर्षी ताळेबंदात अखेर शिल्लक रु. १,१३,१४६–१९ अशी होती. यंदा शिल्लक रकमेत रु. २९,७९३–९३ या रकमेची भर पडली आहे. अर्थसंकल्पात विश्वस्तांकडून चालू खर्चासाठी पाच हजार रुपये घेण्याची तरतूद केलेली होती. ही रक्कम न वापरता कार्यकारी मंडळाने वार्षिक उत्पन्नातूनच सर्व खर्च केला आहे. यंदाच्या तुटीचा या संदर्भात विचार करता ही तूट वाजवी असल्याचे लक्षात येईल. किंबहुना ही तूट अभावानेच जाणवेल.

परिषदेच्या सर्व कार्यांत अनेक व्यक्ती, संस्था आणि वृत्तपत्रप्रतिनिधी यांचे नेहमी सहकार्य लाभते. यंदाही ते लाभले. महाराष्ट्र शासनाचे शिक्षणखाते, महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ, पुणे महानगरपालिका यांचे आर्थिक सहकार्य हा परिषदेचा मोठा आधार आहे. परिषद या सर्वांची ऋणी आहे.

पुणे
दि. २० मे १९७८

**वि. ग. कानिटकर**
**राजा महाजन**
**म. श्री. दीक्षित**
कार्यवाह

## परिषदेला उदार देणगी

माटुंगा ( मुंबई ) येथील मधुकर चॅरिटेबल ट्रस्ट या संस्थेतर्फे महाराष्ट्र साहित्य परिषदेला नुकतीच १०००० रु. ची ( रुपये दहा हजार ) ची बिनशर्त उदार देणगी मिळाली आहे. प्रस्तुत देणगीच्या रकमे-वरील व्याजाचा विनियोग परिषदेच्या साहित्य व सांस्कृतिक कार्यासाठी प्रतिवर्षी करण्यात येईल.

मधुकर चॅरिटेबल ट्रस्टने तत्परतेने जी उदार देणगी दिली त्याबद्दल परिषद ट्रस्टींची शतशः ऋणी आहे.

अनुक्रमणिका